


भाषांतरमाला क्रमांक २७

# बोस्तान

( पुष्प - वन )

**शेख सअदीच्या
फारशी मूळ
ग्रंथाचा अनुवाद**

अनुवादक :
गुरुनाथ दिवेकर

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ,
मुंबई

# प्रारंभिक

साहित्य आणि संस्कृति मंडळाच्या पुरस्काराने मी १९६७ साली शेख सादीच्या 'गुलिस्तान' चा मराठी अनुवाद केला. त्यानंतर सादीच्या 'बोस्तॉं' या मसनवी महाकाव्याचा अनुवाद प्रकाशनार्थ साहित्य आणि संस्कृति मंडळास सहर्ष पाठवीत आहे. हा मूळ फारशी प्रबंध मध्ययुगीन जगातील उत्कृष्ट ग्रंथ समजला जातो. मराठी वाचकांना त्याची ओळख करून देण्याचा सल्ला श्री. सेतु माधवराव पगडी यांनी दिला. श्री. देवीसिंग चौहान यांनी या कामी प्रोत्साहन दिले आणि साहित्य आणि संस्कृति मंडळाने प्रकाशनाच्या कटकटीपासून मला मोकळे करून स्वतःच प्रकाशनाचा भार वाहिला. या सर्वांचे मी मनापासून आभार मानतो. तसेच माझे मित्र श्री. वसंत निनावे यांनी परिश्रमपूर्वक अनुवाद तपासून मुद्रणप्रत तयार करून दिल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

शेख सादी शिराजी याच्या 'बोस्तॉं' या अमोल ग्रंथाचा उर्दू अनुवाद पै. वा. मौलवी जाफरअली देवबंदी यांनी केला आणि लखनौ विद्यापीठाचे प्राध्यापक हजरत खलील यांनी तो तपासून प्रस्तावनेसह सुधारला. लखनौच्या तेजकुमार छापखान्यात याची पहिली आवृत्ती ऑक्टोबर १९६२ मध्ये छापली गेली. मराठी अनुवाद बव्हंशी याच प्रतीवर आधारित आहे.

शेख सादी या स्वतंत्र बुद्धीच्या शेख-संताची विचारसरणी आणि त्याचा सरळ आणि शक्यतो समर्पक अनुवाद साक्षेपी वाचकांना पसंत पडल्यास माझा प्रयत्न सफल झाला असे मी समजेन.

मुंबई,
चैत्र शुद्ध प्रतिपदा
शके १८९२.

गुरुनाथ व्यंकटेश दिवेकर

# निवेदन

मराठी भाषेला व साहित्याला ज्ञानविज्ञानाच्या क्षेत्रात पश्चिमी भाषांचा दर्जा प्राप्त व्हावा, इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, रशियन इत्यादी भाषांना जसे विद्यापीठीय स्तरावर स्वयंपूर्ण महत्त्व प्राप्त झाले आहे तसे मराठी भाषेला व साहित्याला प्राप्त व्हावे, इंग्रजी भाषेला व साहित्याला आज भारतीय विद्यापीठामध्ये जसे प्रमुख स्थान आहे तसे स्थान, महाराष्ट्रामधील विद्यापीठांत मराठी भाषेला व साहित्याला प्राप्त व्हावे या उद्देशाने साहित्य आणि संस्कृति मंडळाने वाङ्मय-निर्मितीचा विविध कार्यक्रम हाती घेतला आहे. विश्वकोश, मराठी महाकोश, वाङ्मयकोश, विज्ञानमाला, भाषांतरमाला इत्यादी योजना या कार्यक्रमात अंतर्भूत आहेत.

२. संस्कृत व अन्य भारतीय भाषांतील आणि त्याचप्रमाणे इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, इटालियन, रशियन, ग्रीक, लॅटीन, इत्यादी पश्चिमी अभिजात ग्रंथांचे व उच्च साहित्यामधील विशेष निवडक पुस्तकांचे भाषांतरे किंवा सारांश-अनुवाद अथवा विशिष्ट विस्तृत ग्रंथांचा आवश्यक तेवढा परिचय करून देणे हा भाषांतरमालेचा उद्देश आहे.

३. भाषांतर-योजनेतील पहिला कार्यक्रम मंडळाने आखून, ज्यांना अग्रक्रम दिला पाहिजे अशी पाश्चात्य व भारतीय भाषांतील सुमारे २०० पुस्तके निवडली आहेत. होमर, व्हर्जिल, एस्किलस्, ॲरिस्टोफेनीस, युरिपिडिस, प्लेटो, ॲरिस्टॉटल, थॉमस ॲक्वाइनस, न्यूटन, डार्विन, रूसो, कांट, हेगल, जॉन स्टुअर्ट मिल, गटे, शेक्सपीअर, टॉलस्टॉय्, दोस्तएवस्की बट्रॅंड रसेल, स्तानिस्लावस्की बेनेडिक्ट, रायशेनबाख, व्हाइटहेड, क्रोचे, मालिनवस्की, कॅसिरेस, गॉर्डन व्ही. चाइल्ड इत्यादिकांचा या भाषांतरमालेत समावेश केला आहे. संस्कृतमधील वेद, उपनिषदे, महाभारत, रामायण, ‘ भरताचे नाट्यशास्त्र ’ ‘ संगीतरत्नाकर ’, ‘ ध्वन्यालोक ’ प्राकृतातील ‘ गाथासप्तशती ’, त्रिपीटकातील निवडक भाग इत्यादिकांचाही या भाषांतरमालेत समावेश केला आहे.

४. इ. स. तेराव्या शतकातील इराणमधील मध्ययुगीन महान तत्त्वचिंतक व दार्शनिक शेख सादी या प्रसिद्ध फारशी साहित्यिकाने लिहिलेल्या “ बोस्तान ” या मूळ फारशी ग्रंथाचा सुंदर मराठी अनुवाद श्री. गु. त्र्यं. दिवेकर यांनी केला असून तो मंडळाच्या भाषांतर योजनेखाली “ बोस्तान ” ( पुष्प-वन ) या शीर्षकाने प्रकाशित करण्यास मंडळास आनंद होत आहे.

वाई
भाद्र. ६, १८९५
२८ ऑगस्ट, १९७३.

तर्कतीर्थ श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी,
अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृति मंडळ
सचिवालय.

# अनुक्रमणिका



नूतन शीराज : इरम बाग

[ सौजन्य : ईरान कल्चर हाउस, मुंबई ४ ]

# उपोद्घात

## शेख सादी

### १. जीवन वृत्तांत

सुमारे आठशे वर्षांपूर्वी इराण मधील शिराज या शहरी शेख सादी नावाचा मध्ययुगीन इस्लामी जगतातील महान चिंतक आणि ललित साहित्याचा सम्राट होऊन गेला. त्याने आपले बाल्य आणि यौवन विद्यार्जनात खर्ची घालून उतार वयात देशाटन केले आणि वार्धक्याने जर्जर झाल्यावर साहित्यनिर्मितीचे काम हाती घेतले. ग्रंथ रचनेचे काम त्याने जरी उशिरा सुरू केले, तरी तो मध्यपूर्वेत महान् कवी आणि बाणेदार संत म्हणून प्रसिद्ध झाला. सातशे वर्षांपूर्वी ज्या उत्साहाने आणि आदराने त्याच्या साहित्यसेवेचे कौतुक केले गेले तोच उत्साह आणि आदर आजही दिसून येतो. मागील तीनशे वर्षांपासून त्याच्या 'गुलिस्तान' व 'बोस्तान' या ग्रंथांचे पाश्चिमात्य भाषांतून अनुवाद प्रसिद्ध होत आहेत. मराठीत देखील १८९१ साली ग्वाल्हेरचे कै. मा. ब्य. लेले यानी 'पुष्पवन' आणि 'सुमन विकास' या नावाने सादीच्या ग्रंथांची भाषांतरे प्रसिद्ध केली. सादीकडून प्रेरणा मिळाली नाही असा उर्दू आणि फारशी साहित्यिक क्वचितच आढळेल. उर्दू, फारशी भाषेतील बरीचशी सुभाषिते आणि म्हणी देखील सादीप्रणीत आहेत. त्यांच्या हितोपदेशाचा सामान्य जनांपासून वजीर, सुलतानांपर्यंत सर्वांवरच पगडा बसलेला आढळतो.

**" कलीदे गंजे सआदत नसीहते सअदीस्त**
**अगर कबूल कुनी गूये बुर्दी ज मैदान "**

(सुखाच्या भांडाराची किल्ली सअदिच्या हितोपदेशात आहे. ती मिळवशील तर यशाचे मैदान गाजवू शकशील.)

**जन्म व बालपण**

शेख सअदीच्या खऱ्या नावाबद्दल आणि जन्मतिथीबद्दल त्याच्या विश्वसनीय चरित्रकारांमध्ये मतभेद आढळतात. काहींच्या मते सअदीचे नाव मुस्लेहउद्दीन आहे तर त्याचे खरे नाव मुशरफुद्दीन बिन मुस्लेह उद्दीन बिन अबदुल्ला असे काही लिहितात. त्याचप्रमाणे त्याच्या वडिलांच्या नावाबद्दल देखील वाद आहे. कोणी म्हणतो मुस्लेहुद्दीन होते तर कोणी म्हणतो अब्दुल्ला असे होते. असे असले तरी बहुतेक सर्वच कविचरित्रातून सअदीचे नाव मुशरफउद्दीन असेच आढळत असल्याने त्याचे खरे नाव मुशरफुद्दीन होते असे समजण्यास काही प्रत्यवाय नाही.

तीच गत त्याच्या जन्मतिथीची. त्याने तीस वर्षे विद्यार्जनात, तीस वर्षे देशाटनात, तीस वर्षे साहित्यनिर्मितीत आणि शेवटची तीस वर्षे परमार्थसाधनेत

घालविल्याचे सामान्यपणे सर्व चरित्रकार मानतात. तो हिजरी सन ५७१ म्हणजे इसवी सन ११८५ मध्ये जन्मला. काहींच्या मते त्याची जन्मतिथी ११८४, ११८९ किंवा ११९३ अशी आहे. ढोबळ मानाने तो हिजरी सनाच्या ६ व्या किंवा इसवी सनाच्या बाराव्या शतकाच्या शेवटी जन्मला असावा यात काही शंका नाही. तो शतायुषी होता हे मात्र सर्वमान्य आहे.

त्याच्या जन्मस्थळाबद्दल आणि मृत्युतिथीबद्दल कोणतेच वाद नाहीत. तो इराणमधील शिराज या ठिकाणी जन्मला आणि तेथेच त्याची कबर आहे. मुसलमानी पद्धतीप्रमाणे (अबजद) मृत्युतिथी श्लोकबद्ध आहे.

**'ज खासाबूध ता तारीख शुद "खास"'**

(तो अलौकिक होता आणि त्याची तिथी देखील 'खास' होती म्हणजे हिजरी ६९१–१२९१–९२) मृत्युतिथी लक्षात घेतली तर तो ज्ञानेश्वरांचा समकालीन होता हे उघड आहे.

सादीच्या साहित्यात त्याच्या आयुष्यातील काही महत्त्वाच्या घटनांबद्दल अधून मधून उल्लेख आढळतात. "बोस्तान" ग्रंथाच्या ९ व्या अध्यायात स्वतःस उद्देशून त्याने असे म्हटले आहे. **"इला अय के उमरत ब हफताद रफ्त मगर खुफ्ता बूदी के बरबाद रफ्त"**

(अरे तुझ्या आयुष्याची सत्तर वर्षे निघून गेली, झोपा काढून तू हा काळ वाया घालविलास!) म्हणजे त्याने सत्तराव्या वर्षानंतरच बहुतेक लिखाण केले. 'बोस्तान' केव्हा लिहिले याबद्दल त्याने "ग्रंथरचनेचा उद्देश" या संदर्भात स्पष्टपणे जिलकाद ६५५ हि. श. (इ. स. १२५७) ही तारीख नमूद केली आहे.

सअदीचे वडील अबदुल्ला हे शिराजचा सुलतान अताबक सअद बिन जंगी याच्या दरबारातील मानकरी होते आणि त्याची आई एका थोर आणि विद्वान घराण्यातील होती.

**" हमा कबीलये मन
आलेमाने दीनबूदंद
मरा मुअल्लमे इष्के तो शायरी आमोख्त "**

(माझ्या कुळातील सर्वच धर्मपंडित होते. पण प्रिये! मला शायरी तुझ्या प्रेमाने शिकविली.)

सादीच्या आईवडिलांनी त्याला सर्वोत्तम शिक्षण देण्याची सोय केली व स्वतः सादी बालपणापासून कुराण वाचन, धर्माचरण, पंडितांची संगत, कव्वाली श्रवण यात रस घेत असे हे त्याच्या काही गोष्टींवरून दिसते. वडील तर त्याला नेहमी आपल्याबरोबर नेत आणि वेळोवेळी त्याला उपदेश करीत. नीतीचे बरेच पाठ तो

वडिलांनी वेळोवेळी केलेल्या कानउघाडणीवरून शिकला असावा असे दिसते. एका गोष्टीत त्याने म्हटले आहे की काही दोस्त कुराण वाचताना पेंगत होते म्हणून सादीने त्यांची बापापाशी टिंगल केली, तेव्हा त्याने त्यास म्हटले, "बाळा तू मन लावून कुराण वाचतोस हे ठीक आहे पण त्यावरून ह्या मुलांची टिंगल करण्यापेक्षा तू स्वत: झोपलास तर ते जास्त चांगले !" पण लवकरच सादीवर नशिबाचा घाला पडला आणि त्याच्या डोक्यावरील छत्र नाहिसे झाले. तरीसुद्धा त्याच्या आईने त्याच्या शिक्षणाकडे लक्ष पुरवले. हाही आधार त्याला फार काळ लाभला नाही आणि सादी पुरता पोरका बनला. अनाथाबद्दल त्याचा कळवळा दिसतो तो स्वानुभवातून जन्मला होता.

**मरा बाशद अज दर्द तिफला खबर के दर तिफली अज सर बिरफ्तम पिदर**

(मला मुलांचे दु:ख चांगले कळते, कारण माझ्या लहानपणीच माझे वडील गेले.)

आपल्या आईवडिलांनी लावलेले वळण ही आपली आयुष्यातील बहुमोल दौलत आहे असे तो जागोजाग कृतज्ञतेचे उद्गार काढतो.

**बगदादमधील निजामिया महाविद्यालय**

शिराज हे विद्वानांचे माहेर होते. सादी, हाफिज हे कवी शिराजचेच. त्याचा पूर्ण उपयोग करून घेतल्यावर सुद्धा सादीची विद्येची भूक भागली नाही. आईबापांचा आधार तुटला होता म्हणून शिराजमध्ये त्याला करमत नव्हते. त्याच्या जोडीला शिराज राज्यावर परचक्राचे संकट आले. सातव्या शतकात अरबांनी इराण पादाक्रांत करून इस्लाम आणि अरबांची सत्ता यांचे बस्तान बसलिले होते. शिराजमध्ये आणि इराणात जागोजाग नवीन धर्म आणि संस्कृतीची केंद्रे स्थापित झाली होती. पण अकराव्या शतकापासूनच इराणवर मध्य आशियातील तुर्की बौद्धधर्मीय, मोंगल, तार्तर आदि टोळयांच्या स्वाऱ्या सुरू झाल्या. अरबांचे खिलाफत नष्ट झाले आणि इस्लाम धर्मावर तुर्कांचे विध्वंसक आघात होऊ लागले. इराणात अराजक माजले. परधर्मीय तुर्कांनी (मोंगोल) मुसलमान धर्मपंडितांची आणि विद्वानांची ससेहोलपट केली त्यामुळे सर्व विचारवंत शेजारच्या मुस्लिम राष्ट्रांत आश्रयार्थ जाऊ लागले. या राजकीय अस्थिरतेमुळे आणि काही अंशी आपल्या पर्यटनप्रेमामुळे, विद्यार्जनाच्या निमित्ताने सादी शिराज सोडून देशांतरी गेला. त्यावेळची त्याची मन:स्थिती कशी होती हे पुढील पंक्तीवरून स्पष्ट होते.

**सअदिया : हुबे वतन गरचे**
**हदीसिस्त सहीह**
**नतवाँ मुर्द ब सख्तीके मन इंजा**
**जादम ।**

(सअदी : देशभक्ती ही चांगली प्रथा आहे खरी पण आपण जेथे जन्मतो तेथेच मरावे असा कायदा कोठे आहे?)

त्याच्या भटकेपणाची हौस पाहा–

बहीच यार मदिह खातिरो
बहीच दियार
के बरो बहर फराकस्त व आदमी
बिसियार
चू माकियां बदर खाना चंदबीनी
जोर
चिरा सफर न कुनी
चू कबूतरे तुय्यार
जमीन लकद खुरद अज गाव व खर
व इल्लते आं
के साकिनस्त न मानिंदे आसमां
दव्वार

("आपले हृदय कोणाला देऊ नकोस, देऊ नकोस कोणाला थारा. वसुधा, सागर, प्रचंड जन समुदाय एवढे आपल्याला पुरे आहे. कोंबडीप्रमाणे पाटीत किती दिवस दबून बसावयाचे ? त्यापेक्षा कबूतराप्रमाणे भरारी का मारत नाहीस? जमीन जागची कधी हलावयाची नाही म्हणून तिला बैलागाढवांच्या लाथा खाव्या लागतात, अस्मानाप्रमाणे, कालचक्रासारखी, ती फिरत राहिली असती तर तिची अशी दशा झाली नसती.)

सादी शिराज सोडून बगदादला गेला आणि तेथील निजामिया मद्रेशात धर्मशास्त्र आणि साहित्य यांचे अध्ययन करू लागला. तेथे इस्लामी जगात ख्याती पावलेले अबूल फरह इब्ने जूजी, शिहाबुद्दीन सुहरावर्दी, इमाम अबू हामिद गजाली आणि शेख अब्दुल कादर जिलानी यांसारखे उस्ताद त्याला लाभले. मुसलमानातील भक्तिमार्ग किंवा पुष्टिमार्ग म्हणून प्रसिद्ध असलेल्या सूफी तत्त्वज्ञानाचाही सादीवर पगडा बसला होता. पोथीनिष्ठ मुसलमान उलेमा सूफी (तरीकत) मार्ग कमी लेखतात म्हणून सादीलाही हा नाद सोडून द्यावा लागला. लवकरच अत्यंत हुषार विद्यार्थी म्हणून त्याने लौकिक मिळविला आणि नंतर काही दिवस तेथे त्याने अध्यापनही केले. त्याला विद्यार्थ्यांच्या वसतिगृहाच्या देखरेखीचेही काम संभाळावे लागे. विद्यार्थीदशेत सुद्धा विद्वत्ता आणि परिश्रमप्रेम यांत प्राध्यापकांपेक्षा तो वरचढ होता म्हणून त्यांची त्याला पोटदुखी सहन करावी लागे.



नूतन शीराज : एक मैदान.
[ सौजन्य : ईरान कल्चर हाऊस, मुंबई ४. ]

## त्या वेळची राजकीय परिस्थिती

सादीच्या बाल्यावस्थेचा काळ इराणच्या इतिहासातील अत्यंत घालमेलीचा होता. कुरदिया घराण्याचा अस्त झाला आणि सलजूकी व ख्वारिज्मशाही या सुलतानांच्या सुंदोपसुंदीमुळे देश पोखरला गेला. ही संधी साधून मध्य आशियातील तुर्की आणि तार्तर टोळयांनी इराणात सर्वत्र हाहाःकार माजवला. बनी अब्बास याची खिलाफत (अरब सत्ता) नष्ट झाली. अलेक्झांड्रिया, दमास्कस, इजिप्त आणि फारस परगण्यात भयानक दुष्काळ पडला आणि लाखाच्या संख्येने लोक मरण पावले. इतिहासकारांच्या अंदाजाप्रमाणे सुमारे आठ लाख मुसलमान तुर्की (मोंगोल) तलवारीच्या भक्ष्यस्थानी पडले असावेत. अशा प्रकारे इराणच्या सुखासीन जीवन-क्रमाचा आणि लालित्यप्रवण संस्कृतीचा मोगल तुर्क-तार्तरांनी बळी घेतला. त्या वेळी सत्तारूढ असलेला इस्माइली पंथ धुळीस मिळाला आणि साऱ्या देशाला अराजकाचे खग्रास ग्रहण लागले. हलाकूखानाने इराणातील लहान मोठी संस्थाने नष्ट करून आपले (एलखानी) राज्य स्थापले. हे जरी सुरवातीला चीनच्या बौद्धधर्मीय कुब्लाखानाचे अंकित मांडलिक राज्य होते, तरी लवकरच तुर्की सरदारांनी बंड करून त्याची शकले पाडली. यातच महा क्रूर चंगीजखानाच्या स्वाऱ्यांची भर पडली व त्यामुळे बुखारा, निशापूर, समरकंद ही शहरे बेचिराख झाली. रक्ताचे पाट वाहू लागले, खांडवदहनाचे प्रकार घडले. मालमत्ता, सोने, जडजवाहिर यांवर तार्तरांनी ताबा मिळविला. इ. स. १२२१ मध्ये ख्वारिज्मशाहचा वध झाला आणि त्याचा मुलगा जलालुद्दीन तार्तरांशी प्राणपणाने लढला. पण त्याची पिच्छेहाट झाल्याने त्याला हिंदुस्थानात पळून जावे लागले. तार्तर टोळधा गेल्यानंतर त्याने पुन्हा ख्वारिज्मशाही स्थापन केली; पण ती अल्पजीवीच ठरली. इ. स. १२३१ मध्ये त्याची कत्तल झाल्यावर मात्र तार्तरांच्या सत्तेला अंकुश लावणारा कोणीच राहिला नाही.

चंगीजखानाच्या गादीवर १२५२ साली मंगूखान आला आणि त्याने आपला भाऊ हलाकूखान याला बगदाद आणि इस्माइली राज्यांवर स्वारीवर धाडले. त्याने पाचशे वर्षे अधिकारावर असलेल्या खिलाफती (अरबी) सत्तेचा आणि दीडशे वर्षांच्या इस्माइली चळवळीचा निर्घृण बीमोड केला. १२५८ सालच्या बगदादवरील स्वारीत शेवटचा खलिफा मअतेसम बिल्ला पडला आणि इस्लामी धर्म आणि संस्कृतीचे मोठे केन्द्र कायमचे अरबांच्या हातचे गेले.

या अस्थिर आणि मुसलमानांच्या दृष्टीने युगांत ठरलेल्या कालखंडात सादी शिराजला परतला आणि साहित्यनिर्मितीत गुंतला. त्या वेळी शिराजचा बादशहा अताबक अबूबक्र बिन सअद जंगी हा होता. त्याने तार्तरांचे बळ ओळखून नमते घेतले. म्हणून शिराज वाचले. सादीने मोतेसमबिल्लाच्या पतनावर दुःखाश्रू ढाळले, पण अताबकच्या मुत्सद्देगिरीने दक्षिण इराण तार्तरांच्या सर्वविनाशी स्वाऱ्यांपासून

बचावला याबद्दल त्याचे कौतुक केले आहे. एरव्ही त्याला कोणी भ्याडच म्हटले असते पण साअदीने त्याला मुत्सद्दी ठरवून त्याच्या लोटांगणवादाला मोठी मुत्सद्देगिरी संबोधून त्याला शिकंदरापेक्षा श्रेष्ठ ठरविले आहे.

"शिकंदराने शिसे आणि दगडाची भिंत बांधून याजूज माजूज या पुंडांना पायबंद घातला. परंतु 'अताबक बादशहा' तू, काफरा (मोगलां) ना धन देऊन लुळे केले आहेस. शिकंदराप्रमाणे शिशा-दगडाची भिंत बाधूंन कडेकोट बंदोबस्त करण्याचा बावळटपणा केला नाहीस." (बोस्तान - प्रस्तावना)

शिराज येथे इ. स. ११४८ पासून १२६८ पर्यंत अताबकांचे सलगरी घराणे राज्य करीत होते. याच घराण्यात सादबिन जंगी ह्या बादशहाने ११९४ पासून १२२६ पर्यंत राज्य केले. सादीचे वडील अब्दुल्ला हे त्याचेच एक सरदार होते. त्याच्या राज्यारोहणाच्या वेळी सादी अवघा ६ वर्षांचा होता. त्यानंतर अताबक सादबिन जंगी हा गादीवर आला आणि १२५९ पर्यंत त्याने बादशाहत केली. याच सुमारास सादी शिराजला परतला होता आणि त्याने इ. स. १२५७ साली "बोस्तान" व १२५९ साली "गुलिस्तान" असे आपले नावाजलेले ग्रंथ लिहिले. अबूबकरबिन सादच्यानंतर सादबिन अबूबकर मसनदीवर आला पण एका वर्षातच वारला. पुढे नऊ वर्षांनी म्हणजे १२६९ साली सलगरी अताबकाचे राज्य संपुष्टात आले. या नंतर देखील २३ वर्षे सादी जगून वाचून राहिला. त्याने त्या काळी आपल्या भोवतालची करुणाजनक परिस्थिती पाहून कालमहिमा, मानवी जीवनाचे क्षणभंगुरत्व, मानवी जीविताबद्दल कळवळा आणि पीडित जनतेचा कैवार यांनी नटलेले आपले जागतिक मानाचे साहित्य निर्माण केले. म्हणूनच त्याने बादशहांना, फकिरांना योग्य वागणुकीचे धडे दिले आणि नव्या पिढीच्या मनात धर्मप्रेम, भक्ती, नीतिमत्ता यांचा ठसा उमटविला. त्याच्या छोटया छोटया गोष्टींत मानव जीवनाचा साकल्याने आणि परखडपणे विचार केलेला आढळतो. त्यास स्वानुभवाची धार असल्याने त्याचे क्वचित प्रसंगी कडवट वाटणारे बोधपाठ सर्वांना पटणारे असतात. उदाहरणार्थ "सोने हे दगड किंवा दगडासारखे कठिण काळीज फोडूनच बाहेर काढावयाचे असते." (गुलिस्तान). "ज्याला योग्य सबब सांगता येईल त्यानेच प्रेमाचे चाळे करावेत." (बोस्तान). "तरुणीला आपल्या कुशीत म्हातारा भेटण्यापेक्षा बरगडीत बाण घुसलेला परवडतो." (गुलिस्तान) क्वचितप्रसंगी तो औचित्याची सीमा ओलांडून म्हणतो

"बाईला पुरुषापासून दहा मण सोने मिळण्यापेक्षा एक गाजर मिळणेच हवे असते." (गुलिस्तान)

"ज्योतीपुढे कुरूप कैदाशीण आली तर तिला मैफलीतून बाहेर काढून ठार करा." (बिकुश)

तेच जर मधुरोष्ठी आणि सुखस्मिता दिसली तर तिचा पदर धरा आणि ज्योतच मालवा. (बिकुश), (गुलिस्तान).

## सादीचे देशाटन

सादीचे सारे चरित्रच एका भटक्या दरवेशाचे होते. त्यामुळे त्याच्या साहित्यात देशदेशांतरातील घडामोडींचे उल्लेख आणि आख्यायिका आढळतात. तो मार्कोपोलो-प्रमाणे प्रवासी म्हणून निघाला नव्हता. इब्ने बतूताप्रमाणे इतिहासकार म्हणूनही त्याची प्रसिद्धी नाही. अनाथ म्हणून बगदादला गेला. बगदाद पडल्यावर आशिया आणि आफ्रिकेतील मुसलमानी मुलुखांची आश्रयार्थ मुशाफरी केली. एकदा तर त्याला गुलाम व्हावे लागले आणि तेव्हाच एका मुसलमान व्यापाऱ्याने त्याला विकत घेऊन आपला जावई बनविले. अशारीतीने अगतिक होऊन नाना देशाचे रीतिरिवाज आचार-विचार यांचे परिशीलन करत करत आपल्या आयुष्यातील ४० वर्षे त्याने घालविली. भारतातसुद्धा तो आल्याचे बोस्तानमधील सोमनाथ उपाख्यानावरून दिसून येते. (अध्याय ८ मधील शेवटची गोष्ट). पण त्याने ज्या शैलीत आपला अनुभव सांगितला आहे त्यावरून त्याची सोमनाथ भेट वस्तुनिष्ठ वाटत नाही. त्या काळी आणि आज सुद्धा इस्लामी जगतात आणि फारशी-उर्दू साहित्यसंकेतात 'सोमनाथ' हे पद हिंदुधर्म, मूर्तिपूजा आणि अधार्मिकता (कुफ्र) यांचे प्रतिक म्हणून रूढ आहे. म्हणून तो कल्पनाविलास असावा असे वाटते.

त्याने मध्य आशियाच्या तार्तर टापूपासून काशगर, सिरिया, मेसोपोटेमिया, इजिप्त, पॅलेस्टाईन हा प्रदेश तर पायाखाली घातलाच त्याशिवाय मक्केच्या अनेक वाऱ्याही केल्या. त्यांपैकी काही त्याने अनवाणी केल्या होत्या. या प्रवासात त्याने जे गरिबांचे हाल, वाळवंटातल्या यातना व अवर्षणाचा हाहाःकार पाहिला त्याचे करुणा-जनक वर्णन त्याच्या ग्रंथातून आढळते. त्याने देशाटनात अवर्णनीय हाल सोसले पण त्याच्या विद्वत्तेची व कवित्वाची कीर्ती सर्वत्र पसरली होती. त्यामुळे लोकांनी त्याच्या गुणांची कदर केली. म्हणून माणसापाशी गुणवत्ता असलीच पाहिजे असे त्याचे आग्रहाचे सांगणे जागोजाग आढळते.

सादी बहुभाषाविशारद होता व आरबी, फारशी, तुर्की, लॅटिन अशा जवळ जवळ अठरा भाषा त्याला अवगत होत्या असे म्हणतात. विद्यार्जनाचा नाद तर भलताच होता. "अजरामरवत् प्राज्ञो विद्यामर्थंच चिंतयेत् गृहीत इव केशेषु मृत्युना धर्ममाचरेत" हे सुभाषित जणू काही त्याचे ब्रीद वाक्यच होते. पण सादीचा बाणा इतर विद्वानांपेक्षा वेगळा होता. भाटगिरी (कसीदा ख्वानी) करून बादशहांना खूष करणे आणि ऐश्वर्यात जन्म वेचणे हा सर्वत्र आणि विशेषतः मुसलमानी जगात साहित्यिकांचा शिरस्ताच आहे. त्यात काव्यातील "कसीदा" हा प्रकार फारशी साहित्याची प्रमुख कला समजली जाते. अनवरीसारखे महान कवी या शाखेत श्रेष्ठ समजले जातात. पण सादीने दरबाराकडे पाठ फिरवली आणि जंगल, वाळवंट आणि परदेश यातच तो रमला. राजाश्रयासाठी त्याने आपल्या स्वच्छंद वृत्तीचा आणि स्वाभिमानाचा

बळी दिला नाही. हे तत्त्व त्याने आपल्या 'राजांची वागणूक' या अध्यायात (गुलिस्तान) अनेक गोष्टीतून बिंबवले आहे. सअदीची कीर्ती जगभर पसरली होती. सुलतान गयासुद्दीन बलबन या बादशहाचा मुहम्मद हा शहाजादा मुलतानचा राज्यपाल होता व त्याने मुलतानमध्ये "प्रतिशीराज" स्थापन करण्याच्या आकांक्षेने सादीला भारतात पाचारण केले. पण त्याने ते आमंत्रण नाकारले. उलट त्याने "दर हिंद खुसरो बस अस्त !" (भारतात अमीर खुसरोसारखा महाकवी असताना दुसरा कशाला पाहिजे.) असे बजावले. वयाची सत्तरी उलटल्यावर त्याला जगरूढी जाणून घेण्याची आवश्यकता भासली आणि शीराजच्या अताबकाचा तो भाट बनला. आपले कविनाम (तखल्लुस) सुद्धा त्याने अताबक अबूबकर 'सअद' बिन जंगी या आपल्या आश्रयदात्याच्या प्रीत्यर्थ धारण केले. सादी सनातनी आणि भाविक मुसलमान होता. राज्यकर्ते मुसलमान होते तरी मूळचे तुर्क आणि बिगर इस्लामी जीवनात मशगूल. "अर्थस्य पुरुषो दासः" या उक्तीप्रमाणे त्या परकीय राजकर्त्यांची भरमसाट स्तुती करणे त्याला भागच पडले. सअदीचे काही असभ्य आणि अश्लील उद्‌गार देखील त्याने लहरी आश्रयदात्यांना खूष करण्यासाठी आपल्या 'दीवाना'त समाविष्ट केले, असे म्हणतात.

### कौटुंबिक जीवन

भटकेपणा सादीच्या पाचवीलाच पुजला होता, त्यामुळे गार्हस्थ जीवनाच्या बेड्यांचा त्याला मनापासून तिटकारा होता. पण मुसलमानांमध्ये ब्रह्मचर्याला फारसा मान नसल्यामुळे त्याने सोयीसाठी एक दोन विवाह केले. पहिले लग्न तर त्याच्या सासऱ्याने त्याला गुलाम म्हणून विकत घेतल्यामुळे झाले. पण आपल्या बायकोच्या चढेल वृत्तीला कंटाळून सादीने अलेप्पो (हलब) या आपल्या सासुरवाडच्या गावातून पळ काढला. दुसऱ्या विवाहाचा स्पष्ट उल्लेख कोठेही नसला तरी "सनआ (यमन) या ठिकाणी माझा मुलगा मेला तेव्हा मला अपार दुःख झाले." या त्याच्या बोस्तानमधील गोष्टीवरून त्या लग्नविषयी तर्क करण्यास काही हरकत नाही. शिवाय त्याची एक बायको यहुदी होती असे काही चरित्रकार सांगतात पण त्याने एकलकोंडे राहूनच आपले अर्ध्यापेक्षा अधिक आयुष्य घालविले यात काही शंका नाही.

## २. सादीचे साहित्य

### फारशी छंद : शास्त्राची रूपरेषा

इसवी सनाच्या सातव्या शतकात इराणमध्ये अरबांची सत्ता प्रस्थापित झाल्यावर इराणचे प्राचीन साहित्य आणि परंपरा नष्ट झाली आणि यानंतरच्या काळात फारशी किंवा अरबीमिश्रित इराणी (पहेलवी) अशी एक भाषा रूढ झाली. भारतात याच प्रकाराला हिंदुस्तानी किंवा उर्दू म्हणतात. या नवीन भाषेच्या प्रेरणा इस्लाम आणि अरबी साहित्य आणि संस्कृती यातून घेतलेल्या आहेत. साहित्याचे प्रकार देखील अरबीचेच. पद्य साहित्य तर पूर्णपणे अरबी थाटाचे.

उदाहरणार्थ ओवी (Couplet) "बैत" याची कल्पनाच अरबीमध्ये "तंबू" ची आहे. "बैतूस् शेर" म्हणजे "नाजूक (केसांचा) तंबू" "शायरी". ही केशां (जनान्या) शी घुटमळणारी. श्लोकार्ध 'मिस्त्रा म्हणजे एकेक दरवाजा ( Flap ) सुरवातीचा श्लोकार्ध मतला. शेवटच्या पंक्तीचा पहिला श्लोकार्ध 'मक्ता' यातच 'गजल' गीताचा कवी आपले कविनाम (तखल्लुस) म्हणजे, 'सादी', 'गालिब' इत्यादी देतो. बैतांच्या संख्येवर आणि विषयांवर अवलंबून सर्वांत लहान कित्ता 'पंक्ती' रुबाई 'चतुष्पदी' गजल (दश-द्वादशश्लोकी) असे लघु काव्यांचे प्रकार आहेत. त्यानंतर स्तवन (कसीदा) शोक (मर्सिया) तत्त्वज्ञान विषयक आख्यानक (मसनवी) हे दीर्घ काव्यांचे प्रकार होत.

सादीच्या 'कुल्लियात' (समग्र वाङमय) मध्ये २३ ग्रंथ आढळतात. त्यात बादशहाला खूप करण्यासाठी भाट गीत कसीदा, बगदादच्या पतनाबद्दलचा त्याचा 'मर्सिया' (शोक गीत), हजारो गजला, साहबियाँ किंवा 'करीमा', 'गुलिस्तान' सारखे गद्यपद्यमिश्र साहित्य आणि बोस्तान ही मसनवी यांचा समावेश होतो. सादीच्याअगोदरचे ख्यातनाम साहित्यिक फिर्दोसी (मसनवी), अनवरी (कसीदा) आणि गजल काव्यात त्याचा समकालीन हाफिज शीराजी हा होता. गजलमध्ये तर तो स्वतःच पैगंबर (देवदूत) मानला जाई.

**" दर शिअर से कस**
**पयंबरानंद हरचंद के " लानवी बादी "**
**अबयात व कसीदा व गजलरा फिर्दौसी अन्वरी व सादी "**

(इस्लाम धर्माप्रमाणे मुहम्मदा नंतर कोणी पैगंबर झाला नाही हे कबूल पण काव्यात तिघे पैगंबर झाले अबयात (ओव्या) मध्ये फिर्दोसी, कसीद्यात (भाटगिरीत) अनवरी आणि गजल प्रकारात सादी हेच ते तिघे.)

सादीच्या गजलांचे विरहप्रधान प्रेमालापाचे लालित्य आगळे आहे.

सादी आणि हाफिज : हाफिजच्या गजलात अलंकारांचे अवडंबर आहे आणि त्याने लीनत्वाचा कळस गाठलेला दिसतो.

**गर निसारे कदमे यारे गिरामी**
**न कुनम**
**गोहरे जाँ ब चिकारे दीगरम बाज**
**आयद ।**

(मी माझे प्राण मौलिक प्रियेच्या पूज्य पदावर वाहिले नाहीत तर त्यांचा मी कशासाठी उपयोग करू ?)

सादी मात्र माशुकाचा अधिकार मान्य करूनही बाणेदारपणाने म्हणतो.

**" गुलामे इष्क शौ कन्देश नीस्त**
**के साहिब दिलांरा पेशा ईनस्त "**

("प्रीतीचा दास बनण्यात लाज का वाटवी ? हा तर दिलदार माणसाचा बाणाच आहे.")

सादी धार्मिक प्रवृत्तीचा असल्याने त्याचा माशुक सूफीसंकेता प्रमाणे "शहिदे मुतलक" परम प्रियकर देवच होता. त्याला काव्यात इष्के हकीकी-भक्तिरस म्हणतात. देहनिष्ठ प्रेम ते इष्के मजाजी – शृंगार रस. यातही सादी कोणाला हार जाणारा नव्हता.

**फरकस्त मियाने आँके यारिश दर बर**
**बा आँकसे के इंतिजारिश बर दर**

(माशुक ज्याच्या मिठीत आहे त्याच्यात आणि प्रियेच्या दारावर नजर लावून बसलेल्या प्रतिक्षापटू मध्ये बरेच मोठे अंतर आहे.) पण हाफिजसारखे 'वाहवत चाललेल्या' शायरा प्रमाणे प्रियेच्या 'छळाचे' गोडवे गात बसणे त्याच्या स्वच्छंदी पिंडाला मानवणारे नव्हते. म्हणून त्याने पंद (हितोपदेश) व नीती अनीतीचा पिच्छा पुरवणे असले रुक्ष वाटणारे साहित्यप्रकार हाताळले. पण त्यातही त्याची रसिक-वृत्ती स्पष्ट गोचर होते. "पाषाण मूर्ती (बुत) ची निंदा करतानाच त्याला" पाषाण हृदयी "मूर्ती (बुत-माशुक) आठवते" (बोस्तान अध्याय ८)

**दरवेशरा तोशा अज बोसा बह ।**

(फकीराला बोशा (चुंबना) पेक्षा तोशा (शिधा) हवा असतो.)

## बोस्ताँ

सादीचा सर्वोत्कृष्ट ग्रंथ बोस्ताँ ही एक मसनवी आहे. मसनवी म्हणजे महाकाव्य. या काव्य प्रकाराचा आत्मा आध्यात्मिक असतो. ह्याची प्रमुख लक्षणे अशी आहेत.

मसनवीची सुरुवात देवाच्या स्तुतीने होते. त्यानंतर पैगंबर मुहम्मद यांचे गुणगान. कवी आपल्या ग्रंथाचा उद्देश स्पष्ट करतो. कवीला आश्रय देणाऱ्या राजाची यानंतर वर्णी लागते. त्याची मनसोक्त स्तुती केल्यावर कवी आपल्या सूफी तत्त्वावर आधारलेल्या सिद्धांताचा आविष्कार एका विस्तृत आख्याना (allegory) द्वारे करतो. मसनवी ह्या काव्यप्रकारासाठी युसूफजुलैखा, लैलामजनू, सलमान व अबसाल या प्रेमकथानकांचाच वापर केला जातो. भारतात हिंदी आणि दखनी (उर्दू) या भाषांमधून वरील ठोकळेबाज कथानकांशिवाय भारतीय रीतीरिवाजांना अनुसरून पदमावत (मलिक मुहम्मद) फूलबन (दखनीत) यातही मसनवी प्रकाराचा वापर झालेला आहे. बोस्तान या मसनवीत सुमारे ४ हजार श्लोक आहेत. सादीने हा ग्रंथ इ.स. १२५७ (जिलकाद ६५५ हिजरी) मध्ये शिराज येथे रचला. याचे पहिले नाव सादीनामा होते. पण इ. स. १२५९ मध्ये सादीने प्रसिद्ध केलेला 'गुलिस्तान' हा ग्रंथ अतिशय लोकप्रिय झाल्याने या मसनवीचे नाव 'बोस्तान' (सुरभिस्थान-उद्यान) असे बदलून टाकले. या वेळी शिराजच्या गादीवर अताबक अबूबक्र सादबिन जंगी (इ. स. १२२६

इराणी " राजतरंगिणी " ( शाहनाम्या ) चा कर्ता
महाकवी फिर्दौसी तूसी



[ ईरान कल्चर हाऊस, मुंबई यांच्या सौजन्याने. ]

ते १२५९) हा होता. म्हणून दोन्ही ग्रंथांत आश्रयदाता म्हणून त्याचे नाव आले आहे. बोस्तान ही मसनवी सूफीसिद्धांताचे विवेचन करण्यासाठी रचलेल्या इतर आख्यानका पेक्षा वेगळी आहे. यात युसुफजुलेखा, लैला-मजनून असे एकच आख्यान नसून हिकायत 'गोष्टी' (चुटके) या नावाने काही नीतितत्त्वे सांगितली गेली आहेत. या गोष्टीत इसापनीती किंवा पंचतंत्रात आढळणारा मनोरंजकपणा नाही. कित्येकदा तर 'बोधवचन' आणि 'गोष्टी' यात मजकूर सारखाच असतो. महाकवी म्हणविणाऱ्याने 'मसनवी' लिहिलीच पाहिजे या कल्पनेनेच सादीने या स्फुट गुंजनालाच मसनवी म्हटले असावे.

कारण वास्तविक 'बोस्ताँ' या ग्रंथाचे स्वरूप आणि आशय त्याच्या 'गुलिस्तान' या अधिक सुटसुटीत, कलात्मक आणि अधिक लोकप्रिय ग्रंथाप्रमाणेच आहे. पण गुलिस्तान मसनवी नव्हे. गुलिस्तानप्रमाणेच यात देखील न्याय, कृतज्ञता, प्रेम, नम्रता, संतुष्ट वृत्ती, शिक्षणाची थोरवी, पश्चात्ताप (तौबा) यांसारख्या विषयावर आधारलेले दहा अध्याय आहेत. यातून सादीने आपला गाढ अनुभव, विद्वत्ता, रसिकता यांची उत्कृष्ट अभिव्यक्ती केली आहे. व्यवहार आणि शास्त्र या दोन्ही नात्याने नीती या विषयावर सादीने आपले विचार अत्यंत सरळ पण रसाळ, स्पष्ट पण कलापूर्ण, परिणामकारक पण हट्टाग्रही नव्हे अशा आपल्या विशिष्ट शैलीत मांडले आहेत. यामुळे लहान आणि मोठे, रंक आणि राजे, दरवेशी आणि विलासी या सर्वांना बोधवचनांचा आणि मार्मिक चुटक्यांचा (हिकायती) रसास्वाद घेता येतो. किंवा असेही म्हणता येईल की किचकट वाटणारे विषय सादीने 'गप्पा' च्या स्वरूपांत निकालात काढले असल्यामुळे मौलाना रूमी, जामी, आदी अन्य सूफी हितोपदेशकांच्या साहित्यापेक्षा सादीचे 'गुलिस्ताँ' आणि 'बोस्ताँ' हेच ग्रंथ गंभीर तसाच सामान्य वाचकही सातशे वर्षांनंतरदेखील पूर्वी इतक्याच उत्सुकतेने वाचतो.

**बहर तमाशा गहे दोस्ताँ**
**किताबेस्त खूष नामिश बोस्ताँ ।**

('दोस्त मंडळी जमली असता त्या सर्वांच्या आवडीचा ग्रंथ म्हणजे बोस्ताँ !)

## ३. सादी आणि नीती

हिरमुसल्या चेहऱ्याने, कपाळाला आठ्या घालून किंवा क्वचित प्रसंगी सुतकी चेहऱ्याने जे सांगितले आणि ऐकले जाते ती नीती असा सामान्य समज आहे. 'अप्रियस्य च पथ्यस्य वक्ता श्रोताच दुर्लभः' असे सुस्कारे उपदेशकांनी टाकल्याचे महाभारतात सर्वत्र पाहावयास मिळते. तरी सुद्धा नीती सांगण्याची आणि ऐकण्याची प्रथा अखंड चालू आहेच. याचे कारण नीती ही फक्त 'वागणूक' किंवा शिष्टाचार यांच्याशीच मर्यादित नसून उभ्या आयुष्यात

आणि मरणोत्तर सुद्धा जे जे काही नियमित किंवा प्रसंगोपात्त घडावयाचे असते त्या सर्वांबद्दल श्रेयस्कर कर्म मीमांसा अशी नीतीची ढोबळ मानाने व्याख्या करता येईल. इसापनीती, हितोपदेश, पंचतंत्र हे सर्व सामान्य व्यवहाराचे नीतीग्रंथ होत. महाभारतात देखील कणिकनीती, विदुरनीती, आपद्धर्मपर्व, यक्षप्रश्न (धर्म यक्ष संवाद), भीष्मपर्व आणि भगवद्गीता असे सामान्य व्यवहाराचे तसेच 'प्रस्थान त्रयीत' देखील जागा पटकावणारे अनेक प्रबंध आहेत. पण धर्म किंवा नीती यांचा पाया भौगोलिक असतो असे बट्रांड रसेल म्हणतो त्याचा विसर पडून चालणार नाही. खोटे कधी बोलू नये, चोरी कधी करू नये असे सांगता ऐकताना केव्हा खोटे बोलले तरी चालेल, केव्हा चोरी करावयास हरकत नाही या प्रश्नांना उत्तरे देण्याचा वकूब पण वक्त्याश्रोत्याला असणे अगत्याचे आहे. जी देशकालानुवर्ती असते तीच यशस्वी नीती. समाजात घर करून बसलेल्या आणि कोणत्याही प्रायश्चित्ताला भीक न घालणाऱ्या प्रथांबद्दल ताशेरे झोडणाऱ्या नीतिबाजाला उपेक्षा किंवा उपहासाला तयार असावे लागते. काही 'आपद्धर्म' म्हणून अदंडनीय असतात. त्या त्या देशाच्या भौगोलिक म्हणजे जमीन, हवापाणी, अन्न आणि इतर अगत्याच्या वस्तूंची अनुकूलता किंवा दुर्मिळता यांवरच नीतियुक्त वागणूक ठरवावी लागते. हे सर्व जाणून जो उपदेश करतो त्यालाच लोक महत्त्व देतात. अगतिक आणि आपद्ग्रस्त माणसांकडून होणाऱ्या सामाजिक, नैतिक अपराधांबद्दल विचारवंतांची कैफियत धर्ममार्तंडांपेक्षा वेगळी असते. 'गुलिस्तान' मधील एका गोष्टीत त्याने एका खोटारड्या आणि फसव्या व्यक्तीचे वर्णन करून त्या लफंग्याने स्वसमर्थनार्थ असे म्हटल्याचे दाखविले आहे की, खोटे बोलणेच पुष्कळदा परवडणारे असते.

फारशी साहित्यात फिरदुसी, मौलाना रुमी, जामी, निजामी असे गंभीर प्रवृत्तीचे उपदेशक प्रसिद्ध आहेत. सादी हा परमधार्मिक असूनही त्याच्या नीतीत प्रस्थापित नीतीस धक्का देणारे अनेक विचार आढळतात. "Gulistan in particular is one of the most Machiavellion works in the Persian Language. Pious sentiments and aspirations abound but they are eminently practical." या शब्दांत फारशी साहित्याचे इतिहासकार ब्राउन यांनी त्याच्या नीतीचे मूल्यांकन केले आहे. या संबंधी "सादी नीती" आणि "आज्ञा पत्र" या लेखात विस्तृत विवेचन आढळेल. त्याच्या गोष्टीतील नीतीची वानगी दाखल उदाहरणे पाहा :–

"दहीविक्या दोन चमचे ताक आणि एक चमचा पाणी यांचे मिश्रणच विकत असतो." दुसऱ्या एका प्रसंगी एक दरिद्री मनुष्य बलात्कारा (बालकाच्या) च्या आरोपाबद्दल असे म्हणतो, "मी काय करू ? मला लग्न करण्याची ऐपत नाही आणि ब्रह्मचर्याला इस्लामी धर्मात मनाई आहे."

हा विषय बाजूला ठेवला तरी धर्माच्या आज्ञांचा विचार देशादेशांतील नीती अनीतीचे सोवळया-ओवळयाचे, श्लील-अश्लीलाचे विषय आणि मानदंड वेगळे असतात आणि काही देशांचे, समाजांचे किंवा पंथांचे काही अवघड प्रश्न (tender points) असतात. त्यांची निंदा करणे स्वजनद्रोह होतो आणि केली नाही तर अनाचारच कायदेशीर ठरतो. आणि काही देशात तशी कायदेशीर तरतूद केली जाते. इंग्लडमध्ये आता समसंभोगाला कायद्याची हरकत नाही. भारतातील नीतिग्रंथात लैंगिक अपराधांत व्यभिचार वेश्यागमन निषिद्ध किंवा अगम्यगमन (Incest) यांची प्रामुख्याने गणना होते पण कोणत्याही नीतिपाठात बालसंभोगाबद्दल चर्चा-उपदेश आढळत नाही. कारण येथील सामाजिक जीवनात 'तो' प्रसंग सहसा कोणावर येत नाही. पण सादीने आपल्या गुलिस्तानात एक अध्यायच यासाठी खर्ची घातला असून त्यात 'बाल' (अमरद) संभोगाची निंदा केली आहे. तो जेव्हा म्हणतो, तुझ्या शेजाऱ्याच्या 'मुलावर' डोळा ठेवू नकोस, कारण तो तुझ्या मुलाला सोडणार नाही.' तेव्हा आपल्याला काहीतरी विचित्र ऐकल्यासारखे वाटते.

शिवाय सूफीसंप्रदायात उस्ताद, वल्ली यांसारख्या थोरांनी असल्या हीन प्रकाराचे समर्थन सुद्धा केले आहे.

**'मताब अज इष्क रु गरचे मजाजीस्त**
**के आँ बहरे हकीकत कार साजीस्त' — जामी**

(वासनायुक्त (बाल) प्रेमाची खंत बाळगू नकोस, पारमार्थिक सिद्धी गाठण्याच्या सोपानाची ती एक पायरी आहे.) यालाच उद्देशून सादीने त्यांच्यावर आसूड उगारले आहेत.

"हे भोंदू म्हणतात की, परमेश्वराच्या चित्रकलेचे परिशीलन करण्यासाठी त्यांना गोजीरवाण्या पोऱ्याची संगत हवी असते. ठीक आहे. परमेश्वराची चित्रकला नवजात अर्भकातही पाहावयास मिळते. तर मग तुम्हाला बारा वर्षांचा भरीव पोऱ्या कशाला हवा?" (बोस्तान अध्याय ७)

सादी हा मानवी बुद्धीला आकलन होऊ शकेल या बेताने वेदांत सांगतो आणि त्याच्या प्रवृत्तीला मानवेल या अंदाजानेच वागणुकीचे नियम सांगतो. याचा अर्थ तो फार उथळ आहे असे नाही. इस्लामी तत्त्वज्ञानाला वाहिलेले असे अनेक ग्रंथ आहेत पण त्यातील फाजील क्लिष्टता त्याला आवडत नाही. एखादी तत्त्वज्ञान विषयक गुंतागुंत समजावून देताना उपदेशकाला होणारा त्रास आणि ऐकणाऱ्याला येणारा कंटाळा याची त्याला चांगलीच कल्पना असल्यामुळे तो अनेकदा अनौपचारिकपणे नीतिबोध करतो आणि मिस्किलपणाने 'सादी' हा शब्दप्रयोग आणून गंमत करतो.

उदाहरणार्थ दानमाहात्म्य सांगताना तो म्हणतो, "तुझ्या जवळ जे काही द्रव्य आहे ते उधळून टाक! सादी पाहा, तो निर्धन आहे तरी तो आपली काव्यसुमने कशी बिनदिक्कत उधळतो." दुसऱ्या एका ठिकाणी म्हणतो, "प्रेमाच्या लढाईत पलायन कुफ्र (अधर्म) होय! सादी जिवंत आहे त्याचे कारण हे की, इष्काने त्याला केव्हाच ठार केले आहे."

इतका सरळ असून देखील अनेकदा त्याच्या बोधात विसंगतीचा भास होतो. 'व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धि मोहयसीव मे तदेकं वद निश्चित्य' असे वाचकाला त्याला बजावावे लागते. त्याचा बोध ऐकल्यावर तो दैववादी, मनुष्याच्या बुद्धीला अवास्तव, धाडसापासून निवृत्त करणारा, लढाईपेक्षा शांती-शरणागती याचेच महत्त्व सांगणारा असा वाटतो. तरी कित्येकदा तो म्हणतो, "मनुष्याचा पोटापाण्याचा लेख त्याच्या कपाळी लिहिलेला असतो हे खरे असले, तरी दारोदार भटकणे चुकविता येत नाही. शिष्टाचार चांगला खरा पण गरीब विद्वानाला मान देण्यासाठी त्याच्या जोड्याला हात लावण्यापेक्षा त्याला अन्न देऊन वाटेल तर त्याच्या डोक्यावर जोडा हाणावयाला ही काही हरकत नाही." थोडक्यात म्हणजे बाराव्या शतकातील औपचारिकता, असहिष्णुता आणि आत्मप्रौढीचे प्राबल्य पाहता सादी हा अत्यंत साधा आणि आधुनिक चिंतक वाटतो.

"बोस्तान" या ग्रंथाला जोडलेल्या "सादी बोध सार" या परिशिष्टांत संपादकाने सादीच्या तत्त्वज्ञानाचे निरूपण केले आहे. मूळ ग्रंथ वाचण्यास फावत नसेल तर तो भाग साक्षेपी वाचकांनी अवश्य नजरेखाली घालावा.

## ४. फारशी–उर्दू साहित्यातील शृंगारसंकेत

आपल्याला आजकाल असे दिसते की, लोकांना गझल, शायरी वगैरे फार फार आवडतात. म्हणून कित्येक मासिकात 'शायरी' चे खास आकर्षण असते. विशेषत: शृंगाराला वाहिलेली मासिके तर त्यांच्या शोधात असतात. पण भारतीय शृंगाराचा पिंड फारशी इष्कापेक्षा बराच वेगळा आहे. आपल्या साहित्यात शृंगार उत्तान होण्यासाठी भलताच वाव असतो.

भारतीय शृंगार मीलन, सुखद अनुभव, पत्नीकोप आणि क्वचित प्रसंगी विरहक्लेशाच्या वर्णनासाठी उपयोजिला जातो. फारशी साहित्यातील शृंगाराचा खाक्या वेगळा आहे. अत्यंत उल्लेखनीय गोष्ट म्हणजे कवींचा स्वभावधर्म, आणि त्यांच्या कलेतील रसनिष्पत्तीची साचेबंद पद्धती, यांत मोठी विसंगती आहे. कवी हा अत्यंत विलासी; त्याने पाच "श" कारा बद्दल आढेवेढे घेऊ नये असे फिर्दोसीने सांगितले आहे.

" अजी पंज शीन रुए
रुगबत मताव
शबो, शाहिदो, शहदो, शमा ओ शराब "

(यामिनी, कामिनी, मधु, ज्योती आणि वारूणी यांना पाहून तोंड वाकडे करू नकोस.)

हे सूत्र पाहता फारशी श्रृंगार उत्तान असता तर त्यांत काही नवल नव्हते पण भोग्य वस्तूंचे गोडवे गाणारा कवी मात्र प्रणय किंवा मीलनाचे वर्णन करताना सोवळे पणाचा अतिरेक करताना आढळतो. तीच ही विसंगती. माशुकाचा जुलूम व आशिकाच्या यातना यांचे जितके रौद्रवर्णन करता येईल; तेवढे केले म्हणजे यशाचे माप कवीच्या पदरात खचीत पडते.

अगर आँ तुर्के शीराजी बदस्त आरद
दिले मारा
बबख्शम बर खाले हिंदु अश
समरकंदो बुखारारा ! —हाफिज.

(ते तुर्कासारखे पाषाण हृदयी माशुक माझे हृदय हाताशी धरील तर त्याच्या गालावरील काळया तिळावरून मी माझे समरकंद आणि बुखारा येथील राज्य ओवाळून टाकीन. )

उर्दू-फारशी साहित्यातील शृंगाराच्या करुण पिंडाच्या प्रचुर शृंगाराचे काही नमुने पाहा. उर्दू साहित्यात सध्या फैज अहमद फैज या पाकिस्तानी कवीचे युग आहे. त्याच्या काही शृंगारपैकी (कतआत) अशा आहेत.

" आगई फसले सकूँ चाक गिरेबाँ वालो
सिलगये होंट कोई जख्म सिले या नसिले
दोस्तो बजम सजा ओ के बहार आयी है
खिल गये जख्म कोई फूल
खिले या न खिले.

(वसंताच्या मादक आगमनाचे स्वागत करताना कवी म्हणतो, "प्रेम पीडितांनो शांतीचा समय आला. हृदयाची जखम शिवली गेली की नाही कुणास ठाऊक. पण आपले ओठ मात्र शिवले गेले आहेत. मित्रानो, वसंताच्या आगमनाचा आनंद साजरा करा ! एखादे फूल उमलले आहे किंवा नाही हे मला माहीत नाही, पण हृदयाची जखम मात्र फुलली आहे."

प्रियाराधनाचा रंग म्हणजे कत्तलखान्याचेच दृश्य वाटते.

" दीदये तर पे वहाँ कौन नजर करता है
शीशए चश्म में खूनाबे जिगर लेके चलो
अब अगर जाओ पये अर्जतलब उनके हुजुर
दस्तो कश्कोल नही कासए सर ले के चलो

(प्रियेपाशी जातोस ? अरे ! तुझे अश्रू तेथे कोण बघावयाला बसला आहे ! तुझ्या डोळयांच्या कुपीत काळजातील रक्त भरून घेऊन जा. पुन्हा जर याचनेसाठी हुजुराकडे जाशील तर हात आणि भिक्षापात्र काही उपयोगी पडणार नाही. महाराज ! आपली मानच आहेर म्हणून घेऊन जावी लागेल.)

"गझल सुद्धा" "यास" (औदासीन्य) भरपूर असेल तरच यशस्वी आणि दाद" घेणारी ठरते. :—

कबतक दिलकी खैर मनाएँ
कबतक राह दिखलाओगे
कबतक चैनकी मुहलत दोगे
कबतक याद न आवोगे
बीता दर्द उमीद का मौसम
खाक उडती है आँखोंमें
कब भेजोगे दर्दका बादल
कब बरखा बरसाओगे
ओहदे वफा या तर्के मुहबत
जो चाहो सो आप करो
अपने बस की बात ही क्या है
हमसे क्या मनवावोगे ?
किसने वसल ( मीलन ) का सूरज देखा
किसपर हिज्र ( विरह ) की रात ढली
गेसुओंवाले ( कुरळ्या केसाचे माशुक )
कौन थे क्या थे
उनको क्या जतलाओगे
( काय त्याच्या पुढे रडकथा गातोस. )
( वक्ता ) " फैज ! " दिलोंके भाग में है
दिल भरना भी घर लुटना भी
( प्रेमातील यशापयश )
तुम इस हुस्न के लुत्फो करम पर
कितने दिन कतराओगे ! "

### इष्काचे तंत्र

शृंगाराचा प्रेरक साकी; देवता मैफलीतील समई; (शमा) ती शलभाना (परवान्यांना) भस्मसात करून सभिकासमोर स्वतःच जळून राख होते. प्रियेच्या गल्लीत निर्माल्यवत् पडून राहणे हेच आशिकाच्या जिवाचे सार्थक्य. प्रेम पात्राची उपेक्षा

आशिकाचा असहाय्यपणा यात काहीही बदल मंजूर नसतो. कवीचे कौशल्य नवीन काही सांगण्यात नसते तर अधिक उत्कट रीतीने (मार्मिक किंवा मिस्किलपणाने नव्हे) सांगण्यात असते.

**" मस्ते मय बेदार गर्दद नीम शब**
**मस्ते साकी रोज महशर बामदाद "**

(दारू प्यालेला अर्ध्या रात्री तरी शुद्धीवर येतो. साकीने पछाडलेल्या आशिकाला कयामतीच्या दिवशीच (मेल्यावरच) उजाडते.)

या शिवाय शेख -नासिह- उपदेशक बजावतच असतो आणि त्याचा उपदेश कसा व्यर्थ आहे हे सांगणे म्हणजेच शायराचे कौशल्य ! मराठी लोकांना "हाय कंबख्त उसने पीही नही" हे पु. लं. च्या काकाजींचे वाक्य बेहद्द पसंत पडले असले तरी त्याचा साहित्यिक अर्थ सामान्यांना कळणे असंभवनीय आहे. शायरीच्या तंत्राची (technique) जाणीव असल्याशिवाय रसास्वाद घेता येणार नाही. यावरून सामान्यांना सांगण्यासारखे काहीच नसते असे नाही. " इष्कपर जोर नही" हे प्रेमवेड्यांना पटणारे विचार असतातच. पण

**" तौहीँ है दस्तो बाजूकी**
**यह बारभी कुछ भरपूर नही "**

हे 'जिगर' कवीचे म्हणणे (सुंदरीचे रूप हे आशिकाच्या सहनशक्तीपुढे फिके पडते.) विलासवादी भारतीय शृंगाराच्या चौकटीत बसत नाही. यास्तव शायरीच्या शौकीनांना रसास्वाद घेता यावा म्हणून थोडेसे विवेचन केले आहे.

उत्तान शृंगार तर वर्ज्यच. पण स्त्रीदेहनिष्ठ वर्णनेही उर्दू-फारशी साहित्यात वर्ज्य आहेत. फार काय 'दोस्त' ('माशुक', 'कातिल' (मारेकरी))हा पुरूषच असावा लागतो. त्याचे सामाजिक कारणही आहे. मुस्लिम समाजात स्त्रीसौंदर्य बुरख्यात असते. आणि वर्ण्य सौंदर्य पोरांचेच असणे स्वाभाविक आहे. साहित्यिकांना देखील स्त्रीप्रधान शृंगार साहित्याच्या कक्षेतून वगळावा असे वाटते. काही विद्वान याबद्दल अशीही मल्लीनाथी करतात की, फारशी भाषेत स्त्रीपुरुष, लिंगभेद व्याकरणात आढळत नाहीत. 'अनेक वचनी स्त्रीलिंगी रूपे' अशी वेगळी रूपे नसतात. म्हणून माशुकाला उद्देशून म्हटलेली पुल्लिंगी (वो आते हैं वो आये - आगये वो , दिले नादाँको समझाये जा रहा हूँ) रूपे खरे पाहता स्त्रीलिंगी असू शकतात, असा युक्तिवाद पेश करतात पण हे म्हणणे वास्तवतेशी विसंगत आहे. कित्येक प्रेमकथांत आशिक माशुकाला म्हणतो "जा तुझा डौल किती दिवस दाखवशील. उद्या तुझ्या मुखचंद्रावर गवत (दाढी) उगवेल, तर तुला कोणी विचारणार नाही."

"माशुक मस्तवाल असते. जून होत जाईल त्याप्रमाणे नम्र बनते." (गुलिस्तान) असे स्पष्ट उल्लेख आढळतात. 'षोडशी' लावण्याच्या कळसाला पोहोचलेली असते

तर षोडश वर्षीय 'बाळयाचे' तोंड 'काळे' झालेले असते, म्हणून मराठी वाचकांना असे सांगावेसे वाटते की, या इस्लामी समाजातील 'नीती' बोधाने आणि उर्दू-फारसी शृंगारातील या उलटचा प्रकाराने बिचकून जाऊ नये. कारण प्रीतीचे काव्य (गझल) कवीला हाताळावेच लागते आणि त्यांतच त्याने आपले वैशिष्टय (बात बनाना) दाखवावे लागते. विशिष्ट तंत्राची ताबेदारी करण्याची सक्ती असल्यामुळे त्याला मुक्त कल्पनाविलास करता येत नाही.

हा शृंगार जसा मीलन-सुख प्रधान कधीच नसतो, तसा नैतिकतेलाही वाहिलेला नसतो. या रसाचा आविष्कार यशस्वी होण्यासाठी उपमान-उपमेय यांच्या बाबतीत रौद्र रसाचीच मदत घ्यावी लागते. माशुकाच्या नखाची लाली त्याच्या गौर कायेचे प्रतीक नसून त्याने आशिकाचे काळीज तोडताना लागलेल्या रक्तामुळे असते. 'मुख' कधी कमळासारखे रमणीय नसतेच. ते 'लाल्या' सारखे (उग्र) लाल असते. मनोज्ञ हरिणाक्षी येथे नाही. डोळे फाडून पाहणारे 'नर्गिस' गस्त घालीत असते. केश (झुल्फ) 'संबुल' सारखे आवळणारे असतात. गुलाब (गुल) गाल आणि ओठ यांचे मार्दव दाखविण्यापेक्षा त्यांच्याशी सलंग्न असलेल्या कंटकाची (खार) सारखी आठवण करून देत असतो. हे 'पुष्पचतुष्टय' सौंदर्योपवनाच्या विहाराचा आनंद देते.

**" दर नक्शाए रुखत**
**गुल गस्त बुस्ताँ मी कुनम**
**वाह ! चे संबुल !**
**वाह ! चे नरगिस ! !**
**वाह ! चे लाला ! ! !**
**वाह चे गुल ! ! ! !**

(तुझे वदन पाहिले की, बागेत चक्कर मारल्यासारखे वाटते.)

**वाह ! संबुल पाहा ।**
**वाह वा ! नरगिस**
**वाह वा, काय लाल्याचा झोक**
**वाह वा काय गुलाबाचा दर्प )**

"गुलो बुलबुल" बागेतील गुलाब व त्याच्यावर मोहित झालेला बुलबुल ही प्रेमिकांची जोडी! आशिकाच्या आशेचे हे 'घरटे' (आशियाँ). त्याचा विध्वंस करणारी बर्क (वीज) ! आणि तरी आपण सलामत आहोत याची ग्वाही देण्यातच धन्यता मानणारा प्रेमी कधी कधी आपण किती शहाणपणाचा युक्तिवाद करतो हे दाखविण्यातच तो मशगूल असतो.

" गिरा कल बर्क जिस पै
वह मेरा आशियाँ क्यौं हो

(काल ज्याच्यावर बीज कोसळली ते माझे घरटे कशावरून ? म्हणून मी कशाला दु:ख वाटून घ्यावे ?)

प्रेमाचे आलापही असेच ठरीव साच्याचे आणि आपल्यापेक्षा वेगळे. दोस्त (प्रेमपात्र) मोठा कातिल (मारेकरी) असतो. त्याच्या गल्लीत (कूये यार) प्रवेश करून दर्शनासाठी प्राण पणास लावणे, लाथाबुक्क्या सहन करणे, बदनाम होऊन हाकलले जाणे (बहोत बदनाम होकर तेरे कोचेसे हम निकले) हे खऱ्या प्रेमाचे मानदंड होत. 'प्रेमपात्राच्या गल्लीतून जिवंत परतणारा किती भ्याड' असे वफादार (एकनिष्ठ) आशिक म्हणतो. प्रेमाचे सार्थक्य यातना (जफा) भोगूनच होते. विरहा (हिज्र) च्या दाहाने तोंड पिवळे पडते. पापण्याच्या दाट केसातून सुटणारे बाण काळजावर (जिगर) आघात करतात तेव्हा वाहणारे रक्तच (खूने जिगर) प्रेमिकाला प्यावे लागते. खऱ्या प्रेमाच्या आवेशामुळे सदऱ्याचा गळपट्टा (गिरेबान) तर फाटतोच शिवाय अंगावरील कपडे फाडल्याशिवाय अनुरागी शांत होत नाही.

**थोडक्यात म्हणजे जेथे मीलन आणि विलास आहेत तेथे गजल नाही, आणि बोसो किनारा ( चुंबनालिंगना ) पलिकडे शृंगाराची मजल नाही.**

गुलिस्तान आणि बोस्ताँ या ग्रंथांच्या परिशीलनाने साहित्य जगतातील किंवा जागतिक साहित्यातील एका नवीन दालनात शिरल्याचा अनुभव येतो. हौसेने (फॅशन म्हणून) 'गजल' किंवा 'शायरी' म्हणताना त्यातील खरा अर्थ (जो मासिकातील उताऱ्यांतून आढळतो तो नव्हे) समजला तर **अतुलनीय आनंद** होईल.

## ५. गुलिस्तान आणि बोस्ताँ

मागे सांगितलेच आहे की वर्ण्य विषयांच्या दृष्टीने आणि घडणीने गुलिस्तान आणि बोस्ताँ यात फारसा फरक नाही. गुलिस्तान गद्यपद्यात्मक रचना असून त्यात अत्यंत त्रोटक पण सहृदय शैलीत लोकानुभवाचे चुटके दिलेले आहेत आणि नीतिपाठासाठीच सुटसुटीत वाक्यांचा आणि सादीप्रणीत म्हणींचा संग्रह त्यास जोडला गेला आहे. सामान्य वाचकाला तोच सरस वाटतो आणि तोच अत्यंत लोकप्रिय आहे. खुद्द सादीलाच तो फार आवडलेला दिसतो. " बागेतील फुले उद्याच सुकतील. ती काय वेचत बसलास ? माझ्या गुलिस्तानातील फुले कल्पांतरापर्यंत कोमेजणार नाहीत. त्यातूनच पाने उचल " (बिबर वरके) असे तो तोऱ्याने सांगतो.

असे असून देखील बोस्ताँ हा काहीसा बोजड ग्रंथ का लिहिला असा प्रश्न साहजिकच पडतो. त्याचे स्पष्टीकरण केलेच पाहिजे. म्हटल्यास 'गुलिस्तान' हे गप्पाष्टक आहे; तर बोस्ताँ ही मसनवी (महाकाव्य) आहे. यात महाकवीला शोभणारे विषय, शोभनीय गांभीर्याने हाताळले गेले आहेत. यात विचारवंतांना मनन करण्यालायक बरेच अनुभव आणि विचार आहेत. यातील 'प्रेम प्रकरण' परमप्रियतमाला वाहिले गेलेले (इष्के हकीकी) आहे तर गुलिस्तानातील 'शृंगार' रसिक रंजक (इष्के मजाजी) आहे. या शिवायही हातिमताईचे अलौकिक औदार्य, पैगंबर युसुफचा आपल्यावर मोहीत झालेल्या जुलेखाने केलेल्या चढाईबाबतचा वैचारिक संयम, सोमनाथच्या मूर्तीबद्दलचे धाडसी प्रयोग अशी काही बोस्ताँची वैशिष्टये आहेत. सादीचा मूळचा विद्वानाचा आणि विचारवंताचा पिंड बोस्ताँमध्ये अधिक स्पष्टपणे व्यक्त झाला आहे. यातील पदलालित्य, अर्थगांभीर्य आणि समर्पक युक्तिवाद यांच्या बाबतीत आजपर्यंत कोणीही त्याच्या दर्जाला पोहोचू शकलेला नाही.

## ६. मृत्यू

शंभरावर सहा ते वीस वर्षे अधिक काळ जगून भोवतालच्या अस्थिर आणि अवनतीच्या गर्तेकडे चाललेल्या राजकीय परिस्थितीने दु:खित होऊन हिजरी सन ६९२ मध्ये (इ. स. १२९१-९२) मध्ये सादीने आपल्या जन्मगावीच–शिराज येथेच देह ठेवला आणि तेथेच म्हणजे शिराजच्या उत्तरेला २ मैलावर असलेल्या 'सअदिया' येथे त्याची कबर आहे. या ठिकाणी आणखी एक गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. इराण हा शियांचा देश आहे, आणि सुन्नी संतांना तेथे मान नाही. सादीचे थडगे देखील अनेक वर्षे उपेक्षितच होते. इराणची राष्ट्रीय अस्मिता मिर्जा रजा शहा पेहेलवी याने जागृत केली. सध्याचा बादशहा आर्यमिहिर मुहम्मद रजा शाह त्याचाच मुलगा असून त्याने राष्ट्रीय महत्त्वाच्या स्थानांचा पुनरुद्धार केला आणि इ. स. १९५१ मध्ये सादीचा भव्य मकबरा बांधला गेला. सादी सुन्नी होता तरी देखील अजूनही इराणचे लोक आठवडयातून एक दिवस त्याच्या मकबऱ्याचे दर्शन घेतात. शिवाय हे स्थान पर्यटन केंद्रही बनले आहे.

जागतिक पातळीच्या साहित्यिकात सादीची गणना केली जाते. कारण त्याचे गुलिस्तान, बोस्ताँ हे ग्रंथ देशकालाबाधित मानव मूल्यांना उचलून धरतात. ग्रीसचा होमर, इंग्लडचा शेक्सपियर, आणि भारताचा कालिदास यांच्या तोलाचा इराणचा साहित्यिक सादीच म्हणावा लागेल आणि त्याची जागा घेण्याएवढा प्रतापी आजपर्यंत फारसी साहित्यात कोणी झाला नाही. त्याचे साहित्य मध्ययुगीन इस्लामी जगताचे वास्तव चित्रण आहे. स्वत:च्या आयुष्यात आणि त्यानंतर सातशे वर्षांनंतरही त्याच्यासारखा स्फूर्तिदायक कवी क्वचितच आढळतो.



शीराज : सादिया येथील सादीचा नवा मकबरा.

[ सौजन्य : ईरान कल्चर हाऊस, मुंबई ४. ]

## ७. सादीप्रणीत राजधर्म आणि 'आज्ञापत्रा'तील शिकवण

शेख सादी स्वभावत: दरवेश होता आणि हातापायात शक्ती असेतोपर्यंत बादशहापुढे हात पसरावयाचा नाही आणि दरबारी जीवनाच्या वाटेला जावयाचे नाही असे त्याने ठरविले होते. आयुष्याची सत्तरी गाठल्यावर मात्र त्याने अताबक अबूबकर साद बिन जंगी या विद्याप्रेमी तुर्क बादशहाचा लोभ संपादन केला. ह्या अनुभवातून त्याने आपल्या गुलिस्तान आणि बोस्ताँ या ग्रंथातून राजधर्माबद्दल आपले विचार मांडले आणि राजाप्रमाणे अधिकारी वर्गालाही जागोजाग आपल्या कर्तव्याची जाणीव करून दिली आहे.

बाराव्या शतकापासून तार्तर–मोंगल, तुर्की या मुस्लिम द्वेष्टया परकीय हल्लेखोरांच्या आणि आक्रमकांच्या प्राबल्याने बगदाद हे जागतिक मुस्लिम सत्ताकेंद्र (खिलाफत) धुळीस मिळाले. इस्लामचा त्राता कोणी राहिला नाही. सर्व धर्मपंडित देशोधडीस लागले. त्या वेळी इस्लाम धर्म वाचविण्यासाठी जे विचारवंत झटत होते त्यांत सादीचा क्रमांक सर्वात पहिला. तुर्कांच्या जुलुमाला कंटाळून म्हणा, किंवा प्रलोभनाला बळी पडून म्हणा, "जहीर फारयाबीसारख्या कवींनी (१२ वे शतक) 'अल्लाहाची' खुर्ची (अर्श) 'अलप अर्सलान' या तुर्की राजाच्या पायाशी आहे" असे आपल्या कसीद्या (स्तवना) त मध्ये म्हटले. हे सर्व केविलवाणे दृश्य कट्टर मुसलमान सादीला असह्य झाले होते.

राजधर्मावर निजामुल्मुल्क तूसी (हि.४४० इ. स. १०८५) यान 'सियासतनामा' हा प्रबंध लिहिला व तो राजमान्यही झाला. पण त्यानंतर दोनशे वर्षांनी रूढ झालेल्या सादीच्या तत्त्वज्ञानाला त्यावेळच्या इस्लामच्या संकटमय परिस्थितीमुळे विशेष महत्त्व प्राप्त झाले. त्यात त्याने शत्रुदमनाबद्दल जे दंडक घातले आहेत ते कणिकनीती कौटिलीय अर्थशास्त्राची आठवण करून देतात. त्याला ब्राऊन साहेबांनी दिलेले 'माकावेलियन Machavelian' हे विशेषण चपखल बसते. 'यवनेशा' चा सर्वत्र जोर असताना हिंदूंच्या धर्माचे अणि जीविताचे रक्षण कसे होईल, त्यांची सत्ता पुन्हा कशी स्थापित होईल या चिंतेत छत्रपति शिवाजी महाराज आणि समर्थ रामदास होते. दासबोधात आणि 'आज्ञापत्रा'त याच भूमिकेचे निरूपण आहे. फरक एवढाच की सादीने इस्लामच्या संदर्भात मोंगलाबद्दल जे म्हटले आहे तेच दासबोधात व 'आज्ञापत्रात' मोगलांबद्दल म्हटले गेले आहे. 'यवनेशाच्या' राजनीतीत (आज्ञापत्र पान ६) 'सादी'ला आगळे स्थान होते. बल्बनपासून औरंगजेबापर्यंत सर्वच राज्यकर्त्यांना तो गुरुस्थानी होता. खिलजीच्या (१२९२) दक्षिण दिग्विजया-नंतर चारशे वर्षे दख्खनात मुसलमानांचेच अधिराज्य होते. तरी ते बव्हंशी मराठा देश-

मुखांच्या जिवावर जगत होते. अशाने यावनी राजकारणाशी मराठ्यांचा दाट परिचय झाला. ते भाडोत्री (mercenary) होते तोपर्यंत फक्त ते राज्यकर्त्यांचे अनुकरणच करीत. त्याकाळात राजधर्म व नीती याबद्दल साहित्य उदयास आले नाही. छत्रपतींच्या स्वराज्यस्थापनेनंतर मात्र 'राज्य' रक्षणाकरिता राजधर्माचे विवेचन करणे भाग पडले. मराठ्यांनी राज्य संपादन, विस्तार आणि स्थिरीकरण या बाबतीत हिंदूंच्या शास्त्राचे आणि संस्कृतीचे परिपालन केले यात शंका नाही. परंतु ज्या यावनी राजनीतीशी त्यांना खिलजीच्या काळापासून अविरत संपर्क होता तिच्यापासूनसुद्धा त्यांनी बराच बोध आत्मसात केल्याचाही पुरावा थोडाथोडका नाही. सादीने प्रजारंजनाबद्दल, सैन्याची ताकद राखण्याबद्दल, अधिकाऱ्यांना आवरण्याबद्दल इराणच्या फरीदून, नौशिरवान या न्यायी आणि कुशल राज्यकर्त्यांची मते उद्धृत केली आहेत; काही गोष्टी दिल्या आहेत आणि शेवटी सुटसुटीत दंडकेही सांगितली आहेत. राजाने आपल्या सत्तेवर आसक्त राहू नये; हे जग नश्वर आहे आणि त्याने आपली कीर्ती मागे ठेवण्यासाठी सत्कार्य करावे. "फलाणा होता" असे लोक म्हणू लागण्यापूर्वीच सत्कार्य करावे. राजाने प्रजेकडून एक अंडे घेतले तर त्याचे अधिकारी त्याची कोंबडीच खतम करतील असा तो इशारा देतो. आपले बळ ओळखून राजाने क्वचित् प्रसंगी पळ काढावा शत्रूत फूट पडली असता क्षणमात्र विलंब लावू नये; दुष्टाला दया दाखविणे म्हणजे सज्जनांचा घात करणे होय; कोणाचाही वृत्तिछेद करू नये, गरिबांचे निश्वास राज्यच पेटवून देतील; अशी तत्त्वे सर्वत्र आढळतात. त्याच्या काही गोष्टीतून काही विचित्र वाटणारी तत्त्वेही आढळतात. एक बादशहा एका सत्यवचनी प्रधानाला दटावून माणुसकीसाठी खोटे बोलणाऱ्या दुसऱ्या एका सरदाराची पाठ थोपटतो. त्याचप्रमाणे जुन्या राजाने कष्टाने गोळा केलेला पै-पैसा नव्या राजाने उधळू नये असे सांगणाऱ्या वजिराचा नक्षा उतरवितो. फार काय ज्याच्यावर बलात्काराचा आरोप होता त्या न्यायाधीशाला (काजीला) त्याच्या हितशत्रूंचे फावू नये एवढ्यासाठीच माफी देतो. अलेक्झांडरच्या गोष्टीत त्याच्या यशाचे मर्म त्याने पराजित राजांचा केलेला गौरव आणि प्रजेच्या परंपरांची जपणूक यांत दाखविली आहे. (पाहा 'गुलिस्तान' मराठी अनुवाद. गुरुनाथ दिवेकर. प्रकाशक राष्ट्रभाषा प्रचार सभा, पुणे. १९६७)

"यावनी" नीतीचे आणि राजनीतीचे प्रत्यक्ष अनुभव प्रत्यही शतकानुशतके येत असल्याने मराठ्यांना सादीचे नाव माहीत नसताना देखील त्याने मांडलेल्या सिद्धांताची प्रतिती येतच असली पाहिजे.

**आज्ञापत्र – अर्थात शिवाजी राजाची राजनीती—** (श्री. ना. बनहट्टी सुविचार प्रकाशन मंडळ नागपूर व पुणे १९६१) ("श्री. शिवप्रभूने जे मराठ्यांचे स्वराज्य स्थापले त्याच्या बुडाशी असलेल्या राजनीतीची विशिष्ट तत्त्वे विशद करून सांगणारा असा एकमेव ग्रंथ मराठीत आहे." (पान १०)

या छोटया ग्रंथाची भाषा परिभाषा (technical terms) घटना आणि युक्तिवादाचा रोख पाहिल्यावर या नीतिग्रंथाची ( polity ) प्रेरणा पुराणे महाभारतादि शास्त्रांतून घेतलेली दिसत नसून प्रत्यक्ष 'यावनी' व्यवहाराच्या अध्ययनातून अनुभवातून घेतलेली आहे हे स्पष्ट होते. म्हणूनच ग्रंथकर्त्यांच्या नावाबद्दल इतिहासकारांच्या शिरस्त्याला अनुसरून अनेक वाद आहेत. तरीदेखील शिवाजी महाराजांनी आपण स्थापलेल्या स्वराज्याच्या जोपासनेसाठी जे नियम अमलात आणले आणि पायंडे पाडले त्यांच्या निरुपणात म्हणजे 'आज्ञापत्रात' आणि गुलिस्तान, बोस्तांमधील काही 'बोधवचनात' आणि गोष्टीत बरेच साम्य आढळते.

## आज्ञापत्र-अर्थात शिवाजी राजांची राजनीती

### काही सूचक समान विचार

**प्रकरण १ (१) भक्ती-** ......श्रीने या राज्याची अभिवृद्धीचा कीर्तीलाभ स्वामी महाराजाचेच विभागास आणिली ऐसे समजोन यथास्थित ईशस्मरण करून........सर्वही अपलाले अधिकारानुरूप राजकार्याविषयी सानुरक्त व उद्योगतत्पर केले. "या वचनाची" खलीफ उमर याच्या नंतर अबूबकर सारखा धर्मरक्षक न्यायी राजा कोणी झाला नाही" ह्या बोस्तानमधील वाक्याशी तुलना करावी.

(२) **मुत्सद्देगिरी**-काटक सकलही पराक्रमी सजुते सामान पूर असता बुद्धिवैभवे व पराक्रमे कोण्हाची गणना न धरिता, कोण्हावरी चालोन जाओन, तुंबळ युद्ध करून रणास आपले कोण्हावरी छापे घातले, कोणास परस्परे कलह लाऊन दिल्हे, कोणाचे मित्रभेद केले, कोणाचे दर्शनास आपण होऊन गेले कोण्हास आपल्या दर्शनास आणिले, कोण्हास परस्परे दगे करविले. ( दगा हा 'यावनी' शब्द महत्त्वाचा आहे ) जे कोणी इतर प्रयत्ने नाकळते त्यांचे देशात जबरदस्तीनें स्थळे बांधून पराक्रमे करून आकळिले. यैसे ज्या ज्या उपाये जो जो शत्रु आकलावा तो तो शत्रु त्या त्या उपाये पादाक्रांत करून साल्हेरी अहिवंतापासून नदी कावेरीतीर पर्यंत निष्कंटक राज्य, शतावधी कोट किल्ले, तैसीच जलदुर्गे व कितेक विषमस्थळे हस्तगत केली." सादीने अबूबकराला अलेक्झांडर पेक्षा मोठा मुत्सद्दी ठरवून असे म्हटले आहे की अलेक्झांडरने दुष्टांना (याजूज माजूज) पायबंद घालावयास शिशाची भिंत बांधली तर अताबकाने पैसे चारून दुष्टांना चीत केले.

(३) **प्रजापालन**-ज्या राज्याचा बंदोबस्त यैसा होता जे, इतर स्थलिकास व सकल मांडलिकास व देशाधिकारी यास आपले देशसंरक्षणविषयी याच युक्तीचा आधार या राज्यातील नीती व मर्यादा सर्वांनी सिकोन जाव्या, त्या राज्याचा यैसा विखलित प्रसंग पाहून **राज्यातील प्रजा म्हणजे तोच राज्याचा जीवनोपाय** ते प्रजा इतर अनेक क्षुद्रोपद्रवांमुळे बहुत पीडा पावली..."स्वामीने त्या सकल प्रजेस

अभय देऊन त्यांचे संपूर्ण उपद्रव दूर केले. ज्याचा जैसा श्रम, ज्याचा जैसा व्यवसाय आणि ज्या भूमीस जैसे पीक, ज्या ठाई जैसा उपाय, तो सर्वही मनास आणून तदनरुप प्रतिवर्षी प्रजेपासून याप्रमाणे घ्यावे यैसा येक नियम केला."

यातील मुद्दे गुलिस्तानातील बुजुरचिमिहिर नौशेरवां हारून उरँशीद यांच्या गोष्टीतून विशद केले आहेत.

(४) **शक्तिसंग्रह**–मावळे, आडाव इटेकरी पटरत बाकारत या वेगळे बंदुखी दुरूस्तादाज, कानडे, तोरसाली व जांगडे बंदुखी व तिरंदाज यांची संचणी करून हशम मेळविले.

तुलनेसाठी 'कुरूप राजपुत्र' व गुलिस्तानातील अन्य काही गोष्टी वाचाव्यात.

(५) **शत्रु**–"पुढे पराक्रमात राज्य हस्तवश करावे त्यास सानीधंवासी शत्रु म्हणजे केवळ उदरातील व्याधी (**फारशी–मारे आसतीन–अस्तानीतील साप**) त्याचा पराभव आधी करावा या विचारे शामल (इंग्रज ?) केवळ राज्याचि उपायाचेच कारण यवनेशाचे मनोरथाचे साधन त्या शामलाकरिता पहिले मुख्य शत्रूची कार्यसिद्धी विशेष जाली."

शत्रू बद्दल निर्धास्त कधीच राहू नये यासंबंधी गुलिस्तानात पंधरापेक्षा अधिक गोष्टी आहेत.

**स्वराज्य**–नर्मदेपासून श्रीरामेश्वरपर्यंत स्वामीचे राज्य निःकंटक जाहले हा स्वामींचा मनोदय चित्ती होता तैसा श्रीदयेने व तुम्ही लोक स्वामीचे हिंदु राजकार्य धुरंधर राज्यभिवृद्धिकर्ते तुम्हा सेवक लोकांचे अंगेजणीने (उठावाने) सिद्धीस पावला. तुम्हा सेवक लोकांचे सेवेचे सार्थक झाले.

सादीकृत अताबक स्तुतीमध्ये त्याने त्यास इस्लामचा एकमेव पाठीराखा म्हटले आहे.

**फकीर जोगी**– वेषधारी फकीर जोगी जंगमादी केवळ दांभिक भुताटकी करून फिरणार याचा विश्वास न धरता, मोह न पावता अल्प स्वल्प भिक्षा देऊन वाटेस लावावे.

कंथा धारण करून अधर्माचरण करणाऱ्या दरवेशापेक्षा दुसऱ्याला दान करून स्वतः चैन करणारा सामान्य माणूस श्रेष्ठ असे सादीचे मत गुलिस्तान आणि बोस्ताँ मध्ये अनेक गोष्टीतून व्यक्त केले गेले आहे. अंध, पंगु, आतुर, अनाथ व अनुत्पन्न (बेकार जे असतील त्यांच्या ठाई) भूत दया धरून ते निवांत असिजे तो त्यांच्या जीवनोपाय करून देऊन चालवीत जावे. (पृ. १५)

**सेवक**– ज्या कार्यास जो जेथे योग्य तो तेथेच ठेऊन त्याचा उपयोग घ्यावा. (गुलिस्तानातील पशुवैद्याकडून औषधोपचार घेणाऱ्या शहाण्याची गोष्ट पाहा.)

**श्रम व कला**–"सादीने कला आणि श्रम यांचे महत्त्व मुक्त कंठाने गायिले आहे 'बादशहापुढे मान वाकवून हात छातीवर ठेवण्यापेक्षा तो हात चुना-मातीमध्ये घाल'. असे तो म्हणतो पण या बाबतीत हिंदूंचे 'सोवळेपण' आड येते असे दिसते. . ." **सकल शिल्पांचे हुन्नर अवश्यमेव अवगत करून ठेवावे परंतु हे श्रमावह धंदेस्वांगे करीत** न जावे काय म्हणोन की या व्यसनी गुंतलीयाने अथवा यामुळे एखादा शरिरोपद्रव जालियाने राजकार्यास अंतर पडते. (पृ. १६)

**भाट आणि मंत्र ( गुपित ) भेद**–सादीने बोस्तांत मंत्रगोपनाबद्दल बरेच लिहिले आहे आणि नालायकांची गय न करता कारभारातून दूर ठेवावे असे सांगितले आहे. (अध्याय ७) "हे लोक (भाट) कारभाराचे समयी आणू नयेत काये म्हणोन की कारभार विरहित रिकामे लोक कारभारात असलिया कित्येक कार्ये प्रगट बोलावयाची कित्येक गौप्य करावयाची आहेत, त्यास कारभारी लोकास इतर लोकांचा संकोच प्राप्त होऊन अंतर पडते." (पान १८)

**वेतन**–"सेवक लोकांची वेतने नेमस्त करून बिलाकुसूर पाठवावी. कार्य विशेष केलिया अथवा कुटुंबस्त असलिया काही बक्षीस म्हणोन द्यावे परंतु ज्या हुद्दयावर कार्य विशेष केल्याने अधिक वेतन न करावे" याच्याशी गुलिस्तानमधील "घोडयाची जीन विकणारा सैनिक आणि सादी यांच्या संभाषणाची" तुलना करावी.

**मौन**–"राजे लोकी परिमित बोलत जावे. कार्यविरहित हर कोण्हासी तरी भलत्याच गोष्टी बोलत बैसो नयेत, "(पान २३) या संदर्भात गुलिस्तान बोस्तां मधील मौन माहात्म्य पाहा.

**शिक्षण**–"शास्त्राभ्यास, लेखनाभ्यास अनालस्यपणें निष्ठुरवादे करवावा" (पान २५.) शिक्षक गरीब असेल तर पोरे रस्त्यात कबड्डी खेळत रहातील, हे सादीचे वचन पाहावे. "शिक्षण" या अध्यायातील (गुलिस्तान) अनेक गोष्टीतून 'निष्ठुरवादी' शिक्षणावर भर दिला गेला आहे.

**सहिष्णुता**–"सेवक लोका पासोन दोष सोडावयाच्या युक्ति सहिष्णुपणा विरहित होत नाहीत" (पान २६) (बोस्तां) (अध्याय १) मधील 'सहसा विदधीत न क्रियां' या अर्थाचा राजाला उद्देशून केलेला उपदेश पाहा.

**साहुकार**–"साहुकार म्हणजे राज्याची व राजश्रीची शोभा. साहुकाराकरिता राज्य आबादान होते. (पान ३३) गुलिस्तानमधील 'सादी-दरवेश' संवाद पडताळून पहावा.

**श्रीमंतच धर्म कार्यरत होऊ शकतो**
**गरीब पोटाच्या चिंतेत असतो**
**( परागंदा रोजी परागंदादिल**
**खुदावंदे रोजी बदीन मुस्तगिल )**

त्याचप्रमाणे त्याने असेही म्हटले आहे की श्रीमंतांना औदार्य नसते आणि उदारांना श्रीमंती नसते.

**( करीमाँरा बदस्त अंदर दिरम नीस्त**
**खुदावंदाने नयमत रा करम नीस्त )**

**वृत्तिलोप**– "वृत्तिलोप केलियाने परम पातक आहे. कदाचित् वृत्तिवंताने अपराध केला तथापि त्यास यथाशास्त्र शासन करावे परंतु वृत्यपहार करावा हे विहित नव्हे." (पृ. ३९)

**" अल्लाह पामराचीही भाकर तोडत नाही "**
**( गुलिस्तान )**

राजनीतीवरील या एकमेव ग्रंथातील विचारसरणी सुपरिचित अशा यावन-नीतीच्या अनुभवावर आधारलेली आहे. महाभारतातील 'कणिक नीती' शी ही राजनीती जुळणारी असली तरी 'कणिक' हे कनिष्क या शक (यवन) राजाचे रूप असावे असा तर्क श्री. वै. का. राजवाड्यांनी केला आहे.

या विवेचनावरून काही अपवाद वगळता मराठ्यांच्या 'आज्ञापत्रात' आणि सादीच्या 'राजधर्मात' बरेच साम्य आहे असे दिसून येईल.

## ८. इराण आणि आर्यावर्त

३००० वर्षांच्या धार्मिक मानववंशीय, सांस्कृतिक, भाषिक आणि साहित्यिक संबंधाचा मागोवा.

अयरान वाएज आणि आर्यावर्त ह्या दोन आर्यांच्या कर्मभूमी होत. सुमारे तीन हजार वर्षांपासून कास्पियन समुद्राच्या किनाऱ्यापासून ब्रह्मपुत्रेच्या खोऱ्यापर्यंतच्या इतिहासाची साधने समानच आहेत.* 'भारताचे आणि इराणचे पुरातत्त्व शास्त्र (Archaeology) जवळ जवळ सारखेच आहे' असे आर. जी. लॅथॅम म्हणतात. हिंदू आणि इराणी लोक आर्य संस्कृतीचे प्रतिनिधी होत, असे प्रा. पूर दाऊद यांचे म्हणणे आहे. ह्यांचा मूळ देश कोणता, 'आर्य' ही भाषा की वंश, या प्रकारचे वाद मागील दोन शतकांपासून अस्तित्वात आहेत. स्थूलमानाने असेही म्हणता येईल की आर्य हा मध्य आशियातून निघालेला एक मानववंश मेडिया (दक्षिण इराण) आणि सिन्धुदेशात वसाहती करून राहिला. त्याला प्रथम मेडियन (Median) असीरियन किंवा पूर्व द्राविड आणि नंतर अरब, तुर्क, मोंगल आक्रमक यांच्याशी लढावे लागले. हीच भारतातील आर्यांच्या इतिहासाचीही रूपरेषा आहे. सन १९२० मध्ये रजा शाह पहलवी या राजाने काजार या शेवटच्या तुर्की सुलतानांची सत्ता झुगारून आर्यांचा सर्वतोपरि स्वतंत्र देश बनविला आणि मुहम्मद रजाशाह याने (राज्यारोहण १९५१)'आर्यमिहिर'

*आर्यावर्ता पुण्य भूमिर्मध्ये विन्ध्य हिमालयोः–अमरकोश.

हे विरूद आपल्या आर्य वंशासाठी निश्चित केले. धर्माच्या दृष्टीने झरतुष्ट्राच्या अग्नि-असुर (अहुरमज्द) मित्र या देवतांना तोषविणारा धर्म वैदिकधर्मापेक्षा वेगळा नव्हता. पण हजारो वर्षांच्या दुराव्याने 'पूर्वदेवतांमध्ये' फरक पडत गेला. "एक काळ असाही आला की 'असुर' म्हणजे असुतत्त्वाचे, 'जीवनशक्ती' चे स्वामी जे वेदात आणि अवेस्तात पूजनीय होते त्यांच्याबद्दल भारतात विपरीत अर्थ-राक्षस-असा अर्थ रूढ झाला. त्या उलट इराणात देव या शद्बाला 'राक्षस' असा अर्थ प्राप्त झाला. 'दे (दी) वाना' 'असंस्कृत' या शद्वाने हाच अर्थ अभिप्रेत आहे. अग्नि आणि मित्र यांना सोडन इतर देवांची उदाहरणार्थ इंद्राची अशीच दुर्दशा झाली. प्राचीन इराणात तर तो खल पुरुष ठरला होताच पण स्मृतीपुराण काळात त्याचे वैदिक तेज भारतातही उरले नाही.

## आर्यच म्लेंच्छ झाले

या अतिप्राचीन इतिहास खंडानंतर दोन हजार वर्षांपूर्वी भारत आणि इराण यांना यवन, (Greek) पारद, शक या विदेशीयांशी लढावे लागले. रामायण, महाभारत, पुराणे यांतून आर्यावर्ताच्या पश्चिमेस, वायव्येस आणि उत्तरेस असलेल्या जाती जमातींना म्लेंच्छ हे नाव दिले गेले आहे. ते क्षत्रिय पण शास्त्रानुसार आचरण न केल्याने ते वृषल झाले असे महाभारतात म्हटले गेले आहे.

**शकास्तुषारा : यवनाश्च सादिना**
**सहैव काम्बोज वर्रौजिघांसवः**
**– महाभारत कर्णपर्व –**
**९४–१६**

**शका यवन कांबोजा स्तास्ता**
**क्षत्रिय जातयः**
**– महाभारत अनुशासन पर्व**
**६८–२१**

**तुषारान्वर्वराकारान् पहलवान् पारदान् शकान्**
**मत्स्यपुराण**
**१२१–४५**

**पश्चात्तिष्ठन्तु वीरा शकनरपतयः**
**– मुद्राराक्षस –**
**५–११**

आर्यावर्ताच्या सीमेवरील शक, तुषार, यवन, कांबोज, पहलव पारद, बर्बर हे लोक क्रूर, (जिघासवः) वीर, आणि धडधाकट (पहल (पैल) वाँ) होते.

हे वरील वृषल आणि म्लेंच्छ इराणातही होते. त्यांना तुराणी असे नाव आहे.

'पारसिक' अशी ही एक युयुत्सु जमात होती व भारतातील अश्वमेध करणाऱ्या राजांनी जे दिग्विजय केले त्यांत या सर्व राजांना ' म्लेंच्छ ' म्हटले आहे. सध्या म्लेंच्छ या शब्दाला जो अहिंदू असा अर्थ आहे तो पूर्वी नव्हता. म्लेंच्छामध्येही चातुर्वर्ण्य आणि उपासनापद्धती वैदिकांसारखीच होती पण मनुस्मृती आणि गृह्यसूत्रांत त्यांना वृषलत्व (वाळीत) बहाल केले गेले आहे. धर्माने ते बौद्ध होते असे पी. टी. बोराळे यांनी "Sagregation and Desegregation in India" मध्ये म्हटले आहे.

### ऐतिहासिक काळ

आर्य म्हणविणाऱ्या इराण्यांचे राज्य 'पारस' येथे ख्रि. पू. ६५० मध्ये हखामनिश याने स्थापले होते यावरूनच, पर्शिया, फारशी आदी नावे प्रचारात आली. याच वंशात 'सायरस' (Cyrus)* (ख्रि. पू. ५५८ ते ५२८) याने सिरियापासून गांधारापर्यंत राज्य वाढवून इतिहासातील एक नवीन पर्व निर्माण केले. पुढे दारयूष (Darius) याने तर पूर्वेकडे सिंधपर्यंत आणि पश्चिमेकडे इजिप्त, कॉकेशसपर्यंत राज्याचा विस्तार केला. पण ग्रीस देशावर नौकायुद्ध पुकारले असता मैरेथॉन येथे तो हरला (ख्रि. पू. ४८०). त्याने आपल्या विस्तीर्ण राज्याचे कारभारी म्हणून नेमलेले सरदार (Satrap) क्षत्रप (छत्रपती) या नावाने प्रसिद्ध आहेत.

### सिकंदर (अलेक्झँडर)

दारयूषने स्थापलेले प्रचंड राज्य क्षयार्श ( Xerxes ) (ख्रि. पू. ४८४ ते ४६६ पर्यंत) टिकविले आणि सुधारले. पण पुढील काळातील राजांना साम्राज्य पेलले नाही. यांत ग्रीस देशातील जनतेने संघटित होऊन इराण्यांचे पुरते उट्टे काढले. ख्रि. पू. ३३१ मध्ये तिसऱ्या दारयूषला हरवून मॅसिडोनियाच्या अलेक्झँडरने प्राचीन काळातील सारे जगज्जेतृत्वाचे विक्रम तोडले. जगद्विख्यात पर्सिपोलिस (Persepolis) जमीनदोस्त झाले. ख्रि. पू. ३२७ मध्ये त्याने भारतावरही हल्ला केला आणि वायव्य प्रांत, पंजाब आणि सिंधपर्यंत आपले राज्य वाढविले. कालांतराने इराणी जनतेला सिकंदर आपलाच वाटू लागला. हे सिकंदर, इस्कंदर यासारख्या इराणीयांच्या नावावरून सिद्ध होते. भारतात सिकंदराचा प्रभाव जुजबी होता, तरी त्याच्या सैन्यातील ग्रीक (युनानी-यवन) सिथियन (शक) यांनी भारताचा पुढील ८०० वर्षांचा इतिहास घडविला.

### सिथियन शक

दोन्ही देशांतील एक मोठा कालखंड सिथियन (शक) काळ म्हणून प्रसिद्ध आहे. मेडिया ( सध्याचे आजरबाईजान ) येथील अनार्य सिथियन किंवा शक होते. आर्यांशी लढत लढत त्यांच्यातच विलीन झाले. अलेक्झँडरने इ. स. ३३० मध्ये हा

---

* याची २५०० वी वर्धंती सध्या इराणात साजरी होत आहे. हा समारंभ आर्यवंशाची श्रेष्ठता पटविण्यासाठी आयोजित केला गेला आहे.



परसी पोलिस ( तख्त-इ-जमशीद ) : शीराजहून ५२ किलोमीटरवर असलेल्या प्राचीन शहराचे अवशेष. स्थापना ५२० ख्रि. पू. येथे दारयुव हखामनिषचा शिलालेख आहे. ख्रि. पू. ३३१ मध्ये अलेक्झँडरने दारयुष तृतीय याला पराजित करून शहर नष्ट केले.

[ सौजन्य : ईरान कल्चर-हाऊस, मुंबई ४. ]

प्रदेश जिंकला. अलेक्झँडर नंतर त्याच्या क्षत्रपांनी जागोजाग आपले स्वातंत्र्य जाहीर केले. त्यांतील बक्तर (Baktria) मधील खुरासान (पार्थिया) मध्ये स्थायिक बनलेल्या 'शक' या भटक्या जमातीने बक्तरचे राज्य उलथून पाडले आणि अशा रीतीने 'अशकांनी' (खि. पू. २४८ ते १९०) शकांचे राज्य अस्तित्वात आले. ते इराण आणि आर्यावर्तात धुमाकूळ घालीत होते. त्यांना शहान शाह (खशायथिय खशायथियाना–क्षत्रियो क्षत्रियाणां) मित्रदत्त द्वितीय (Mitradates II खि. पू. १२४ ते ८८) याने पायबंद घातला. त्यानंतर मात्र शकांनी आपला मुक्काम भारतातच स्थिर केला आणि मित्रदत्ताचे अनुकरण करून ते तक्षशिलेपासून मथुरा, सौराष्ट्र, सिंधपर्यंतच्या राज्याचे 'शहानशाह' बनले.

शकस्थान किंवा सीस्तानातून आलेल्या शकांनी पंजाबच्या पश्चिमेस मोयच्या ( Maues ) नेतृत्वाखाली राज्य स्थापले (खि. पू. ९४). याच राज्याचा उत्तराधिकारी कनिष्क याने काश्मीरपासून खाली नर्मदेपर्यंत कुशाण शकांचे राज्य वाढविले. इराण आणि भारताचा दुवा असलेल्या शकांचा प्रभाव इराणपेक्षा भारतावर अधिक पडला.

शक हे इराण आणि आर्यावर्त या दोन्ही देशांतही 'परकीय' होते. इराणमध्ये 'शकस्थान' सीस्तान–पर्यंतच त्यांची सत्ता होती पण नहपान (८५–१०७) कनिष्क (१२५–१५३) आणि रुद्रदामन (१४३) या राजांनी संपूर्ण उत्तर भारत, सौराष्ट्र, राजस्थान, नाशिक, पुणे पर्यंत आपली राज्ये स्थापली. त्यांच्या द्वारे इराणची संस्कृती भारतात रूढ झाली. त्याचाच एक परिणाम असा झाला की गुजरातला मिळालेले 'गुर्जर' जुर्जुर ( Georgea ) हे नाव सुद्धा पूर्व इराणातून आलेल्या आक्रमक म्लेंछांमुळेच पडले. (डॉ. सी. आर. नायक–'गुजरातीपर अरबीफारसीनु असर' पृ. १२३) पश्चिम भारतात शकांची सत्ता ८०० पेक्षा अधिक काळ राहिल्याने महाराष्ट्राच्या वांशिक, भाषिक घडणीत देखील इराणचा प्रभाव बराच पडलेला आधुनिक संशोधनामुळे सिद्ध झाला आहे. कै. वै. का. राजवाडे यांच्या 'महाराष्ट्राची वसाहत' या लेखात, वृषलबौद्ध यांच्या हल्ल्यामुळे दक्षिणेत आलेल्या जमातींनी महाराष्ट्रात केलेल्या भाषिक आणि सांस्कृतिक कामगिरीबद्दल काही विधाने मांडली आहेत. "आर्यभाषा संस्कृत यातून जन्मलेल्या युरोभारतीय (Indo-European) भाषांच्या घडणीबद्दलही नव्या कल्पना पुढे आल्या आहेत. मराठी भाषेच्या घडणी-बद्दल डॉ. विल्सन यांनी असे म्हटले आहे:–

"Independently of the Arabic and Persian words which have found their way in the Marathi Language principally from the Mohemmedan conquests and dominion and the exegencies of commerce and social intercourse it has two distinct lingual elements; the Scythian or Turanian and the Sanskrit which are both easily recognised and distinguished by the philologist."

(मोल्स्वर्थच्या मराठी इंग्रजीच्या कोशाची प्रस्तावना पाहा.) संस्कृतवादी पंडितानी या कल्पनेचा धिक्कार केला आहे. पण आधुनिक भाषाशास्त्रीय ज्ञान आणि फारसी भाषेचा पुरेसा परिचय त्यांना नव्हता असे वाटते.

इसवीसनाच्या सातव्या शतकापर्यंत इराण आणि आर्यावर्त यांचा घनिष्ठ संबंध परकीय पण समान धर्मीय असा राहिला. इराणच्या न्यायी म्हणून प्रसिद्ध असलेल्या नौशीरवानाचा (शक ४५३–५०१) नातू खुस्रो परवीन (शक ५१२–५५०) याने द्वितीय पुलकेशीच्या दरबारात आपला वकील पाठविला होता व त्याचे चित्र अजिंठ्याच्या १७ व्या लेण्यात आहे. तबरी या इराणी साहित्यिकाने आपल्या 'खुस्रोशीरीन' काव्यात वर्णिलेला 'फरमोसा' राजा 'परमेश्वर' (पुलकेशी) च असावा. असे जर्मन पंडित नोएलडेकने म्हटले आहे.
(श्री. देवीसिंह चौहान)

## सासानी वंश

इराणात, शुद्ध झरतुष्ट्री धर्मीय सरदार "अर्दशीरे बाबकां" याने शक–पार्थियनांना हाकलून पुन्हा 'आर्यसत्ता' प्रस्थापित केली (इ. स. २२६). या सासानी वंशाच्या बहराम द्वितीय, शापूर द्वितीय आणि बहराम गोर, नौशेरवान (५३१–७९), खुस्रो परवेज (५८०–६२८) यांच्या काळात भारत आणि इराणचे संबंध भारताशी मैत्रीचे होते.

या वंशाच्या राजांनी त्या काळी मध्य आशियातून निघून सर्वत्र हाःहाःकार माजवत सुटलेल्या हूणांचा यशस्वी प्रतिकार केला. पैगंबर मुहम्मद (५७०–६३२) यांनी अरबस्तानात धर्म आणि राजकारणात क्रांती घडविली. इस्लामचा प्रचार करण्यासाठी मुलूखगिरीला प्रारंभ झाला. दुसरे खलीफा उमर (६३४–४४) यांच्या काळात इ. स. ६३६ साली बगदाद जवळील कादिसिया येथे झालेल्या लढाईत सासानी वंशाचा शेवटचा राजा यज्दजुर्द (६३१–५१) पडला आणि प्राचीन इराणचा धर्मध्वज 'दरफशे कावयानी' कायमचा खाली आला. या "युगांता"चे वर्णन करताना राष्ट्रकवी फिरदोसी म्हणतो "उंटाचे दूध पिऊन भटकणाऱ्या अरबांनी इराणचे तख्त पाडले. क्रूर कालचक्राचा धिक्कार असो!"

अरब विजेत्यांनी प्राचीन इराणचा धर्म, संस्कृती आणि साहित्य यांचा विध्वंस केला. इराणीयांनी अरबांचा प्रतिकार केला. पण काही उपयोग झाला नाही. सातव्या शतकाच्या शेवटी संपूर्ण इराण मुसलमानांचा देश झाला आणि भारताशी असलेले इराणचे धार्मिक आणि सांस्कृतिक नाते पूर्णपणे तुटले.

भारतातही याच सुमारास (इ.स. ७०२) मुहम्मद बिन कासिमने सिंध जिंकून घेतला होता तरी अरबांची राजकीय सत्ता अल्पकाळच टिकली. भारतात इराणहून आलेल्या आक्रमकांनी आणि 'अवलियां' नी इस्लामचा प्रसार केला.



शीराज : तख्त-ए-जमशेद–कोरीव शिलाचित्रे

[सौजन्य : ईरान कल्चर हाऊस, मुंबई ४.]

इसवी सनाच्या पहिल्या सहस्त्रकानंतरही या दोन्ही देशांसमोर मध्य आशिया-तील तुर्की, मोंगल टोळीवाल्यांचे संकट उभे ठाकले. पण तेव्हा धार्मिक दृष्टीने इराण भारताला परकीय झाला होता.

### इस्लाम

इराणीयांनी मुहम्मदाचा धर्म स्वीकारला पण अरबांची संस्कृती स्वीकारली नाही. हजरत अली या चवथ्या खलीफाच्या मृत्यूनंतर (इ. स. ६६१) इस्लाम धर्मात शिया-सुन्नी अशी फूट पडली आणि शिया पंथीय अब्बासी घराण्याचा अबू जाफर मन्सूर 'खलीफा' झाला आणि इराणीयांच्या सहकार्याने 'बगदाद' हे नगर वसविले (इ. स. ७४४). ह्या घराण्यातील खलिफा हरून उर्रशीद (७८६–८०९) आणि मामून (८१३–८३३) यांच्या काळात धर्माने मुसलमान पण संस्कृतीने आर्य असलेल्या इराणीयांची राष्ट्रीय अस्मिता जागृत झाली आणि 'फारशी' या अरबी लिपीतील इराणी (पहलवी) भाषेत साहित्य निर्मिती होऊ लागली. खलीफांची सत्ता असून देखील ही जी सांस्कृतिक चळवळ सुरू झाली तिच्या योगाने झालेल्या पुनरुज्जीवनाचा शेवट १९२० साली इराण हे "आर्य राष्ट्र" होण्यात झाला.

या पुढील काळात राजकिय सत्ता अरबांच्या हातून सुटून, सलजूकी, गजनवी घोरी, आणि मोंगल वंशीय सुलतानांकडे गेली. त्यांच्या स्वाऱ्या भारतावर इ. स. १०२१ पासून होत राहिल्या आणि त्यांची राज्ये पण प्रस्थापित होत गेली. त्या काळी राज्यकर्ते इराणीच होते. पण ते भारताचे आणि हिंदू धर्माचे कट्टर विरोधक म्हणून आले. म्हणजे इस्लाममुळे भारताशी इराणीयांचा दुसऱ्यांदा जाचक असा संबंध प्रस्थापित झाला. गजनीचा महमूद (इ. स. १०१०) याने हिंदूंचा मानबिंदू असलेले 'सोमनाथ' मंदीर नष्ट केले व तो 'गाझी' म्हणून प्रसिद्ध झाला. याच कारणाने फारशी आणि उर्दू साहित्यांत हिंदुमत किंवा मूर्तिपूजेचे प्रतिक म्हणून 'सोमनाथ' आणि मूर्तिभंजकाचे प्रतिक म्हणून 'महमूद' हे संकेत रूढ झाले आहेत.

## हिंदूधर्माच्या घडणीत म्लेंच्छ इराणियांची कामगिरी

भारतातील मुख्य धर्म-हिंदुधर्म-हा यहुदी, ख्रिस्ती आणि इस्लाम या प्रेषित प्रणीत ( Prophet ) आणि अधिकृत धर्मग्रंथ, म्हणजे 'तौरेत,' बायबल, कुराण यांवरच सर्वस्वी आधारलेल्या धर्मांपेक्षा वेगळा आहे. ख्रि. पू. ४००० वर्षांपूर्वी ज्याला 'पूर्वहिंदू'* म्हणता येईल असा एक धर्म होता हे मोहोंजोदरो आणि हडप्पा येथील उत्खननाने सिद्ध केले आहे. 'वैदिक धर्म' म्हणून जो भारतात आहे हा मूलतः परकीय होता. नजीकच्या पूर्वेकडील मिटानी प्रदेश, इराण आणि भारताच्या वायव्येकडील सप्तसिंधू प्रदेश या तीन प्रदेशांकडे निर्गमने करण्यापूर्वी वैदिक आर्यांच्या

*हिंदू धर्म इतिहास आणि आशय–डॉ. रा. ना. दांडेकर पृ. १४ , २१, २३

पूर्वजांनी, ज्यांना यथार्थत्त्वाने 'पूर्वार्य' अशी संज्ञा देता येईल त्यांनी, बल्ख प्रदेशात वास्तव्य केले होते. याच बल्ख प्रदेशात वैदिक भाषेला व वैदिक धर्माला प्राथमिक स्वरूपाचे विशिष्ट व्यक्तित्त्व प्राप्त झाले. भारतात हा धर्म आला आणि त्याने येथील पूर्वधर्मावर आक्रमणे केली व शेवटी स्वत: तो आपले पूर्वीचे वैशिष्टच गमावून बसला. म्हणजे असे झाले की 'पूर्वहिंदू' धर्म वैदिक धर्म झाला आणि वैदिक आर्यांनी वरुण, इंद्र आदी दैवतांना गौण स्थान देऊन शिव, विष्णू आदींना प्राधान्य दिले. ही सुमारे तीन हजारांपेक्षा अधिक वर्षांची प्रक्रिया आहे आणि वायव्येकडून येणाऱ्या प्रत्येक जमातीने येथे स्थापित झालेल्या धर्माशी संघर्ष केला; पण अन्तत: त्या त्यातच विलीन झाल्या. त्यातच 'पूर्वहिंदू' ही नव्हे आणि वैदिकही नव्हे असा तिसराच एक बौद्धधर्म भारतातच जन्माला आला. त्यानंतरच्या इतिहासात असे आढळते की इराणकडून येणाऱ्या जमातींना हिंदू, शैव, भागवत आणि बौद्धधर्म यांचे सारखेच आकर्षण वाटले. बॅक्ट्रियन, ग्रीक, शक, पल्लव, कुशाण इत्यादी ज्या जमातींनी या कालखंडात भारताच्या काही भागात आक्रमणे केली व ज्या शेवटी भारतात स्थायिक झाल्या त्या परकीय जमातींची धार्मिक निष्ठा बौद्धधर्म आणि हिंदूधर्म या दोहोंत विभागली गेली होती. 'कॅडफाइसेस' (Kadphises) (ख्रि. पू. ८०) 'गोंदोफारेस' हे राजे शैव होते असे त्यांच्या 'महेश्वर' या बिरुदावरुन आणि त्यांच्या नाण्यांवरून सिद्ध होते. शक, कनिष्क बौद्ध धर्माभिमानी होता. हिंदू आणि बौद्ध या भारतीय धर्मांचा भारतातच नव्हे तर वायव्य, उत्तर, ईशान्य आणि आग्नेय आशियामध्ये विशाल प्रमाणात प्रसार व्हावयाला या शूर राजांचे फार सहाय्य झाले. फारशीत ' मूर्ती' या शद्बाला 'बुत' हे नाव 'बुद्धा' च्या मूर्तीवरून रूढ झाले आहे.*

## इस्लाम आणि भारत

ख्रिस्त शक ७०० पासून भारतीय धर्मावर इस्लामचा आघात होत होता. इराण इ. स. सातव्या शतकात धर्मप्रचाराला पूर्णपणे बळी पडला. याच सुमारास मुहम्मद बिन कासिम (इ. स. ७०२) याने सिंध पादाक्रांत केला पण इस्लामचा प्रसार मोठ्या प्रमाणात झाला नाही.

इराण देशात इस्लाममुळे धार्मिक क्रांती झाली तरी ज्या अरबांनी तो धर्म इराणात पसरविला त्यांच्या बद्दल इराणीयांनी जी अढी बाळगली ती अद्याप कायम आहे. अरब राष्ट्रे आणि इराण यांची धार्मिक जवळीक असूनही अरबांबद्दल त्यांना आपुलकी मुळीच नाही हे प्रचलित राजकारणाच्या अभ्यासकांच्या लक्षात येईल. भारतात याच्याविरूद्ध प्रकार घडला. इस्लामी-राजकर्ते आणि सुफीसंत यांनी भारतात मोठ्या प्रमाणांत इस्लामचा प्रसार केला. पण धर्मांतरितांना आपल्या पूर्वीच्या इतिहासाचा, संस्कृतीचा आणि देशाचा काहीच अभिमान राहिला

---

*'भारत–अरब संबंध' सैयद सुलेमान नदवी.

नाही. इराणचे महाभारत शहानामा फिर्दोसी या मुसलमानाने लिहिले असून त्यात प्राचीन इराणच्या राजवंशाबद्दल पौराणिक देवदेवतां-वीरांबद्दल नितांत आदर व्यक्त केला आहे. इराणी मुसलमानात-'अनूशीर', 'बहेराम', 'रुस्तुम', 'होशांग' ही पौराणिक नावे सर्रास आढळतात. भारतात राम, कृष्ण, अर्जुन, भीम ही राष्ट्रीय नावे मुसलमान वर्ज्य समजतात. प्रार्थनेसाठी काब्याकडे तोंड करावे लागते. म्हणून अरबस्थानाबद्दल आस्था बाळगणाऱ्या भारतीय मुसलमानांना भारताबद्दल कधीच अभिमान वाटला नाही. कबीर, अकबर, शेख मुहम्मद अशा थोरांनी जे राष्ट्रीय मोलाचे कार्य केले त्यामुळे त्यांना मुसलमानांकडून विरोधच झाला. केवळ धर्म वेगळा म्हणून मुसलमानांचे एक वेगळे राष्ट्र (कौम-मिल्लत) बनले. बहुसंख्य भारतीयांशी भाषिक, वंशीय आणि राजकीय साधर्म्य असूनसुद्धा मुसलमानांना भारताशी कसलेच सोयर सुतक नाही असे दृश्य भारतातच पाहावयास मिळते. भारतीय मुसलमानांनी भारतीय संस्कृतीबद्दल अभिमान बाळगला असता, तर काय झाले असते याची कल्पना इंडोनेशिया, मलेशिया येथील मुसलमानांच्या देशसंकृतीप्रेमावरून करता येते. या देशात भारतीय मुसलमानांमुळेच इस्लामचा प्रसार झाला.* पण तेथील मुसलमानांची नावे सुकार्नो, सुहार्तो अशी असतात. तेथील 'भाषा' संस्कृतप्रचुर आहे. अमोलिक हिऱ्याचे नाव 'त्रिशक्ती' असे आहे. इंडोनेशियाच्या विमान वाहतुकीचे नाव 'गरूड' असे आहे.

धर्म आणि संस्कृती यांतील गल्लत फक्त भारतीय मुसलमानांनीच केली. ख्रिस्ती मिशनऱ्यांनी सुरुवातीला युरोपीय पद्धतीची नावे आणि आचार धर्मांतरितांमध्ये रुढ केले. पण ख्रिस्तीधर्माचे भारताशी, संस्कृतीशी आणि आचारांशी वैर नाही. बंगाल, महाराष्ट्र आणि दक्षिण भारतातील व्यक्तिनावावरून व साहित्यावरून हे सहज लक्षात येण्यासारखे आहे.

## वांशिक आणि सांस्कृतिक संबंध

मागील दोन शतकांत पाश्चिमात्यांनी संस्कृत साहित्याचा अभ्यास करून जे काही सिद्धांत मांडले, त्यांत युरोप आणि आशियातील काही राष्ट्रे आर्य आणि उर्वरित अनार्य असा एक सिद्धांत मांडला. त्यातील धार्मिक आचार आणि शद्बांचे साम्य यावरून एकवंशीयत्व–एकराष्ट्रीयत्व यांच्या कल्पना लोकप्रिय झाल्या. उदाहरणार्थ संस्कृतमधील "भूर्ज" इंग्रजीतील "बर्च" व रशियन मधील "ब-र्यूजा". यावरून भाषांवर आधारलेले प्राचिन प्राणिशास्त्र (Linguistic paleantology) बनविले गेले. हे संशोधन बरेच भावनाप्रधान होते हे या शतकाच्या सुरुवातीपासून

* "With trade the Gujaratis also brought Islam."
Indonesia. Lesbic Palmier. Thomas and Hudson 1965 pp. 21.

नीलनदीचे खोरे, बोगाजकोई आणि मध्य आशिया, मोहेंजोदडो, हडप्पा येथील उत्खननातून सिद्ध झालेले आहे.

"मानव वंशशास्त्रा" च्या सर्वमान्य सिद्धांतावरून 'कीन' याने मानवजातीची वंशपरत्वे खालीलप्रमाणे विभागणी केलेली आहे.

१. आफ्रिकी मानव ( Homo Aethiopicus ),
२. मोंगोलियन ( Homo Mongolicus ),
३. प्राचीन अमेरिकन ( Homo Americus ),
४. कॉकेसियन ( Homo Cocasicus ).

त्यामुळे आर्य, द्रविड, सामी ( Semetic ) आदि जे पूर्वीचे वर्ग होते ते अशास्त्रीय ठरले आहेत.

या दृष्टीने पाहता कोणताही देश अनादिकालापासून एकाच वंशाच्या लोकांचा राहिलेला नाही. तरी पण वंशविचार गौण समजून उपेक्षिता येत नाही. यासाठी "आर्य" वंशाची ए. एच. कीन या विद्वानाने केलेली व्याख्या सर्वमान्य व्हावयास हरकत नाही.*

'आर्य ही काही एकाच मानववंशाची संज्ञा नव्हे. यात प्रामुख्याने कॉकेसिक आणि कालांतराने आर्यीकरण झालेले मंगोलियन (तुर्की, शक, हूण, पहलव) इत्यादी झान्तोक्रॉइड (Xantochroid) अंश असलेले वंश यांचा समावेश होतो. या जनसमुहावर कॉकेसिक वंशीयांचीच शारीरिक, भाषिक आणि सांस्कृतिक छाप स्पष्ट गोचर होत असते.'

मागील प्रकरणी आर्यांच्या मूळस्थानाबद्दल विद्वानात असलेल्या परस्पर विरोधी मतांचा उल्लेख केला आहे. स्थूल मानाने आर्यांच्या मूळ स्थानाबद्दलच्या कल्पना अशा आहेत.

१. आशियाच्या उत्तरेकडून ते इराणात आणि भारतात (दक्षिणेकडे) आणि युरोपात पश्चिमेकडे गेले,
२. ते भारताचेच मूळ निवासी होते,
३. ते भारतातून बाहेर गेले.

मानववंशीय शास्त्राच्या दृष्टीने पुढे आलेला पुरावा असा :

इंडोयुरोपियन जनसमूह म्हणून ओळखले जाणारे म्हणजे "आर्य" हे कास्पियन समुद्राच्या काठावरील कोरड्या गवताळ प्रदेशाचे मूळ निवासी. त्यांतच सिथियन म्हणजे शक आणि सिमेरियन ( Cimerians ) हे ही होते. पण ते

* Ethnology – A. E. Kean, Cambridge University

भटकेच राहिले. त्यातील काही लोक इराणच्या आखाताजवळ स्थायिक झाले. पुढे याच लोकांनी इराणातील विभिन्न जमातींचे एकत्रीकरण केले *

## इराणी तुराणी

इराणी आर्यांचा "तुराणी" या तुर्की वर्गाच्या जमातीशी दीर्घकाळपर्यंत संघर्ष होत राहिला. या लोकांत पार्थियन (पारद), सिथियन (शक), हूण आदींचा समावेश होतो. हजारो वर्षांच्या सान्निध्याने आणि संघर्षाने दोन्ही म्हणजे इराणी आणि तुराणी यांच्यात धार्मिक आणि भाषिक बाबतीत बरेच साधर्म्य उत्पन्न झाले.

## भारतातील इराणीवंशीय जमाती

वरील विवेचनावरून भारतात स्थायिक झालेल्या पण स्वतःला अनार्य, अभारतीय समजणाऱ्या काही जमाती "आर्य" वंशापासून फार मोकळ्या नाहीत हे दिसून येईल. या संबंधाने श्रुति-स्मृती पुराणादी जुनी ऐतिहासिक साधने बाजूला सारून मागील काही वर्षांत झालेल्या मानववंशीय संशोधनाच्या आधारे असे म्हणता येईल की, भारतातील नाग, कोळ, मुंडा, आदी मूळ निवासी वगळता भारतीय आर्य होत, "द्राविड" "द्रामिड" "तामिळ" ही एक भाषिक संज्ञा आहे. उत्तर भारतीयांपासून आपले वांशिक वेगळेपण दाखविण्याकरता द्रविड आपला प्राचीन संबंध इज्रायल "हरवलेल्या जमाती"शी जोडतात.** पण इज्रायल ही कॉकेसिक जमात आहे. तामिळी (द्राविड) लोक "पूर्वभूमध्यसागरीय" जमात असून त्यांच्यात इराणातील आर्मेनियन लोकांची वैशिष्ट्ये आढळतात.***

प्राचीन भारतातील आर्य-म्लेंच्छ या नावाने ओळखल्या जाणा-या जमातींची मागे चर्चा झाली आहे. श्रुति, स्मृति, पुराणे आणि ललित साहित्यात ज्यांचा उल्लेख येतो, त्या जमातींचे वांशिक वर्गीकरण करण्याचा प्रयत्न 'वराहमिहिर' (इ. स. ६०६ ते ६४८) या इराणी वंशाच्या ज्योतिर्विदाने केला आहे.

इराणातील मुख्य धर्माचा संस्थापक झरथुष्ट्र हा इराणी (आर्य) होता की तुराणी होता याबद्दल शास्त्रीयदृष्टया अचूक निर्णय देता येत नाही. कारण हूण ही जमात इराणातून निघून बाल्कन राज्यात, प्रामुख्याने हंगेरी येथे स्थायिक झाली. कान्स्टंटाईनच्या (४ थे शतक) काळात झालेल्या धर्मपरिवर्तनापूर्वी ते अग्निपूजक होते आणि झरथुष्ट्राला धर्मगुरू समजत होते. झरथुष्ट्राच्या धर्माला जे "मागी"

---

* History of Mankind – Volume II Part I,
– Luigi parcti

** The Dravidian Movement – Robert Hardgrave,

*** K. A. N. Sastri – History of South India.
Madras / Oxford 1958–pp, 57–8

असे नाव आहे त्याच्याशी सदृश असे हंगेरितील "मागियार" हूणांच्या एका जमातीचे नाव आहे मूलतः तुराणी यांचा "मागा" धर्म मेडिया आणि इराण या देशांचा धर्म झाला.* पारशी इतिहासकार इब्ने दस्ता यांच्या म्हणण्याप्रमाणे तुर्कस्तानात १० च्या शतकापर्यंत अग्निपूजा प्रचारात होती.**

यावरून असे स्पष्ट होते की, आर्य आणि तुर्की वर्गाच्या जमाती अनादीकाला-पासून कास्पियन समुद्राच्या पूर्वेस आणि दक्षिणेस राहात असून त्यांच्याविषयी वांशिक-दृष्टीने बिनचूकपणे कोणतेच विधान करता येत नाही.

## देव असुर

इराणातून जसे तुराणी पश्चिमेकडे गेले त्याचप्रमाणे इराणीयांची एक जमात भारतात आली आणि धर्म (अग्निसंप्रदाय) समान असून देखील त्यांच्यात वैमनस्य राहिले. शक्तिशाली "असुर" "वरुणा" चे स्थान इंद्राला मिळाले आणि "असुरयाजी" (अहुर) मज्दायजनान इराणी होत. त्याचप्रमाणे देवेन्द्र "दाएवा यजमान" हे इराण्यात दानव गणले गेले.

सिंधु नदीचा पश्चिमेकडील भाग आणि पंजाबच्या उत्तरेस असलेला भाग इतिहासपूर्व काळापासून इराणच्या सत्तेत असल्यामुळे तेथील रहिवासी म्लेंच्छ (पुढे यवन) झाले आणि ही संज्ञा अर्वाचीन भारताच्या इतिहासातसुद्धा आढळते (पाहा "आज्ञापत्र")

प्राचीन भारतातील मानववंशीय वर्गीकरण असे करता येईल :

अंग वंग, कलिंग हे अनार्य होते.***

यदु आणि तुर्वसु हे दास होते.x

पौरव : हे अनार्य होते.

दास : हे इराणातील दाहाए (शक होते).

यवन : हे ग्रीक नव्हेत. कारण "तुर्वसु" हे वेद काळातील यवन होते आणि "पारुष्णी" चे युद्ध (ऋग्वेद १०) यवनांशी झाले. ग्रीकांचा संबंध ख्रि. पू. ३२६ पासून आला शिवाय "यवनानी" हा शद्ब पाणिनीलाही (ख्रि. पू. ४००–३५०) ठाऊक होतां.

यदु, तुर्वसु आणि भौज मेसोपोटेमियातून येऊन सौराष्ट्रात स्थायिक झाले होते.xx ()

---

* "Original Home of the Magiyars"–Alexis Faye.

** Kolomen Nemati – Budapest 1892

*** कित्ता पृष्ठ १३

x रंगाचार्य

xx () Iranian Influence on India– K. N. Sitaram.

पल्लव : या पल्लवांचा तामिळी साहित्यात यवन (रोमन) असा उल्लेख असून आगस्टसची नाणी कोइमतूरमध्ये सापडली आहेत. तामिळी साहित्यात पल्लव (कांची) हे यवन असल्याचे उल्लेख सापडतात. पल्लवांनी पंजाब, माळवा, गुजराथ, सौराष्ट्र ही राज्ये पादाक्रांत केली होती आणि दक्षिणेत कांची येथे ते स्थायिक झाले होते. सुमारे ३००–४०० वर्षांपर्यंत राजकीय उलाढालीचे केंद्र कांची हे होते. या शिवाय रोमच्या दरबारात पांड्य राजाचा वकील असल्याचे रोमन साम्राज्याचे इतिहासकार सांगतात.xx

यावरून इराणचा आणि भारताचा प्राचीन इतिहास आणि वंशीय वर्गीकरण हे दोन्ही समान आहेत या विधानाला पुष्टी मिळते. यापैकी कित्येक जमाती कला-क्षेत्रात प्रवीण होत्या म्हणून इराण आणि भारतात त्यांच्या स्थापत्याचे (सारसेनिक) नमुने आढळतात. बहिस्तून येथील दारयुषचा शिलालेख पाहूनच अशोकाने शिलालेख लिहविले. अफगाणिस्तानातील "बामियां" येथील लेण्यांमधील व अजिंठ्याच्या लेण्यांमधील (इ. स. १००) शिल्प सारखेच आहे. गायन शास्त्रातील "गांधार" "पल्लवी" "कामोद" (कांबोज) या नावांवरून देखील भारतीय संस्कृतीला प्राचीन इराणची देणगी भरपूर आहे हे स्पष्ट होते.

## फारशी भाषा आणि साहित्य

फारशी या जगातील अत्यंत सुलभ, समृद्ध आणि संस्कृतसदृश भाषेचा उद्‌गम आणि विकास यांचा इतिहास भारतीयांच्या दृष्टीने फार महत्त्वाचा आणि तितकाच मनोरंजकही ठरेल.

भारत आणि इराण यांच्या आतापर्यंत विवेचन करण्यात आलेल्या जिव्हा-ळ्याच्या नात्याचे पडसाद दोन्ही देशांच्या भाषिक आणि सांस्कृतिक विकासात पडणे अपरिहार्य आहे. भारतातील भाषांमध्ये सध्या परदेशी ठरलेल्या फारशी भाषेचा अंतर्भाव केल्याशिवाय भारतीय भाषाशास्त्राच्या अध्ययनाला पूर्णत्व येणार नाही. यास्तव फारशी भाषेचा इतिहास थोडक्यात देण्याचा हा प्रयत्न आहे.

## प्राचीन काळ

वायव्य आणि मध्य आशिया हे आर्य जमातीचे मूल स्थान मानण्यात कोणताच प्रत्यवाय नाही. याच टापून तुर्की या संकीर्ण मानववंशाचेही मूलस्थान आढळते. हजारो वर्षांपासूनच्या सहअस्तित्वामुळे ह्या दोन्ही जमातींच्या मूळ भाषा आणि मिश्र भाषा असे दोन प्रकार आढळतात. या दृष्टीने पाहता हिट्टाइट, ग्रीक, अवेस्ता आणि वैदिक भाषा यांना शुद्ध आर्यांच्या भाषा, आणि सिथियन (तुर्की, उरल, अलताई भाषासमूह) ही शुद्ध तुर्की भाषा असे ढोबळ मानाने वर्गीकरण करता येईल. मिश्र भाषांमध्ये प्रथमावस्थेत इराणातील पहेलवी, भारतातील अपभ्रंश आणि प्राकृत

---

xx कित्ता.

भाषा यांचा समावेश होतो. अंतिम अवस्थेत इराणातील फारशी, भारतातील उर्दू यांचा उल्लेख करता येईल. अन्य अर्वाचीन भारतीय भाषांचा विकास स्वतंत्रपणे झाला असला, तरी संस्कृत, सिथियन या भाषाप्रवाहाच्या प्रभावापासून त्या मुक्त नाहीत हे त्यांच्या अभ्यासकांच्या लक्षात येण्यासारखे आहे.

**लिपी :**

भाषा ही नैसर्गिक मानवी क्रिया आहे व लिपी ही कालांतराने राजकीय अथवा व्यावहारिक उद्देशपरत्वे अस्तित्वात आलेली असते. मध्य आशियातील अनेक भाषांना अलीकडेच लिपी निश्चित करण्यात आली आहे. भारतातही कित्येक बोली-भाषांना निश्चित लिपी अजून नाही. भारताची राष्ट्रभाषा हिन्दी आणि तिची लिपी देवनागरी असे निश्चित होईपर्यंत भारतात सर्वाधिक बोलल्या आणि समजल्या जाणाऱ्या हिंदुस्तानी या भाषेसाठी देवनागरी आणि फारशी (उर्दू) ह्या दोन्ही लिपी घ्याव्यात असे महात्मा गांधींचे मत होते. त्याच बरोबर रोमन लिपी घ्यावी असे म्हणणारे विद्वानही थोडे नव्हते.

आर्य भाषांसाठी 'अलफ' 'बैत' अशी अक्षरे असलेली 'फिनीशिअन' लिपी घेण्यात आली व तीतूनच ग्रीकांनी आपली वर्णमाला (अलफाबेट) बनविली. हीच अरबी, फारशीची अलिफ-बे. !

तीन हजार वर्षांपूर्वी इराण मेदी सत्तेखाली असताना शिला-लेखांसाठी 'मेख-लिपी' प्रचारात आली. त्यानंतर हखामनिस वंशाच्या इराणी बादशहांनी हीच लिपी स्वीकारली.

"दारय वावष वजरक खषायथ, खषायत्री : खषायथीणाम् , खषायजी थियोनाम् हिषास्पहियापो जर हसामनषिया ही इमम् नचरम अन्कवष : " गुष्तास्प हसामनिषाचा मुलगा शहान्शाह दारयूज बुजुर्ग (महान) याने हा किल्ला बांधविला"

(तख्ते जमशेद शिलालेख)

पण ही मेखलिपी फार अवघड होती म्हणून अवेस्ता या वैदिक भाषेच्या धार्मिक साहित्यासाठी आरमाइक लिपीचा उपयोग होऊ लागला. ही सामेटिक (उजवीकडून डावीकडे लिहिली जाणारी) लिपी. तिचे लिप्यंतर असे करता येईल.

अ, आ, इ, ई, उ, ऊ, ए, ऐ, ओ, औ, अं

क ख ख ग ग ङ.

च ज ज ज्ह् प फ ब व म य र स श ष ह

(ल हे स्वतंत्र अक्षर नाही )

**पहेलवी :**

अवेस्ताची प्राचीन भाषा झाली आणि व्यवहारात ग्रंथनिविष्ट पहेलवी ही मिश्र भाषा अस्तित्वात आली.

सासानी घराण्याच्या कारकीर्दीत हिचे शुद्धीकरण झाले. धार्मिक भाषा आणि साहित्य यांच्या दृष्टीने हा काळ मोठा क्रांतिकारक ठरला. गजनवी या तुर्की वंशातील महमूद या बादशहाने इराणी साहित्य आणि कला यांना प्रोत्साहन दिले. इराणचा प्रसिद्ध कवी फिरदौसी (९२०-१०२५), इतिहासकार अलबिरुनी हे याच्याच दरबारात होते.

**सलजूक वंश :**

नंतरच्या तुर्की-सलजुकी वंशाच्या अल्प असंलान (१०६३-७२) ने फारशीला राजभाषेचा बहुमान बहाल केला. आशकानी खि. पू. (२५० ते खि. श. २२६) घराण्याने इराणात अस्तित्वात आणलेल्या दरी या राजमान्य भाषेचे अरबीकरण झाले. तिलाच पारसी-फारसी हे नाव रूढ झाले (–डॉ. जबीहुल्ला सफा तारीखे अदबियाते ईरान पृ १५७) या काळातच फारशीचे अग्रगण्य साहित्यिक आणि सूफी कवी शेख फरीदुद्दिन अत्तार, नासिरे खुसरो (१०८२), रुबायतकार उमर खय्याम मृ. (११३०), निजामी गंजवी हे होऊन गेले. या शिवाय जैनतुल अखबार सियासत-नामा, चहार मकाला, मकामाते हमीदी हे अभिजात ग्रंथ ( Classics ) प्रकाशित झाले.

मोगल आणि तैमुरी तुर्कांनी राजकीय आणि धार्मिक दृष्टीने अनेक उत्पात घडविले. बगदादची सत्ता नष्ट झाली आणि त्यामुळे इस्लामचे वर्चस्व संपुष्टात आले. तुर्क बादशहांची मनधरणी करून त्यांच्या अधर्मी (कुफ्र) आचारांकडे कानाडोळा करत आणि प्रसंगविशेषी त्यांच्या क्रौर्याचे देखील कौतुक करत. फारशी साहित्यिकांनी भाषेचे आणि साहित्याचे रक्षण केले. या अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत देखील शेख सादी (११८४-१२९२), हाफिज शीराजी (१३२८-१३८९), या 'गजल' सम्राटांनी फारशी भाषेला आणि साहित्याला जागतिक महत्त्व मिळवून दिले. याच काळातील सूफी कवी मौलाना जलालुद्दीन रुमी यांची मसनवी फारशी भाषेतील कुराण म्हणून प्रसिद्धीस आली.

"मसनवी ए मअनवीए मौलवी
हस्त कुरआं दर जबाने पेहलवी"

या काळात प्रसिद्धीस आलेले इतर महत्त्वाचे ग्रंथ म्हणजे मोगल चेंगीज खानाच्या दिग्विजयाचे वर्णन करणारा "तारीखे जहांगुशा" (अलाउद्दीन) अता मलिक जवीनी, अखलाक मोहसिनी (काशिफी), फारशी हितोपदेश (अन्वर सुहायली) हे होत.

**सफवी घराणे :** तुर्की बादशहांनी दिलेल्या प्रोत्साहनाने फारशी भाषा, साहित्य, कलाकौशल्य या क्षेत्रात नेत्रदीपक वाढ झाली होती. पण सफवी वंशाचे बादशहा कट्टर शिया मुसलमान होते व त्यामुळे ललित साहित्य आणि कला यांचा

ऱ्हास होत गेला. त्यानंतरच्या काचारी बादशहांनी देखील फारसे प्रोत्साहन दिले नाही. काआनी (मृत्यू १८५३) याचा अपवाद सोडला तर कोणी नामवंत साहित्यिक इराणात झाला नाही. याचा परिणाम असा झाला की इराणी कलावंत देश सोडून भारतातील मोगल, विजापूर इत्यादी दरबारांकडे धाव घेऊ लागले.

या पुढील काळात आशियातील सर्वच राष्ट्रांवर फ्रेंच, इंग्रजी, जर्मन, रशियन या युरोपीय भाषांचा आणि साहित्याचा प्रभाव पडू लागला आणि देशीय मध्ययुगीन साहित्याची पीछेहाट होत गेली.

## पुनश्च "आर्य" चळवळ

या शतकाच्या प्रारंभापासून इराणमध्ये आर्य वंशाचा अभिमान बळावत गेला. अरबी, तुर्की आणि सदृश भाषांचे शब्द काढून टाकून फारसी भाषेचे शुद्धीकरण होऊ लागले. इराणीय मुसलमान धार्मिक असले तरी अरबी भाषेची आध्यात्मिक प्रौढी त्यांना मान्य नव्हती.

**"बिस्मिल्ला हिर्रहिमान्नूर्रहीम"**

हे ईशस्तवन (अरबी) सुद्धा बदलून

**बनामे ऐजदे पाक**

**बख्शायंदा ओ**

**बख्शायशगर**

(कृपाळू आणि क्षमाशील देवाच्या नावाने आरंभ करतो)

असा वाक्यप्रयोग सर्रास रुढ होऊ लागला. सध्या तामिळी भाषेतून जसे संस्कृतचे उच्चाटन होत आहे आणि 'संघ' ऐवजी 'कळहम', 'नमस्कारा' ऐवजी 'वणक्कम' असे जुने तामिळी शब्द रूढ होत आहेत त्याप्रमाणे प्राचीन इराणी भाषेतील शब्द आणि ते अपुरे पडल्यास फ्रेंच व अन्य युरोपियन भाषांचे शब्द घेतले जातात.

## इराणी भाषा आणि साहित्याची भारतीय धारा

प्राचीन इराण आणि आर्यावर्त यांचा इतिहास जसा समान आहे त्याप्रमाणे दोन्ही देशातील भाषा आणि साहित्य यांची वाढ सारख्याच कारणामुळे होत गेली.

वैदिक वाङमय 'श्रौत, होते. म्हणजे लिखित ग्रंथापासून त्याची सुरुवात झालेली नव्हती.

साहित्यासाठी 'ग्रिष्ट' (पजंद-पसंत) भाषा प्रचारात आली. त्या वेळी इराणचे धार्मिक आणि सांस्कृतिकदृष्टया सख्य असल्याने भारतातील पंचतंत्र, हितोपदेश इत्यादी ग्रंथांचा अनुवाद पहेलवी भाषेत झाला व त्यामुळे संस्कृत साहित्याचा पश्चिमेत प्रसार होऊ लागला.

या नंतरच्या काळातील राजकीय इतिहासाबरहूकूम भाषेचा इतिहास घडत गेला.

अलेक्झाण्डरने इराणवर हल्ला करून मागे इराणियांनी ग्रीस देशावर केलेल्या आक्रमणाचा सूड उगविला. त्याने फक्त राजकीय सत्ता स्थापिली नाही, तर हखामनिषांपासून अस्तित्वात असलेली साहित्यिक आणि सांस्कृतिक मानचिह्नेही उध्वस्त केली. जागतिक कीर्तीचे परसीपोलिस बेचिराख झाले. पाचशे वर्षांचा काळ लोटल्यानंतर अर्देशीर बाबकानच्या सासानी घराण्याने जुन्या भाषा संस्कृतीचे पुनरुज्जीवन केले. या वेळेपर्यंत अवेस्ताचे रूप बदलून राकट (पेहलवां) लोकांची पहलवी रुढ झाली होती. ती व्यवहाराला योग्य असली तरी झरथुष्ट्री धर्माच्या मोबिदानी (ब्राह्मणांनी) ती शुद्ध करून 'पजंद' ही शुद्ध भाषा बनविली आणि याच भाषेत साहित्यनिर्मिती होऊ लागली.

इ. स. ६४६ मध्ये अरबांची सत्ता प्रस्थापित झाल्यावर त्यांची अरबी लिपी आणि शब्दावली राजमान्य झाली. पहेलवी ही सामान्यांची भाषा उपेक्षितच राहिली. या काळातही पुनरुज्जीवनाचे प्रयत्न सतत चालू होते. लोक मुसलमान झाले होते, तरी प्राचीन भाषा, साहित्य आणि संस्कृतीचा त्यांना मोठा अभिमान होता. बगदाद येथील अब्बासी घराण्यातला मन्सूर, हारुनुरंशीद, मामून या लोकांनी अरबीपेक्षा फारशी म्हणजे अरबी लिपीतील पेहलवीला प्राधान्य दिले. त्यामुळे हा काळ फारशी भाषेचे सुवर्णयुग ठरला. हेच धोरण ताहिरी (इ. स. ७२०--८७१) आणि सामानी (८६१–८७५) या वंशांनी पुढे चालू ठेवले.

अकराव्या शतकापासून तुर्की, मोगल, तार्तर आक्रमाकांनी इराणची अरबसत्ता नष्ट केली आणि आपले वर्चस्व स्थापित केले. पण या सुमारे दोन हजार वर्षांच्या कालखंडात पारंपरिक साहित्य अस्तित्वात आहे.

## भारतात

इराणात प्रचारात आलेल्या 'आरमाईक' लिपीचेच एक संस्करण खरोष्ट्री लिपी वायव्य भारतात प्रचारात होती. हिला लागूनच असलेल्या पूर्वेकडील भागात ब्राह्मी अशी एक दुसरी लिपी अस्तित्वात आली. इराणातील लिपी उजवीकडून डावीकडे लिहिली जाणारी, तर ही लिपी डावीकडून उजवीकडे लिहिली जात असे. याच लिपीत संस्कृत साहित्य लिपिबद्ध झाले.

पाणिनीच्या (ख्रि. पू. ४००) काळापर्यंत संस्कृत भाषेचे व्याकरण निश्चित झाले व त्या बरोबरच ती विद्येचीच भाषा होत गेली. याच कालखंडात शक या जमातीची सत्ता भारतात स्थापित झाली आणि पाटलीपुत्रऐवजी पुष्पपुर-पेशावर, तक्षशिला, मथुरा ही सत्ताकेंद्रे बनली. मध्य आशियातील राज्यकर्त्यांची भाषा, सोग्दियन, तोखारी किंवा खोतानी ही तुर्की कुलातील भाषा होती. त्यामुळे इराणच्या

आर्यभाषेत जसे अनार्य भाषांचे मिश्रण होत गेले, तसे भारतीय संस्कृत भाषेला म्लेंछांचे ग्रहण लागले. 'म्लेंछ' हा भाषेचाच एक प्रकार आहे असे कुमारिलभट्टाने (सातवे शतक) म्हटले आहे.

या म्लेंछांत सर्वात अग्रगण्य आणि भारतीय भाषांना सर्व दृष्टीने समृद्ध करणारे म्लेंछ म्हणजे शक होत. त्यांच्या बरोबर लिपीचाही प्रवेश झाला. 'आरामी' लिपी-चाच एक प्रकार खरोष्ट्री आणि त्या नंतर ब्राह्मी या लिपी मध्यपूर्वेकडूनच भारतात आल्या. कनिष्क अशोक, आदि भारतीय चक्रवर्तींचे राज्य भारताबाहेर पसरलेले होते आणि त्यांच्याशी दळणवळण ठेवण्यासाठी शिलालेख आणि लिखित साहित्य निर्माण करणे अगत्याचे झाले.

तक्षशिला, मथुरा, पाटलीपुत्र ही जागतिक बौद्ध धर्माची केंद्रे शकांच्या सत्तेत होती. त्यामुळे क्रमेण संस्कृत भाषेची जागा पाली, अर्धमागधी या जानपद भाषांनी घेतली.

अवेस्तातून जशी पेहलवी तयार झाली तशी संस्कृतमधून अपभ्रंश-प्राकृत आदि भाषा उद्‌भवल्या.

## दुसरा आघात–फारशी

ख्रिस्ती शकाच्या पहिल्या सहस्त्रकानंतर संस्कृतचे अखिल भारतीय महत्त्व कमी होत गेले. भारताचे राजकीय स्वातंत्र्य नष्ट झाल्यानंतर भारतात राजभाषा म्हणून फारशी ही भाषाभगिनी पोसली जात होती. पण ती सासानी-शक काळातील (सातवे शतक) – आर्यांची धर्मभाषा नव्हती. ती इराणातून "सोमनाथ" मंदिर नष्ट करणाऱ्या 'गाजी महमूदच्या इराणी, तुर्की, मोंगल फौजांबरोबर भारतात आली. भारतात मोठ्या प्रमाणावर धर्मांतरे घडविणारे मुसलमान बादशहा आणि सूफी अवलिया हे फारशी बोलणारे होते. त्यांचा आदर्श देखील भारताचे इराणीकरणच होता. बल्बनचा मुलगा मुहम्मद मुलतान शहराचे 'शिराज' बनविण्याची स्वप्ने पाहात होता हे मागे सांगितले आहे.

## इराणी संस्कृति, फारशी भाषा आणि साहित्य यांचे दुसरे मोठे केंद्र भारत

गुप्तांच्या काळापासून वाढीस लागलेल्या संस्कृत ललित साहित्याचे महत्त्व लोप पावत गेले. त्या उलट फारशी भाषेतील ग्रंथनिर्मितीला सुमार राहिला नाही. सर्व ऐतिहासिक स्वरूपाची साधने फारशीत होऊ लागली. पंजाब, दिल्ली, गुलबुर्गा, विजापूर येथील तुर्की, मोगल बादशहांच्या आश्रयार्थ इराणातील विद्वानांची, कलावतांची, स्थापत्य विशारदांची, आणि धर्मधुरीणांची भारताकडे रीघ लागली.

भारतातील फारशी साहित्यिकांच्या डोळ्यापुढे सअदी, हाफिज, रुमी हेच आदर्श होते. मोगल साम्राज्य नष्ट होईपर्यंत फारशीशिवाय अन्य भारतीय भाषांत

साहित्य निर्मिती उपेक्षणीय अशी होती. दक्षिणेतील 'बंडखोर' सुलतानांनी दिल्लीच्या फारशीला शह देण्यासाठी 'दक्खनी' राजभाषा बनविली आणि साहित्यनिर्मितीला प्रोत्साहन दिले. गोवळकोंडयाचा मुहम्मद कुल्ली कुतुबशाह स्वतः फार मोठा 'दख्खनी' कवी होता.

या दखनी साहित्याची वाढ देखील फारशीच्या चौकटीत होत होती. १७ व्या शतकात वली हा दक्षिणेतील कवी दिल्लीत पोहोचला आणि तेव्हापासून उर्दू या नवोदित बोली भाषेतील साहित्य लोकप्रिय होऊ लागले. आधुनिक काळात गालिब आणि डॉ. मुहम्मद इकबाल यांनीही फारशीतून उत्तम काव्य निर्मिती केली आहे. अखिल भारतीय स्तरावरील संस्कृतचे उच्चपद घेणारी फारशी भाषा आता संस्कृत सारखीच भारतात 'मृतप्राय' झाली आहे. हिंदूना तर ती कधीच स्वकीय वाटली नाही. फारशी भाषा आणि साहित्याचा अभ्यास सध्या इंग्रजीचा करतात त्याप्रमाणे त्यांनी कधी केला नाही. मुसलमानांच्या दृष्टीनेही आता उर्दूला महत्त्व असल्याने फारशीचे अध्ययन आता नामशेष झाले आहे.

## फारशी भाषेचे महत्त्व

इंग्रजांनी भारतात सत्ता प्रस्थापित केल्यावर इंग्रजीचे महत्त्व राज्यकर्त्यांची भाषा एवढयापुरते सीमित राहिले नाही. मेकॉलेच्या सिद्धांतानुसार भारतीयांवर पाश्चात्य संस्कृतीचा पगडा बसविण्याच्या कामीही या भाषेचा भरपूर उपयोग झाला आणि संस्कृत, फारशी या जुन्या सांस्कृतिक भाषा मागे पडल्या. तरी देखील शिक्षण-क्रमात या भाषांचा समावेश केल्याने त्यांचे अध्ययन, अध्यापन आणि त्यांतील संशोधन कार्य होत राहिले. यात एक दोष असा उत्पन्न झाला की संस्कृत हिंदूंसाठी आणि फारशी मुसलमान आणि पारशांसाठी असा अलिखित नियम अमलात आला. व्यावहारिकदृष्टया यात काही तोटा नसला तरी भाषाशास्त्र, इतिहास आदी ज्ञानक्षेत्रात हिंदू आणि अहिंदू विद्वानांच्या चुली वेगळया झाल्या. ज्ञानाच्या क्षेत्रात धर्मकारण घुसले व त्यामुळे अखिल भारतीय पातळीवर संस्कृत आणि फारशी भाषा आणि साहित्याचा अभ्यास आणि संशोधनकार्य पूरक स्वरूपात राहिले नाही. इंग्लंड, जर्मनी या देशातून फारशी आणि संस्कृत साहित्यावर समान अधिकाराने लेखन करणारे विद्वान आढळतात, तसे भारतात आढळत नाहीत. प्राचीन आणि अर्वाचीन भारताच्या साहित्य आणि इतिहासातील हिंदूसंशोधकांना फारशीचे पुरेसे ज्ञान असतेच असे नाही. यामुळे त्यांची साधने मर्यादित होतात आणि सिद्धांत चुकीचे ठरतात. पाश्चात्य विद्वानांचे मत उद्धृत करण्यापलीकडे त्यांना कोणतेच निश्चित विधान करता येत नाही.

## फारशी आणि मराठ्यांचा इतिहास

मागील शतकाच्या अखेरीपासून महाराष्ट्रातील विद्वानांनी आणि संशोधकांनी

नेत्रदीपक काम केले आहे. राजवाडे आदी विद्वानांनी इतिहासाच्या अध्ययनासाठी आपले आयुष्य वेचले. पण 'इतिहासाची साधने' लिहिणाऱ्यांनी "इतिहासासाठी साधना" असाही ग्रंथ लिहून त्यात 'फारशीला' अग्रस्थान दिले असते तर त्यांच्या कार्याला आगळे महत्त्व आले असते. सर यदुनाथ सरकार यांना फारशीच्या ज्ञानामुळे अधिकारवाणी प्राप्त झाली हे सत्य डोळयापुढे असताना, ग. ह. खरे, सेतुमाधवराव पगडी, देवीसिंहजी चौहान असे अपवाद वगळता, अन्य कोणत्याही मातबर विद्वानांनी फारशीचे ज्ञानभांडार लुटले नाही.

या उपेक्षेचे कारण फारशी भाषा मूर्तिभंजक महमुदाच्या संगिनीसमवेत भारतात आली हेही असू शकेल. पण भारतीय इतिहासातील हा ८०० वर्षांचा इस्लामी कालखंड भारत-इराण या दोन्ही राष्ट्रांच्या तीनचार हजार वर्षांच्या संबंधाच्यामानाने लहान आहे.

आर्य संस्कृती ही आधार मानून इराणात सध्या व्यापक प्रमाणावर जीवनाच्या सर्वच क्षेत्रात परिवर्तन होत आहे. थोडयाफार अंतराने भारतातही हेच घडत आहे. तेव्हा नवइराणाबद्दल कुतूहल साहजिकच निर्माण होते. त्यासाठीही फारशी भाषा-साहित्य आणि इराणी संस्कृतीचे अध्ययन-अध्यापन उपयुक्त ठरावे.

□ □ □



फारशी-उर्दू-शायरीचे पंचायतन. १. साकी, २. मधू मागणारा कवी, ३. मीलनसुख अनुभवणारा (सुर्खरु) आषक, ४. मधुशाला अध्वर्यु (पीर-ए-मगान), ५. पान-प्रेम-विरोधक ज्ञानी (नासिह).

[सौजन्य : ईरान कल्चर हाऊस, मुंबई ४]

मध्ययुगीन मुस्लिम जगाचा महान चिंतक
**शेख सादी**



( इराण कल्चर हाऊस, मुंबई यांच्या सौजन्याने )

# बोस्ताँ

## अध्याय १

# मंगलाचरण व ग्रंथकर्त्याचा उपोद्घात

जगन्नियंता, सृष्टिकर्ता, रसनेला वाणीचे वरदान देणारा, परमश्रेष्ठ, कृपाळू, श्रांतांचा सखा, अपराध पोटात घालणारा असा जो परमेश्वर त्याचे नाव घेऊन मी या ग्रंथाचा आरंभ करतो. त्या परमशक्तिवान व समर्थ अल्लाच्या दारातून कोणी मागे फिरल्यास त्याला दुसऱ्या कोणत्याच दरवाज्यात थारा मिळणार नाही. मोठमोठे मानी सम्राट त्याच्यापुढे आपली मस्तके लववून जमिनीवर लोळण घेतात. तो अपराध्यांना शिक्षा करण्यासाठी आतुरलेलाही नाही किंवा क्षमा मागणाऱ्यांचा उपमर्दही करीत नाही. त्याला दुष्कृत्याची चीड आहे. परंतु क्षमेची याचना केल्यावर मात्र तो गुन्ह्यांचा पाढा वाचत बसत नाही.

या जगात प्रत्यक्ष बापाला देखील आपल्या भांडकुदळ मुलाचा भलताच राग येतो. त्याचप्रमाणे तासन् तास भांडल्यावर देखील भांडण मिटले नाही तर भांडणाऱ्यांची तेढ वृद्धीस लागून ते एकमेकांच्या विनाशासाठी कंबरा कसतात. मित्रावरील लोभ मावळताच ते एकमेकांपासून कोस कोस दूर राहतात. त्याचप्रमाणे कोणा शिपायाने आपल्या कामात हयगय केली तर सेनापती किंवा सम्राट त्याच्यावर रागावतो. पण दोन्ही जगांचा भगवान कोणा मर्त्य माणसाने अपराध केला म्हणून त्याच्या तोंडचा घास कधी हिरावून घेत नाही. त्याच्या ज्ञानसागरात ही दोन्ही जगे एका बिंदूप्रमाणे होत. मनुष्य स्खलनशील असल्याने त्याच्या प्रमादांवर तो प्रेमाचे पांघरूण घालतो.

जग ही देवाने चालविलेली धर्मशाळा. येथे बरे आणि वाईट सर्व सारखे. त्यानेच बडगा उचलला तर त्याच्या तडाख्यातून कोण वाचेल ? शक्तीत किंवा शत्रुत्वात त्याच्या तोडीचा असल्याचा कोणी थट्टेत देखील दावा करू शकत नाही. मानव व इतर प्राणिमात्रांच्या आळवण्या त्याच्या गावच्या वेशीत सुद्धा पोहचत नाहीत. माणसे, पाखरे, मुंग्या आदी समस्त सृष्टी त्याच्या अंकित आहे. त्याचे अन्नछत्र इतके विशाल आहे की त्यात सीमुर्ग पक्ष्याला तो जेथे राहतो त्या काफ डोंगरावर देखील दाणापाणी मिळते. तो परमशुद्ध, कृपानिधान, कार्यकुशल, जगत्पालक आणि सकळ रहस्यांचा ज्ञाता आहे. जरी त्याने अहंपणा दाखविला तरी तो त्याला शोभणारा आहे. कारण त्याचे राज्य पुरातन आहे व तो स्वयंभू सम्राट आहे. तो कोणाच्याही शिरावर राजमुकुट ठेवील किंवा कोणाही बादशहाला तक्तावरून खाली

खेचेल. भाग्यरूपी पगडी डोक्यावर ठेवणारा तोच आणि कंबक्तीचे कांबळे काखेत बाळगविणाराही तोच.

त्याने खलीलसाठी केवळ आपल्या इच्छाशक्तीने चितेची बाग बनविली व नील नदीच्या पाण्यावर आगीचा लोळ उठवून एका फौजेचा फन्ना उडवला. चितेत बाग निर्माण करण्याची त्याची पहिली इच्छा त्याच्या कृपेची साक्ष पटविते तर पाण्यावर आग निर्माण करण्याची इच्छा त्याच्या क्रोधाग्नीचे प्रतीक होय. पडद्याआड घडणारी कुकर्मे पाहणारा तोच व त्याची कृपा असली तर त्या कुकर्मावर त्याच पडद्याचे पांघरूण घालणाराही तोच. ज्या वेळी धाक बसविण्यासाठी आपली आज्ञारूपी तलवार तो उपसतो तेव्हा फरिश्ते किंवा गंधर्व यांची देखील बोबडी वळते व त्यांना काहीच उमज पडेनासा होतो. पण कृपावंत होऊन त्यानेच जर दीनोद्धाराचा हुकूम दिला तर अजाजिल या सैतानाला त्या कृपेचा वाटेकरी व्हावेसे वाटते. त्याचे माहात्म्य आणि सौहार्द यांची प्रतीती येताच थोर बिभूतींनीही आपल्या थोरवीचा त्याग करून लीनता पत्करली. दीनपणे आचरण करणाऱ्यांना त्याच्या कृपेचा मार्ग मोकळा होतो आणि त्याच्याशी जवळीक निर्माण होते. अर्जीजी करणाऱ्यांची आर्जवे तो ताबडतोब ऐकतो. त्याच्या बुद्धीला अघटित घटनांचे आकलन होते व तो सर्वज्ञ असल्याने त्यास गूढ व अव्यक्त गोष्टी देखील कळतात. तो भूलोक व अंतराळ यांचा रक्षणकर्ता आहे व कयामतीच्या दिवशी न्यायासन मंडित करणारा तोच. त्याची भक्ति न करणारा असा कोणी आढळत नाही आणि त्याचा आलेख कोणी खोडू शकत नाही. तो परम पुरातन असून स्वत: सत्प्रवृत्त व पुण्यकारी आहे. तो आपल्या अद्‌भुत कुंचल्याने गर्भात देखील चित्रण करू शकतो. चंद्रसूर्यासाठी त्याने पूर्व ते पश्चिम अशी गती ठरवून दिली व पाण्यावर पृथ्वीची स्थापना केली. कंपायमान पृथ्वी स्थिर होत नाही असे पाहून त्याने तिच्यावर पर्वतश्रेणींचे खिळे ठोकले. वाहते मानवी रेत ते काय, पण तो त्यास अप्सरेचे लावण्य देतो. वाहत्या पाण्यावर आजवर कोणी चित्र काढले आहे काय ? तो दैदीप्यमान रत्ने माणके दगडातून उत्पन्न करतो. स्वातीच्या ढगातून जलबिंदू समुद्रात (शिंपल्यात) आणतो आणि पित्याच्या कोशातून रेतबिंदू मातेच्या उदरात पोचवितो. एका बिंदूतून चमकदार मोती व दुसऱ्या बिंदूतून सरू झाडासारखी गोंडस कृती तोच निर्माण करतो.

त्याच्या चिन्मयत्वामुळे अज्ञात अशी कोणतीच गोष्ट रहाणे शक्य नाही; व त्याच्यापुढे प्रकट आणि गुप्त असे द्वंद्व कधीच उभे राहत नाही. साप, मुंग्या व हातपाय नसलेल्या कित्येक प्राण्यांना अन्नपाणी पुरविण्यात तो गुंतला आहे. त्याच्याच आज्ञेने 'असत्' पासून 'सत्' उद्‌भवले. असे अघटितघटनापटुत्व त्याच्याशिवाय इतर कोणापाशी आहे बरे ? हा महान सृष्टिसंभार तोच 'असत्' रूपी पडद्याआड दडवू शकतो व कयामतीच्या (अंतिम न्यायदानाच्या) दिवशी न्यायासाठी आपल्यासमोर

उभा करू शकतो. हे विशाल विश्व साकल्याने त्याच्याच वैभवाची ग्वाही देते. त्याच्या माहात्म्याची व पदुत्वाची मर्मे शोधताशोधता सर्वच थकले, पण त्यांना त्याच्या अपार महिम्याशिवाय दुसरे काहीच आढळले नाही. कोणालाही आपल्या अल्पशा शहाणपणाच्या साहाय्याने त्याच्या आगळ्या दिव्य स्वरूपाचा साक्षात्कार होऊ शकत नाही. संदेह आणि तर्करूपी पक्षी उंचीवरून देखील त्याच्या सहजगंभीर अस्तित्वाची टेहळणी करू शकत नाहीत. बुद्धीची बोटे त्याच्या सगुणत्वाच्या पेहरावाला स्पर्शही करू शकत नाहीत. ब्रह्म (ईश्वर) जिज्ञासेच्या भोवऱ्यात हजारो नावा सापडल्या व बुडाल्या पण त्यांचे एखादे फळकूटही किनाऱ्यास लागले नाही.

या सृष्टीचा विचार करीत मी रात्रीच्या रात्री घालविल्या आहेत. पण भीती मूर्तिमंत माझ्यासमोर उभी राहिली व तिने मला म्हटले, " हे बिचाऱ्या जिवा ! उठून उभा राहा." ईश्वराच्या सत्तेचा आणि ज्ञानाचा या भूमंडळाभोवती पडलेला विळखा पाहा. तुझी विचारशक्ती अशीच त्याला घेरू शकेल काय ? त्याच्या सहजगंभीर अस्तित्वाच्या मर्मापर्यंत आणि त्याच्या सगुणत्वाच्या सत्यापर्यंत तुझी तर्कशक्ती पोचणार नाही. विद्वत्तेत कोणीही सेहबा या प्राचीन थोर पुरुषाची बरोबरी करू शकेल पण एकमेवाद्वितीय, व परमपवित्र परमेश्वराची अगम्यता व अगाध ज्ञान यांची बरोबरी कोणासही करता येणार नाही. कित्येक थोर विभूतींनी ईश्वर-जिज्ञासेच्या मार्गावर घोडदौड केली; पण काहीच हाती न लागल्याने त्यांना थकून स्वस्थ बसावे लागले. त्यातूनही ईश्वराचे रहस्य कोणाच्या हाती जरी पडले तरी ते सांगण्यासाठी परतत असताना दरवाजाच बंद होतो व अशा रीतीने या जगातील संसारी लोकांना सांगण्यासाठी म्हणून संग्रह केलेली रहस्ये त्यांच्यापाशीच राहतात. ईश्वराचे स्वरूप जाणण्यासाठी धडपडणाऱ्यांच्या मैफलीत जर ईश्वरज्ञानरूपी पेला कोणाच्या हाती लागेल तर त्यात गुंगी आणणारी सुराच मिसळलेली असेल.

या जगात दोन जातींचे पक्षी आहेत. त्यांतील एक संसारी मानव. त्याचे डोळे बांधलेले असतात. दुसरा पक्षी फकीर. त्याचे डोळे उघडे असतात; पण पंख जळालेले असतात. लौकिक धर्मात्मे ईश्वराच्या सत्य स्वरूपाविषयी आंधळेच असतात; पण उपासना, प्रवचन, उपदेश यांसारखे पंख फडफडवीत असतात. दुसरे संतसज्जन वल्ली लोक आहेत. त्यांना सत्यज्ञान होते, पण त्यांच्या अवीट सेवनाने ते झिंगलेले असतात व मस्त होऊन पडून राहतात. तात्पर्य हे की एक तर कारूनच्या (कुबेराच्या) खजिन्याकडे जाण्याचा मार्गच कोणाला सापडत नाही आणि जर कोणाला सापडलाच तर त्याला तेथून बाहेर पडण्याचा मार्ग गवसत नाही.

या लोहित सागरातून कोणीही नाखवा आपली नाव किनाऱ्यास आणू शकलेला नाही. तू जिज्ञासू असलास तर जमीन सर कर आणि परत फिरू इच्छिणाऱ्या मनरूपी घोड्याचे पाय छाटून टाक. हे प्राण्या, आपल्या मानसदर्पणात न्याहाळून पाहशील

तर हळूहळू तुला (सत्याची) प्रतिमा स्पष्ट दिसू लागेल. पण ईश्वरज्ञानाच्या सुगंधाने तू उन्मत्त होशील व तू "अलस्त बिरंबे कुम" या महामंत्राचा घोष करू लागशील.

जिज्ञासेच्या पायाने तू येथपर्यंत पोहोचल्यानंतर तेथून प्रेमाचे पंख बनवून तू उड्डाण कर. तुला प्रतीती लाभल्यावर ती संदेहाचे पडदे फाडून फेकून देईल आणि शेवटी परमेश्वराच्या महानतेशिवाय भक्त आणि भगवंतामध्ये इतर कोणताच पडदा राहणार नाही.

दुवा देणाऱ्या महम्मद पैगंबराशिवाय कोणीही या मार्गाने पार गेला नाही. त्याला शरण न जाणारा वाट चुकतो. त्या पैगंबराच्या मार्गापासून परतणाऱ्याच्या वाट्याला केवळ चालत राहणे आणि कष्ट भोगणे हेच येते. पैगंबराच्या मार्गापासून परतणारा कधी मुक्कामावर पोचत नाही. सादी, मुस्तफा पैगंबर महम्मदांना शरण गेल्याशिवाय कोणीही सुपंथ धरू शकेल अशा भ्रमात तू राहू नकोस !

## दोन्ही जगांना आनंद देणारे हजरत महम्मद पैगंबर ( ईश्वर त्यांच्यावर शांतीचा वर्षाव करो ) यांचे स्तवन

सत्प्रवृत्त व सत्कर्मी असे मानवांचे पैगंबर व अनुयायांचे त्राते,
पैगंबरांचे इमाम व सत्पंथाचे पेशवे,
खुदाचे अमीन आणि जिब्रईलचे पृथ्वीवरील स्थानक,
सृष्टीचे रक्षणकर्ते आणि कयामतीच्या दिवसांचे नायक,
सदुपदेशाचे अग्रणी कयामतीच्या दिवशी न्यायासनाच्या अग्रभागी बसणारे,
ते दिशांचे स्वामी आहेत व हे फिरते आसमान त्यांचा तूरमेरू आहे.

जगातील सगळे तेज त्यांच्या तेजाचे एक किरण होय. खरे म्हटले तर ते यतीम-अनाथ निरक्षर बाळ आहेत. पण त्यांनी अनेक धर्माची शास्त्रे रद्द करून टाकली आहेत. जेव्हा त्यांनी आपली इच्छारूपी भीमतलवार उपसली तेव्हा आपल्या मायेने चंद्राचे दोन तुकडे केले.

जेव्हा त्यांच्या संभवाची बातमी जगात पसरली तेव्हा इराणच्या खुसरू बादशहाचे प्रासाद गडगडले.

त्यांच्या "ला इलाह इल्लुल्ला" या घोषणेने लात व उज्जा (या मक्केतील प्राचीन देवळांतील) प्रतिमा छिन्नविच्छिन्न झाल्या.

महम्मदी धर्माच्या वर्चस्वामुळे मूर्तिमाहात्म्य संपुष्टात आले.

त्यांनी फक्त लात व उज्जा यांचाच अंत केला असे नव्हे, तर यहूद्यांचे तौरेत व ख्रिश्चनांचे बायबल यांचेही खंडन केले.

एका रात्री ते आपल्या अबरक घोड्यावर स्वार होऊन अंतराळात शिरले.
आणि मानसन्मानात ते फिरिश्त्यांपेक्षा श्रेष्ठ ठरले.

त्यांनी या मैदानात अशी भरारी मारली की जिब्राईलही सिद्रा या मुक्कामाच्या पुढे त्यांच्याबरोबर जाऊ शकला नाही.

तेव्हा त्याला उद्देशून मक्केचे सरदार महम्मद यांनी म्हटले, "जिब्राईल, चल पुढे हो".

"आमच्या स्नेहात तुला काही कमीपणा वाटला नाही तर आता माझी साथ करताना लगाम का आवळत आहेस?"

## जिब्राईलची पैगंबर स्तुती

जिब्राईल म्हणाला, "येथून पुढे जाणे माझ्याने होणार नाही. माझ्या हातापायात त्राण राहिले नाहीत म्हणून मी थांबलो. मी जर एका केसाइतकाही पुढे गेलो तर दिव्य तेजाने माझे पंख जळून जातील".

आपल्यासारखा गुरू ज्याला लाभला आहे तो हीन कामात कसा गुंतून राहील?

प्राणीमात्राचे पैगंबर, आपल्या योग्य असे आपले स्तवन मी कसा करू शकेन?

कारण आपण "सलात् व सलाम" चे मानकरी आहात. आपल्यावर ईश्वराची कृपा असो.

तशीच ती आपल्या साथीदारांवर व अनुयायांवर असो.

सर्वप्रथम आपल्या थोर शिष्यावर म्हणजे खलीफा अबूबक्रवर (महम्मदाचे श्वशुर), त्यानंतर महाबली खलीफा उमर (श्वशुर) वर.

नंतर रात्रीचे दिवस करणारे उस्मान (जामात) यांच्यावर.

चौथ्या स्थानी पैगंबरांनी दिलेल्या दुलदुल घोड्यावर स्वार होणाऱ्या हजरत अली (जामात) यांच्यावर कृपा असो.

हे देवा, फातिमेच्या प्रजेची आण! मी मरताना माझ्या तोंडी श्रद्धासूत्र (ला इलाह इल्लुल्लाह) राहू दे.

माझी प्रार्थना रद्द कर अथवा मान्य कर.

पण माझा हात मात्र पैगंबराचे नातू व फातिमेचे पुत्र यांच्या सदऱ्याला धरून राहोत. मला त्यांच्यावर ओवाळून टाकले तरी बेहत्तर!

हे श्रेष्ठ सरदारा! देवाच्या दरबारात आपले स्थान काही कमी इज्जतीचे नाही.

आपल्या स्वर्गातील दा स्सलाम अतिथिगृहात आपले काही दास निमंत्रणा-शिवाय आले म्हणून काय कमतरता भासणार आहे?

भगवंतानेच आपली महती गायिलेली आहे व माहात्म्य वर्णिलेले आहे.

आपल्यासमोर जिब्राईल आला तर तो सन्मानपूर्वक जमिनीचे चुंबन घेईल.

आकाशाची उंची देखील आपल्या योग्यतेपुढे ठेंगणी वाटेल.

आपण केव्हाच जन्मले होतात. पण अजून आदम या आदिपुरुषाच्या उत्पत्तीची तयारी चालली होती.

यामुळे आपणच अस्तित्वाचे मूळ ठरला.

इतर सृष्ट वस्तू आपल्या पाठोपाठ आलेल्या आहेत.कारण मी वर्णन करीन त्यापेक्षा आपण कितीतरी श्रेष्ठ आहात.

कुराणातील "लोलाक" हा श्लोक आपली योग्यता दाखवितो.

त्याचप्रमाणे "ताहा व यअस्मीन" हे कुराणातील अध्याय आपले यथार्थ वर्णन करू शकतात.

हा हीनदीन सादी आपली स्तुती काय करू शकेल ?

तो फक्त आपल्याला "सलात् व सलाम" अर्पण करतो.

## ग्रंथ रचण्याचा हेतू

मी या जगात खूप फिरलो.

कित्येक भल्याबुऱ्यांच्या सहवासात आयुष्य वेचले.

प्रत्येक ठिकाणी मला काही ना काही लभ्यांश मिळाला.

प्रत्येक खळयात मला काही कणसे मिळाली.

शीराज मधील लोकांसारखे सोवळे लोक मला कोठेच आढळले नाहीत.

देवाची कृपा या भूमीवर राहो.

या पवित्र भूमीतील लोकांच्या प्रेमामुळे देशांतर करून भटकत राहणाऱ्या मला शामरूम (सिरिया-तुर्कस्तान) मध्ये चैन पडले नाही.

पण त्या मोठया देशातून रिकाम्या हातांनी परतणे देखील मला रुचले नाही.

मी मनात म्हटले, "लोक मिस्र (इजिप्त) देशातून मिसरी (खडीसाखर) आणतात व आपल्या इष्ट मित्रांना देणगीदाखल बहाल करतात.

पण माझ्यापाशी मिसरी-खडीसाखर नव्हती, पण मिसरीपेक्षा कितीतरी गोड अशी वाणी तरी होती ?

ही खडीसाखर म्हणजे लोक आपल्या तोंडात टाकून चघळतात ती नव्हे.

ही मिसरी शहाणे लोक कागदावर मांडतात.

मी हा ग्रंथरूपी महाल उभा केला.

त्यात दहा दालने बसविली.

पहिले दालन न्याय, नीती व विवेकाचे. प्रजेच्या रक्षणासंबंधीचे आणि ईश्वराच्या ठिकाणी भीतियुक्त भक्तीचे.

दुसरे दालन परोपकाराचे सजविले.

कारण उपकारकर्ता स्वतःच परमेश्वराचे उपकार फेडत असतो.

तिसरे दालन ईशप्रेमाचे व परमानंदी रंगण्याचे. हे प्रेम कोणी मारून-मुटकून जबरदस्तीने करायला लावत नाही.

चौथे दालन शुचितेचे आणि पाचवे भगवंताच्या इच्छेचे. सहावे दालन भक्त तृप्त मनाने ध्यानमग्न होण्याचे.

सातव्या दालनात शिक्षणविषयक चर्चा केली आहे.

आठव्या दालनात आरोग्य दिल्याबद्दल देवाचे आभार मानले आहेत.

नवव्या दालनात क्षमायाचना (तौबा) आणि सन्मार्गाची महती सांगितली आहे.

दहाव्या दालनात देवाची स्तुती व ग्रंथाचा समारोप केला आहे.

शुभ संवत्सरी-शुक्रवारच्या दिवशी जिलकाद महिन्याच्या शुद्ध तिथीच्या मुहूर्तावर.

हिजरी शकाच्या सहाशे पंचावनाव्या वर्षी हा मह्शूर खजिना माणिक-मोत्यांनी भरला.

हे सद्गुणी सज्जनांनो ऐका।

दुसऱ्याच्या उणिवा मोजणारा कुशल कारागीर असतो असे मी कधी ऐकले नाही.

कबा (अंगरखा) रेशमी असो की चिनई भरतकाम केलेला असो त्याला भरतीस आत कापूस घालूनच शिवायला हवे.

तू चिनई भरतकामाचा असशील तर दुसऱ्यांचे दोष शोधू नकोस ! मेहेरबानी कर आणि माझे दोष पोटात घाल.

मी काही स्वतःला मोठा विद्वान म्हणवून घेत नाही उलट मी माझे भिक्षापात्र तुझ्यापुढे धरतो.

मी असे ऐकले आहे की भगवान कयामतीच्या दिवशी न्यायदान करताना सज्जनांची कास धरून चालणाऱ्या दुर्जनानांही क्षमा करतो.

जर तुला माझ्या कलाकृतीत काही दोष आढळला तर तू ही भगवंताप्रमाणेच माझ्या दोषांकडे दुर्लक्ष कर.

या हजार श्लोकांतून एक जरी तुला आवडला तरी कृपा करून तुझे टीकास्त्र आवरते घे. खोतान (तार्तर) देशात कस्तुरीला लाभतो तेवढाच मान फारस देशात-इराणात माझ्या कवितेला मिळतो. ढोलाच्या आवाजाने दुरूनसुद्धा भीती वाटते तसा हा प्रकार नाही. माझ्या झोळीत दोषच भरले होते. सादीने बागेत फुले आणणे म्हणजे हिंदुस्थानात मिरी आणण्यासारखे व्यर्थ व वेडेपणाचे काम आहे. माझी कविता खजुरासारखी बाहेरूनच गोड आहे. आत खोलून पाहशील तर टणक बीशिवाय दुसरे काहीच आढळणार नाही.

## राजगुरु थोरले ( अताबक ) अबूबक बिन साद जंगी याची स्तुती

मला तर लिहिण्याचे काम आवडत नव्हते आणि बादशहांची खुशामत किंवा मखलाशी करणे देखील मला पसंत नव्हते. पण मी सादच्या नावाने काव्य रचले.

त्याचे कारण असे की जेव्हा अधिकारी लोक माझे काव्य वाचतील तेव्हा त्यांना एवढे तरी माहीत होईल की महान साहित्यिक सादी अबूबक्र बिन साद याच्या कारकिर्दीत होऊन गेला.

खरेच त्याची कारकीर्द मला अभिमान वाटावी अशी आहे.

तिला उपमा द्यावयाची म्हणजे इराणचा न्यायी राजा नोशेरवान याच्या कारकीर्दीची द्यावी लागेल. ती खुद्द पैगंबर महम्मदांना अभिमान वाटण्यासारखी होती.

अबूबक्र हा धर्मात्मा व न्यायी राजा आहे. खलिफा उमर याच्यानंतर तसा न्यायी राजा झाला नाही.

हे जगा, श्रेष्ठांत अतिश्रेष्ठ बादशहांचा मुकुट असा तू त्याच्या न्यायी राजवटीबद्दल अभिमान बाळग. दंग्याधोप्यांना कंटाळून जर एखादा मनुष्य आश्रय शोधत असेल तर ह्याच्या राज्याशिवाय त्याला अन्यत्र कोठेही निवांतपणा लाभणार नाही.

सादच्या दरबाराचा विजय असो. काब्याप्रमाणे गिरिकंदरांतून लोक तिकडेच धाव घेतात.

बालांच्या, तरुणांच्या आणि वृद्धांच्या कल्याणासाठी वाहिलेली अशी कोषागार, राज्य आणि सिंहासन ही त्रयी मी कधी पाहिली नाही.

संकटांनी पछाडलेला त्याच्यापाशी आला आणि त्याची योग्य शुश्रूषा झाली नाही असे कधी झालेच नाही. तो सदासर्वकाळ प्रजेच्या कल्याणाची चिंता वाहतो. देवा तू त्याच्या सर्व मनीषा पूर्ण कर.

त्याच्या किरिटाचे टोक आकाशास भिडलेले आहे. पण त्याचे मस्तक मात्र लीनतेमुळे जमिनीला लागले आहे. बादशहांची लीनता केव्हाही त्यांना शोभणारी अशी आहे. कारण भिकाऱ्याला केवळ सवयीमुळेच लीन असावे लागते. कोणी दुबळा माणूस आर्जवे करील तर त्यात काही नवल नाही. पण तेच एक महाबली नम्रता धारण करील तर तोच खरा दैवी पुरुष ठरेल. त्याने केलेल्या सत्कार्याला गुप्त ठेवताच येत नाही. कारण त्याच्या थोरवीची कीर्ती सर्वत्र पसरली आहे. त्याच्या कारकीर्दीत तुला कष्टी मनुष्य आढळणार नाही. कोणी पुंडाने छळ केल्याबद्दल तक्रार कधी ऐकू येणार नाही. ह्याच्या कारकीर्दीतील कायदा व सुव्यवस्था पूर्वी कधी नव्हती इतकी आहे.

थोर राजा फरीदून याचा लौकिक मोठा होता. तरीदेखील त्याचे राज्य याच्या तोडीचे नव्हते. देवाच्या दरबारात याचे वजन मोठे आहे कारण याच्या दरबारात दुर्बळांना मोठा आधार आहे. त्याच्या आश्रयाच्या छायेत दुर्बळांना इतका धीर येतो की एखादी म्हातारीदेखील रुस्तुमसारख्या मल्लाची पर्वा करत नाही.

या जगात सारेजण कालचक्राच्या छळवादाला कंटाळलेले असतात.

पण, हे बादशहा, तुझ्या न्यायनिष्ठ कारकीर्दीत कोणी कालचक्राच्या वक्रगतीचेही गाऱ्हाणे गात नाही. तुझ्या राज्यात प्रजा निर्धोक आहे. पण तुझ्यानंतर तिची काय अवस्था होईल ते मला माहीत नाही. तुझ्या वैभवाची ग्वाही देण्यासाठीच तुझ्या बादशाहीतच **सादीचे** बोस्तान महाकाव्य लिहिले जात आहे.

आकाशात सूर्यचंद्र आहेत तोपर्यंत या ग्रंथातील तुझी स्तुती चिरकाल राहील.

तुझ्या आधी जे अनेक मोठे बादशहा होऊन गेले, त्यांनी आपल्या पूर्व सूरींचा कित्ता गिरवला. पण तू आपल्या अलौकिक चांगुलपणामुळे आधीच्या सर्व बादशहांवर मात केली आहेस.

एवढा मोठा पराक्रमी शिकंदर पण त्याला देखील याजूज, माजूज या दोघा पुंडांचा उपद्रव रोखण्यासाठी दगड आणि शिशाची भिंत उभारावी लागली. पण तू मात्र शिकंदरासारखी शिशाची भिंत न बांधता केवळ द्रव्य देऊन दुष्ट काफर चंगेजखान याचा उपद्रव टाळलास तुझ्या राज्यातील न्याय आणि सुरक्षितता यांनी समृद्ध अशा बादशाहीत जर कोणी कवी तुझा ऋणी न होईल तर त्याची जीभच नष्ट होवो. तू करुणेचा सागर आणि दातृत्वाची खाण आहेस. म्हणूनच तुझ्यामुळे साऱ्या प्रजेला मोठा आधार आहे. या बादशहाचे गुण अगणित आहेत. ते या छोटचा पोथीत सांगता येण्यासारखे नाहीत.

जर सादीने त्या सर्वांचा उल्लेख केला तर त्यांचेच एक असे वेगळे पुस्तक तयार होईल. मी त्याच्या मेहेरबानीमुळे कृतज्ञतेने इतका भारावून गेलो आहे की त्याचे कल्याण करण्यासाठी देवाला हात जोडणे हेच श्रेयस्कर होवो.

जग तुला अनुकूल होवो, कालचक्र तुला साहाय्य करो, आणि परमेश्वर तुझा वाली होवो. तुझ्या भाग्याच्या नक्षत्राने जगाला दिपविले; आणि ऱ्हासाच्या ताऱ्याने तुझ्या वैऱ्यांना जाळून टाकले.

देवाच्या कृपेने तुला जमान्याच्या फेऱ्याची बाधा न होवो, आणि तुझ्या हृदयावर चिंतेचा कश्मल न साठो. कारण बादशहाच्या हृदयातील दुःखाने सारी दुनिया चिंताक्रांत होते. तुझे हृदय आणि राज्य सुसंघटित व आबाद राहो.

तुझ्या राज्यातून दैन्याचे उच्चाटन होवो. तुझ्या काळात जसे धर्माचे रक्षण झाले आहे तसेच तुझ्या देहाचे रक्षण होवो. आणि तुझ्या शत्रूंची मती जशी कुंठित झाली आहे तसेच त्यांचे अंतःकरण खिन्न होवो.

ईश्वराच्या आधाराने तुझे अंतरंग प्रसन्न असो.

तुझे मन, धर्म आणि राज्य हे सर्वच सुरक्षित राहो.

सृष्टीचा कर्ता तुझ्यावर कृपावंत होवो. या आशीर्वचनाखेरीज जे काही मी म्हणेन ते सर्व निरर्थक होवो.

तुझे भाग्य दिवसेंदिवस वृद्धिगत होवो एवढीच प्रार्थना मी देवाजवळ करतो

तू या पवित्र परमेश्वररूपी बीजाचाच अंकुर आहेस यात नवल वाटण्याजोगे काही नाही.

कारण, त्याच्याप्रमाणे तुझे प्राण अंतरिक्षात आणि देह जमिनीवर आहे.

देवा त्या धनवंताच्या थडग्यावर शांतीचा वर्षाव कर.

साद जंगीची कीर्ती सगळ्यांच्या तोंडी आहे. देव त्या सादबिन अबूबक्रचा पाठीराखा आणि पालनकर्ता होवो.

## सादबिन अबूबक्र बिन साद या शाहजाद्याची स्तुती

शाहजादा साद तरुण, भाग्यवान आणि विवेकी आहे. वैभवाच्या दृष्टीने तो तरुण आहे पण हिकमतीत तो वृद्ध आहे. तो विद्येत प्रतिष्ठित आहे. त्याची हिम्मत दांडगी आहे.

त्याच्या बाहूंत शौर्य आहे. हृदयात विवेकाचे वास्तव्य आहे आणि मनात प्रज्ञेचे प्रतिष्ठान आहे.

जमान्याची माय मोठी भाग्यवान खरी कारण तिने तुझ्यासारख्या बाळाचे संगोपन केले.

तू आपल्या उदारतेने सागराची विशालता तुच्छ बनविलीस आणि कृत्तीकेची (सुरैय्या) उंचीदेखील तुझ्या उंचीपुढे थिटीच पडते. तुझी अवहेलना करणाऱ्या शाहजाद्यांनी तुझ्या वैभवापुढे मस्तक नमविले आहे.

शिंप मोत्याने युक्त असली तरी तिला दरेयतीम ( दीननिलय ) ची सर येत नाही. तू शिंपल्यातील सुप्त असा एकमेव मोत्याचा दाणा आहेस आणि तुझ्यामुळे साऱ्या सलतनतीला शोभा आली आहे.

इलाही ! तू याला सुरक्षित ठेवून त्याची देखरेख कर आणि त्याला वाइटांची नजर लागू देऊ नको.

साऱ्या जगात त्याची कीर्ती पसरू दे आणि त्याला तुझा दास बनण्याची बुद्धी दे.

त्याला न्यायी आणि नीतिवंत कर. त्याच्या ऐहिक आणि पारमार्थिक इच्छा पूर्ण होवोत.

हे राजपुत्रा, तुला दुष्ट दुष्मनांची चिंता न उरो. कालचक्राच्या गतीची तुला बाधा न होवो.

स्वर्गातील कल्पवृक्ष तुझ्यासारख्या गोड फळाने समृद्ध होवो. पित्याची कीर्ती आणि पुत्राची प्रतिष्ठा वाढो.

याच्या वंशाला नावे ठेवणाऱ्यांच्या कुटुंबाला सौख्य लाभणार नाही.

जय जय जय ! धर्म, ज्ञान, न्याय, नीतिमत्ता, राज्य आणि वैभव हे चिरकाल नांदोत.

□ □ □

# प्रकरण पहिले

## न्याय, समृद्धी, विवेक आणि व्यवहार

देवाची कृपा ही कल्पनेने गवसणारी नसते.

मिंधी जिव्हा सेवा कसली करणार?

देवा! ह्या साधुजनप्रिय बादशहाच्या छायेत प्रजा निश्चिन्त राहात आहे. त्याचे आधिपत्य चिरकाल राहो.

देवाच्या ठिकाणी त्याची श्रद्धा व दास्यभाव चिरकाल राहो. त्याचा आशा-वृक्ष सदा फलदायी होवो. त्याचे मस्तक चिरतारुण्याची ग्वाही देवो. त्याचे वदन तुझ्या कृपेची साक्ष पटवो.

हे सादी, तू शिष्टाचाराच्या भानगडीत पडू नकोस. तुला जर काही सत्य कथन करावयाचे असेल तर ते स्पष्ट बोलून टाक.

तुला मार्गक्रमणाचा अनुभव आहे.

आणि बादशहा एक प्रवासी आहे.

तू सत्यभाषी आहेस आणि बादशहा सत्यप्रिय आहे.

कजल अरसलानच्या पायाखाली नऊ आसमानांचे सिंहासन ठेवण्याचे कारण काय?

आपली प्रौढी मिरविण्यासाठी कोणासही आकाशाकडे धाव घेण्यास सांगू नये. तर उलटपक्षी विनयाने ईश्वर पूजनद्वाराच्या उंबरठ्यावर मस्तक टेकण्यास सांगावे.

आकाशाकडे पाहावे ते दास्य पत्करूनच.

कारण, हाच सात्त्विक लोकांचा मार्ग होय.

तू जर देवाचा दास असशील तर त्याच्या दारावर मस्तक टेकव. पाटीलकीचे पागोटे डोक्यावरून उतरव.

तू जर दास असशील तर सुलतानाचा पेहराव सोडून दे. आणि सभ्य दरवेशाप्रमाणे देवाची आळवणी कर आणि दुवा माग.

आणि म्हण, "हे परवरदिगार तूच महाप्रतापी आहेस! तुझ्याच ठिकाणी सामर्थ्य आहे आणि साधुसंत दरवेशांचा तूच प्रतिपालक आहेस. मी काही दिग्विजयी वीर नव्हे किंवा राज्यकर्ताही नव्हे. खराच मी या दरग्याचा फकीर आहे.

माझ्यासारख्या दुबळ्याकडून अशी कोणती मोठी कामगिरी होऊ शकेल? पण तीच तुझ्या कृपेची मला साथ लाभेल तर मात्र मला मोठे साहाय्य होईल.

तू जागृत होऊन मला सद्गुण बहाल कर नाहीतर मला कोणाचेही भले करता

येणार नाही. समज, तू दिवसा बादशाही करीत असलास तरी, तू खऱ्या फकिरांसारखा रात्रभर तळमळीने दुआ माग!

तू जर ध्यानासाठी मस्तक देवाच्या दरवाज्यावर नमविलेस तर अत्यंत उद्धट लोक देखील तुझ्या दारी येवून तुझी सेवा करतील. देवाचा महिमा गाणारा नरपती मिळणे हे खरोखर प्रजाजनांचे सद्‌भाग्यच होय."

* * *

रूदबार शहराच्या मैदानातून चित्त्यावर स्वार होऊन येत असलेला एक गृहस्थ मी पाहिला.

त्यास पाहून माझे धाबे दणाणले. पुढे पाऊल ठेवण्याची देखील माझ्यात शक्ती राहिली नाही.

मी स्मित करत बोट ओठावर ठेवून स्वतःशीच म्हटले, "सादी! जे तू पाहिलेस त्याचे नवल वाटून घेऊ नकोस.

तू भगवंताची आज्ञा उल्लंघू नकोस म्हणजे तुझी आज्ञाही कोणी उल्लंघणार नाही.

राजाने परमेश्वराची आज्ञा पाळली तर भगवंतदेखील त्याचा वाली आणि पाठीराखा होतो.

तो तुझा सखा बनल्यावर तुला तुझ्या दुश्मनाच्या हाती खुशाल सोडून देईल असे कधी घडणार नाही.

हाच सन्मार्ग होय. तू तो सोडू नकोस आणि सूफी सिद्धांताला कधी कंटाळू नकोस."

ज्याला सादीचे म्हणणे पसंत आहे त्यालाच लोकांना उपदेश करणे जमेल.

बादशहा नोशीरवान (कसरा) हुरमुजला उपदेश करतो.

मी ऐकले की बादशहा नोशीरवानने मृत्यूसमयी आपल्या हुरमुज नावाच्या मुलाला असा उपदेश केला

"साधुजन-दरवेशांची निगा राख आणि आपल्या भोगविलासात मग्न होऊ नकोस.

तुला स्वतःच्याच आरामाची फिकीर असेल तर तुझ्या प्रजेला आराम मिळणार नाही."

मेंढ्यांच्या कळपात लांडगा शिरला असताना धनगर झोपी गेलेला कोणत्या शहाण्याला आवडेल?

ऊठ! जागा हो! साधुजन आणि दुर्बलांची काळजी घे, कारण प्रजेमुळेच राजाला राजमुकुट लाभतो.

प्रजा मूळ आणि सुलतान वृक्ष होय. बेटा ! मुळापासूनच झाडाला मजबुती येते
शक्यतोपर्यंत प्रजापीडन सोडून दे
कारण तसे करून तू आपलीच पाळेमुळे नष्ट करतोस
तुला जर सन्मार्ग हवा असेल
तर हर्षामर्षरहित अशा साधुजनांच्या पंथाचा स्वीकार कर.

ज्याला आपल्या राज्याची हानी टाळावयाची आहे त्याला प्रजाजनांचे होणारे नुकसान कधी खपणार नाही.

जर सुलतानाच्या अंगी असला सद्‌गुण नसेल तर त्याच्या राज्यात सुबत्तेचा सुगंध दरवळणार नाही. तू जर किंकर असशील तर देवाची इच्छा प्रमाण मान आणि जर तू एकाकी साधक असशील तर तुझा मार्ग तू चोखाळत राहा.

ज्या राज्यात प्रजा राजावर नाखूष आहे त्या राज्याचा उत्कर्ष होण्याची आशा बाळगू नको.

घमेंडखोरांपासून सावध राहा.

जो ईश्वराला भीत नाही त्याची खरीच तुला भीती वाटायला हवी.

जो राजा प्रजाजनांच्या मनाला यातना देतो त्याचे राज्य समृद्ध होणे केवळ स्वप्नातच शक्य आहे.

जुलूम केल्याने विनाश आणि अपकीर्ती या दोहोंचा तडाखा निश्चित बसतो असे अनुभवी वृद्धांचे ठाम मत आहे.

जुलूम करून प्रजेचा नाश करता कामा नये. कारण प्रजाच कोणत्याही राजाचा पाठीचा कणा होय.

प्रजाजनांचे कल्याण तू स्वार्थासाठीच कर कारण मजूर खूष झाल्यावरच तो अधिक काम करू शकेल.

तसे कोणाचेही अकल्याण करणे शिष्टसम्मत नव्हे. त्यातून तर ज्याच्यापासून तुझे कल्याण झाले असेल त्याच्याबद्दल वाईट चिंतण्याला काय म्हणावे ?

## खुसरूचा शेरू यास उपदेश

मी असे ऐकले आहे की अंतकाळ जवळ आल्यावर खुसरूने राजपुत्र शेरू यास जवळ बोलावून म्हटले,

"बेटा ! सदासर्वकाळ जनहितचिंतारत असण्याची सवय करून घे. कधी बुद्धिवादी राजकारण सोडू नकोस. म्हणजे तुझी प्रजा दाही दिशांना पांगणार नाही."

प्रजा जुलमी सुलतानापासून पळ काढते आणि देशोदेशी त्याची अपकीर्ती पसरविते.

वाईट प्रथा पाडणारा राजा आपल्या राज्याच्या भावी विनाशाचेच बी पेरतो.

असहाय्य म्हातारीच्या आर्तस्वराने जो अनर्थ ओढवतो तेवढा वाघाच्या पंजाने आणि वीराच्या समशेरीनेही ओढवत नाही.

कोणी अनाथ विधवा जर उसासे टाकील तर तिच्या भडक्याने सारे शहरच जळून खाक होईल हे तू पाहिलेच आहेस.

ज्याने या पृथ्वीतलावर न्यायबुद्धीने राज्य केले त्याच्यासारखा भाग्यवान क्वचितच दुसरा कोणी असेल. तो जेव्हा इहलोक सोडून जातो, तेव्हा त्याच्या समाधीवर सारेच आदरांजली वाहतात.

चांगले लोकही मरतात व वाईट लोकही मृत्यूच्या दाढेत जातात, पण तुझे नाव मात्र चांगल्यांच्या यादीत असावे हे बरे.

जो परमेश्वराची धास्ती बाळगतो त्याचीच प्रजापालनार्थ नेमणूक कर. कारण संयमी पुरुषाकडूनच साम्राज्याची घडी नीट बसते. तुझा फायदा करून देण्यासाठी जो प्रजेची पिळवणूक करतो तो तुझा आणि प्रजेचा शत्रूच होय.

ज्याच्या जुलमाविरुद्ध प्रजा देवाकडे गाऱ्हाणे नेईल अशा माणसाकडे राज्य-कारभार सोपविणे हे केवळ पापच होय !

जो सज्जनांचा सांभाळ करतो त्याला दुष्कर्म सहन होत नाही. तू जर दुष्टांचा सांभाळ करत असशील तर तू स्वतः आपलाच शत्रू ठरशील.

तू वाटेल तर तुझ्या शत्रूला ठार कर, पण त्याचे वित्तहरण करू नकोस.

अत्याचारी अधिकारी (आमिल) किंवा दुष्टआचार्य (आलिम) यांची कधीही कीव करू नकोस. जर ते गलेलट्ठ झाले असतील तर त्यांचे चामडे ओढून काढ.

धनगराच्या मेंढ्या फस्त करण्याआधीच लांडग्याचे मुंडके उडवलेस तरच त्याचा काहीतरी उपयोग होईल.

एका व्यापाऱ्याला चोरांनी चोहीकडून घेरले तेव्हा तो किती छान बोलला म्हणून सांगू !

" डाकू लोक हल्ला चढवितात तेव्हा ते योद्धा आणि **योषिता** असे तारतम्य मुळीच मानीत नाहीत.

जो राजा व्यापाऱ्यांना त्रास देतो त्याच्या राज्यातील सामान्य प्रजा आणि लष्कर या दोघांची प्रगती थांबविते.

त्या राज्यातील आनागोंदीचा बभ्रा झाल्यावर तेथे कोण शहाणा जाईल ?

तुला जर अब्रू टिकवायची असेल तर व्यापारी आणि वकील यांना सन्मानाने वागव.

मोठे लोक प्रवाशांना फार महत्त्व देतात, कारण त्यांच्यामार्फत आपली कीर्ती जगभर पसरेल अशी त्यांना आशा असते.

ज्या देशात मुसाफिरांचा छळ होतो त्याचा विनाश जवळ आला असे समजा.

म्हणून परदेशांतून आलेल्यांना प्रेमाने वागवा. देशाटन करणाऱ्यांशी मैत्री करा. कारण प्रवासी हा तुमची कीर्ती देशोदेशी पसरविणारा असतो.

अतिथी सत्कार आणि पर्यटकांच्या सुखसोयी यांकडे लक्ष द्यावे आणि त्यांना

कोणताही उपसर्ग न होण्याची दक्षता बाळगावी. असे असले तरी अनोळख्यांपासून नेहमी सावधच राहावे.

कारण वरपांगी मैत्री करणारा एखादा शत्रु तुमची फजिती करील.

तुझ्या जुन्या मित्रांची इज्जत राख कारण ते कधीही तुझ्या संकटकाळी तुला सबबी सांगणार नाहीत. तुझा एखादा नोकर वृद्ध होईल तेव्हा तू त्याला वर्षाशन नेमण्यास विसरू नकोस.

कारण त्याला म्हातारपणामुळे चाकरी करणे अशक्य असले तरी तुला दीनांना साहाय्य करणे कधीच अशक्य नसते.

असे मी ऐकले आहे की जेव्हा खुसरू बादशहाने शापूर कवीचे नाव मानकऱ्यांच्या यादीतून काढून टाकले तेव्हा तो काहीच बोलला नाही. पण जेव्हा त्याला मोठी दैन्यावस्था आली तेव्हा त्याने ही गोष्ट लिहून बादशहाजवळ पाठवून दिली.

"पृथ्वीवर न्यायाची चादर अंथरणाऱ्या बादशहा -- मी जरी या जगातून नाहीसा झालो तरी तुझे वैभव चिरकाल राहो."

माझे सारे आयुष्य मी तुझ्या सेवेत वेचले आहे. तेव्हा मला माझ्या वार्धक्यात तुझ्या समोरून लोटून देऊ नकोस.

जो मुसाफिर भानगड्या असतो त्याला त्रास देऊ नकोस; परंतु त्याला राज्यातून घालवून दे. तू त्याच्यावर नाराज झाला नाहीस तरी काही बिघडत नाही, कारण त्याची वाईट वर्तणूकच त्याचा शत्रू असते.

तो जर पारशी किंवा इराणचा रहिवासी असेल तर त्याला. सनआ (येमन), सरूलाब (तुर्कस्तान) किंवा रूम (आशिया माइनर) अशा दूर दूर ठिकाणी परागंदा करू नको. त्याला तेथे सुखरूप राहू देऊ नको कारण उपद्व्यापी माणसाला दुसऱ्या कोणावर लादणे अन्यायाचे होईल.

ज्या देशात उपद्व्यापी लोक निपजतात तो नष्ट व्हावा अशी लोक इच्छा करतात. जर तुला कोणास आपला प्रतिनिधी म्हणून पाठवायचे असेल तर त्या कामी फक्त श्रीमंत मनुष्याचीच निवड कर, कारण दरिद्री मनुष्यास बादशहाची थोडी-सुद्धा भीती वाटत नसते.

दरिद्री मनुष्य काळजीत असेल तर निश्वास आणि आक्रोश यांशिवाय यातून काहीही निष्पन्न होणार नाही.

जेव्हा कारकून गैरकारभार करू लागतो तेव्हा त्याच्या पाळतीवर तपास-निसाची नेमणूक करावी.

पण तपासनीसही त्या कारकुनास सामील झाला तर मात्र दोघांनाही अर्धचंद्र द्यावा.

ज्याच्यावर जबाबदारी टाकावयाची असते तो परमेश्वराची धास्ती बाळगणारा असावा.

जो विश्वासू अमीन तुला घाबरतो त्याला अमीनकीवर ठेवू नको.

पूर्ण सावधानाने सर्व काही चांगले पारखून मगच कोणतेही महत्त्वाचे काम कर, कारण शंभरात एकदेखील विश्वासपात्र मनुष्य भेटणे कठीण.

बऱ्याच दिवसांची मैत्री असलेले व एकाच जातीचे दोघे चिटणीस किंवा मुनशी एकाच ठिकाणी कामावर नेमले जाऊ नयेत, कारण त्यांपैकी एक चोर आणि दुसरा सारवासारव करणारा असेल तर ते तुला कधीच कळणार नाही.

ज्या वेळी चोरांमध्येच लाथाळी सुरू होते त्या वेळी व्यापाऱ्यांचा काफिला खुशाल पसार होतो.

जर तू कोणा कर्मचाऱ्याला कामावरून कमी केलेस तर थोडा काळ गेल्यावर त्याचा गुन्हा माफ कर.

हजारो कैद्यांच्या बेडया तोडण्यापेक्षा एका अर्जदाराची इच्छा पूर्ण करणे श्रेष्ठ होय! चांगल्या लेखणीबहाद्दराचीच मुखत्यार म्हणून नेमणूक कर. त्यापासून काही चूक होण्याची किंवा आशादायक परिस्थिती बिघडून जाण्याची भीती राहात नाही. प्रत्येक न्यायी राजा, पिता आपल्या मुलाबाळांवर रागावतो तसा नाराज होईलही. पण जर कधी तो त्यांना मारील, तर त्याच वेळी त्यांची आसवेही पुसेल.

तू सौजन्य दाखवू लागलास तर दुश्मन शिरजोर होईल. पण जर तू कडक धोरण ठेवलेस तर तुझ्याबद्दल अनादर बाळगतील. म्हणून मार्दव व कठोरता यांचा मिलाफ साधावा. शल्य-चिकित्सकाप्रमाणे शस्त्र आणि मलम दोघांचाही वापर करावा. तू सदा शूर, धीरोदात्त आणि कनवाळू असावयाला हवे. देव तुला देतो, त्या वेळी तूही लोकांना दान कर.

आता तुला जशी पूर्वीच्या राजांची आठवण येते तशीच तुझी कारकीर्दही लोक ध्यानात ठेवतील.

या जगात आलेला कोणीही मनुष्य येथे चिरंजीव होत नाही.

पण ज्याची कीर्ती अमर होते तो कधी मृत समजला जात नाही.

ज्याने आपल्या हयातीत पूल बांधणे, तळे खोदणे, अन्नछत्र किंवा धर्मशाळा चालविणे इत्यादी सत्कर्मे केली नाहीत, त्याच्या जीवितवृक्षाला फळे लागतच नाहीत असे समजावे.

तो मेल्यानंतर त्याच्या सत्कर्मांचा काहीही ठसा शिल्लक राहिला नाही तर त्याचा और्ध्वदेहिक संस्कारही टाळावा.

आपले नाव या जगात शिल्लक राहावे असे तुला वाटत असेल तर तू मोठ्या लोकांची नावे पुसून टाकू नकोस.

त्यांचाही एके काळी येथे मोठा मानमरातब व रुबाब चाले पण शेवटी ते सर्व येथेच सोडून गेले.

कोणी चांगला लौकिक येथून घेऊन गेले, तर कोणी येथे कुप्रभा प्रस्थापित करून चालते झाले.

कोणाच्या अपरोक्ष निंदा चालली असेल तर ती तू ऐकू नको.

पण कोणी अशी अपरोक्ष निंदा तुझ्यापुढे केलीच तर तिची शहानिशा कर.

कोणा अपराध्याने गुन्हा कबूल केला तर त्या कबुलीचा स्वीकार कर आणि जर त्याने अभयदान मागितले तर तू ते बहाल कर.

जर त्याने एकदा सांगितलेले ऐकले नाही तर त्याला शिक्षा म्हणून कैदेत टाक.

जर उपदेश आणि कारावासानेही काही परिणाम झाला नाही तर तो मूळचाच वाईट आहे असे समजून त्याला समूळ नष्ट कर. जर तुला कोणाच्या गुन्ह्याची चीड आली तर तू थोड्या सबुरीने वाग आणि त्याची हजेरी लांबणीवर टाक.

कारण बदखशानच्या खाणीतील हिरा फोडणे सोपे आहे पण एकदा फुटलेला जोडता येत नाही.

## बादशहाने विचाराने आणि संयमाने वागावे

एक मनुष्य अम्मान नदीच्या खोऱ्यातून निघून खुष्कीची आणि बोटीची सफर करून आलेला होता.

अरबस्तान, तुर्कस्तान, ताजिकिस्तान, आशिया माइनर या सर्व देशांतून हिंडून तो बराच अनुभवी झाला होता. नाना प्रकारची विद्या त्याला अवगत झाली होती. नाना देशातले आणि अनेक जमातींचे रीतीरिवाज तो जाणत होता. शरिराने तो वटवृक्षाप्रमाणे दणकट होता पण दारिद्रयामुळे निस्तेज झाला होता. त्याच्या अंगावरील कपडयांना शेकडो ठिगळे लागली होती. फक्त जाळण्याच्याच लायकीचे कपडे घालण्याएवढी त्याची परिस्थिती हलाखीची झाली होती.

तो एका नदीतीरावरून एका शहरात आला. तेथील बादशहा मोठ्या मनाचा होता. त्याला जात्याच चांगल्या लौकिकाची आवड होती आणि साधुसंतांविषयी त्याच्या मनात नितांत आदर होता.

राजसेवकांनी त्याला न्हाऊ घातले व त्याचे शरीर स्वच्छ केले.

तो राजदरबारात आला आणि अजिजीने आपला हात छातीवर ठेवून म्हणाला,

" या राज्यात मी खूप भटकलो आहे पण मला कोठेही खिन्न चेहरा पाहावयास मिळाला नाही. दारू पिऊन झिंगलेला मी कोठेही पाहिलेला नाही. खराबात (मद्यालय) मात्र खराब झालेला दिसला.

कोणत्याही बादशहाला त्याच्या राज्यात कसलीही पीडा नसणे हे मोठे भूषण होय.

तो मुसाफिर बोलला म्हणण्यापेक्षा त्याने मोती उधळले म्हणणेच योग्य होईल. त्याच्या परिणामकारक वक्तृत्वाने बादशहाला जणू कैफ चढला.

त्याच्या वाणीने तो मुग्ध झाला; आणि त्याने त्यास जवळ बोलावून घेऊन त्याचा मोठा गौरव केला.

त्याच्या आगमनाबद्दल त्याचे आभार मानून त्याने त्यास सोने मोती, जड-जवाहीर सर्व काही दिले व तू कोणत्या देशाचा रहिवासी आहेस असे विचारले. त्याने विचारलेल्या सर्व प्रश्नांची उत्तरे दिली व त्यामुळे दरबारातील लोकांचा त्याच्याबद्दल चांगला ग्रह झाला.

बादशहाच्या मनाला असा विचार स्पर्श करून गेला की, " हा मनुष्य वजीर होण्यास अत्यंत लायक आहे, पण हे सर्व फार सावकाशीने व्हावयाला हवे. नाहीतर लोक मला मूर्खात काढतील. प्रथम त्याच्या बुद्धिमत्तेची पारख व्हावयाला हवी. त्याचे काम ज्या मानाने श्रेष्ठ ठरेल त्या मानाने त्यास बढती देता येईल."

" जो मनुष्य अनुभवाशिवाय काम करतो त्याच्या मनावर धास्तीचा भलताच बोजा असतो."

" काजी सारासार विचार करून निवाडा देईल तर कायदेपंडित आणि अधिकारीवर्गापुढे त्याला खजील व्हावे लागणार नाही."

" बाण सोडण्याच्या आधी लक्ष्य चांगले पारखले पाहिजे. एकदा बाण सुटल्यावर काहीही करता येत नाही."

" पैगंबर युसूफ याच्यासारखा सुंदर व शहाणा कोणी असला तरी साऱ्या ईजिप्तचा लाडका व्हावयास एक वर्ष जावे लागते."

" बराच काळ लोटल्याशिवाय कोणाच्याही अंतरंगात शिरता येत नाही."

बादशहाने त्याची सर्व तऱ्हेने परीक्षा घेतली तेव्हा तो अत्यंत बुद्धिवान आणि धर्मनिष्ठ असल्याचे आढळून आले. तो सुस्वभावी आणि सुविचारी होता व त्याच्याशी भाषाप्रभुत्व आणि मनुष्यस्वभावाची पारख भरपूर होती. अक्कलहुषारीत तर त्याने कित्येक नावाजलेल्यांना मागे टाकले होते. या सर्व गोष्टी ध्यानात घेऊन शेवटी बादशहाने त्याची वजीर म्हणून नेमणूक केली.

त्या माणसाने आपला कारभार उत्तम रीतीने सुरू केला व कोणासही तक्रार करण्यास वाव दिला नाही. त्याने मुलूखगिरीही केली; पण कोणासही त्रास दिला नाही. त्याची कुत्सित टीका करणाऱ्यांची तोंडे बंद झाली. कारण नाव ठेवण्यासारखे त्याच्या हातून काही घडलेच नाही.

त्याच्या हातून कोणतीही चूक घडली नाही हे पाहून मत्सराग्नीमुळे त्याच्या हितशत्रूंची स्थिती भट्टीतील गव्हासारखी झाली. त्याच्या विवेकीपणामुळे राज्याची कळा तेजाळली पण त्याच्या अगोदरच्या वजिराची चिंता मात्र बेसुमार वाढली.

त्याला नव्या वजिराच्या कुशल कारभारात त्याची फजिती करता येण्यासारखा कोणताच दोष आढळत नव्हता.

उत्तम कारभारी आणि त्याचा हितशत्रू म्हणजे तबक आणि मुंगी यांसारखे होत. मुंगीने कितीही जोर केला तरी तबकास भोक पडणार नाही.

त्या बादशहाचे दोन गोंडस गुलाम होते. ते केव्हाही त्याच्या खिदमतीस हजर असत. त्यांचे चेहरे हूर किंवा परीसारखे मुलायम. सूर्य आणि चंद्र यांसारखे ते रूपसंपदेत अजोड होते. दोघांपैकी कोणीही लावण्यात हिणकस नव्हता. प्रत्येकाच्या तोडीचा रूपवान आढळावयाचा तर तो आरशातील त्यांच्या प्रतिबिंबातच.

त्या विद्वान आणि मधुरभाषी वजिराबद्दल त्या दोघांच्याही मनात चांगला ग्रह झाला. त्याच्या सुस्वभावीपणाची ओळख पटताच त्यांची छान गट्टी जमली. निसर्गाने त्यांच्या स्नेहातही ओलावा निर्माण केला पण तो क्षुद्र बुद्धीचे लोक समजतात तसला नव्हे. ते दोघे फाकडे गुलाम त्याच्या पुढ्यात येताच त्याला मोठा विरंगुळा वाटावयाचा.

तुला जर तुझा मान वाढावा असे वाटत असेल तर तू माषूकांना कटाक्षाने टाळले पाहिजे.

तुमच्या ठायी पापबुद्धी नसली तरी तुम्ही यापासून दूर राहा नाहीतर तुमच्या इभ्रतीवर शिंतोडे उडतील.

जुन्या वजिराला या गुपिताचा सुगावा लागला. तो लगेच बादशहापाशी चुगली करायला गेला. तो सांगू लागला, "लोक याच्याबद्दल काय बोलतात ते मला माहीत नाही. तो आहे कोण हे सुद्धा मी जाणत नाही. पण इतक्या वाईट सवयी असलेला हा मनुष्य या राज्यात राहू शकतो याचे मला नवल वाटते. लोक म्हणतात की हा गुलामांवर भाळलेला आहे. फसवेगिरी करणारा आणि विषयलंपट आहे. अर्थात जे या देशात राहणारे नव्हते ते येथे स्वैरपणे वागू शकतात कारण या देशात जन्माला येऊन ते वाढलेले नसतात. असल्या बेशरम आणि बादशाही दरबाराला बट्टा आणणाऱ्या नीच मनुष्याची मुळीच गय करू नये. मी स्वस्थ बसावे म्हणत होतो पण मी गप्प बसलो तर बादशहाच्या अन्नाला जागलो नाही असे होईल म्हणून सांगतो. मी काही कपोलकल्पित गोष्टी सांगतो असे नव्हे. माझी स्वतःची खात्री पटल्याशिवाय मी सांगणार नाही. माझ्या एका नोकराने त्या दोघांपैकी एका पोऱ्याला त्याने आपल्या बाहुपाशात घेतलेला पाहिला आहे. मी जे ऐकले ते सांगणे माझे काम होते, त्याउपर खुदावंतांची मर्जी! मी जशी ही हकीकत पडताळून पाहिली तशीच आपणही पाहावी."

या प्रकारे त्या जुन्या वजिराने या गोष्टीस गलिच्छ रूप दिले. देव दुर्जनाला चांगला म्हणविण्याची संधी न देवो.

दुष्मनाच्या हाती एवढी क्षल्लक गोष्ट लागली खरी पण तीमुळे दरबारातील

मानकऱ्यांमध्ये मोठा वणवा पेटला. साधी एक ठिणगीदेखील भयंकर आग पेटव शकते आणि तीमुळे मोठमोठी झाडेदेखील जळून खाक होतात.

बादशहाला तर ही बातमी ऐकून डोक्यावर भाल्याचा प्रहार व्हावा तसा उद्वेग वाटला. रागाच्या भरात त्या दरवेशाला, नव्या वजिराला ठार करावेसे वाटले पण संयमाने त्यास धीर धरण्यास भाग पाडले. अशासाठी की आपणहोऊन ज्याची जोपासना केली त्याला सहजासहजी नष्ट करण्यात पुरुषार्थ नाही. ज्याला आपण मोठेपण एकदा बहाल केले त्याचा अपमान करणे वाईट होय.

आपण पोसलेल्या मनुष्याला उगाच छळू नये. जो आपले धनुष्यबाण वाहतो त्यालाच बाणाचे लक्ष्य बनवू नये. ज्याला आपल्याला ठार मारावयाचे आहे त्याचे मळी पालनपोषण करूच नये.

ज्याच्या शील-स्वभावाची पूर्ण पारख झालेली नाही त्याचा कधी बादशहाच्या दरबारात खास सोबती म्हणून शिरकाव होऊ देऊ नये.

त्याचप्रमाणे त्याचा अपराध सिद्ध झाला नाही तोपर्यंत त्याच्या दुष्मनांच्या सांगण्यावरून त्याचे नुकसान करू नये. त्या बादशहाने बुद्धिवान लोकांनी सांगितलेला उपदेश ऐकला होता आणि हे गुपित त्याने आपल्या मनातच ठेवले.

हुषार मनुष्याचे मन म्हणजे अनेक गुप्त गोष्टींचा कैदखाना आहे असे समज. एकदा बोलून टाकल्यानंतर पुन्हा त्यांना शृंखलांनी बद्ध करता येत नाही.

बादशहाने या गोष्टीची अगदी खाजगी रीतीने शहानिशा केली. तेव्हा तल्लख डोक्याच्या वजिराच्या शहाणपणाबद्दल तो साशंक झाला. एकदम त्याची नजर त्या दोघांपैकी एका पोऱ्यावर गली. त्या पोऱ्याने ओठातल्या ओठात स्मित केले.

जेव्हा दोघांमध्ये जिवाभावाचे सख्य जमते तेव्हा त्यांचे मुके ओठच बोलके होतात.

जेव्हा चक्षु-दर्शनसुखासाठी मोठी माणसे साहस करतात तेव्हा जलोदरी मनुष्याला पाण्याचा झरा मिळूनही तृप्ती लाभत नाही तशी त्यांची स्थिती होते.

झाले ! बादशहाचा दूषित ग्रह पक्का झाला. एकदम त्याच्या अंगावर धावून जावे असे त्याला वाटले पण अत्यंत शांतपणाने त्याने त्यास म्हटले,

" भल्या गृहस्था ! मी तुला फार बुद्धिमान समजत होतो. मी तुला माझ्या राज्याचा अमीन बनविला होता. मला वाटले होते की तुझे डोके तल्लख आहे. तू असा नीच आणि नालायक असशील असा कधी संशयही आला नाही. तू या अत्युच्च पदासाठी योग्य नाहीस. खरा दोष माझाच आहे. तुझे काहीच चुकले नाही. मी जर एखाद्या हरामखोराचे लालनपालन केले, तर दगाबाजीला माझ्या राजवाड्यात मुक्तद्वार मिळणारच. "

त्या पंडिताने आपले मस्तक वर करून म्हटले, " जहाँपनाह ! आपण मोठे समंजस आहात. माझे चारित्र्य जोपर्यंत निष्कलंक आहे तोपर्यंत माझ्या दुष्मनांच्या

खविसपणाची मला मुळीच भीती वाटणार नाही. मला तरी असल्या गोष्टींची मुळीच शंका नव्हती. मी कधीही केलेल्या नाहीत असल्या गोष्टी आपणास कोणी सांगितल्या कोणास ठाऊक ! "

बादशहा खवळून म्हणाला, " आता ढोंग पुरे कर. लपवाछपवी करण्यात काहीच हाशील नाही."

नव्या वजिराने मंद स्मित करून हात आपल्या ओठावर ठेवला व म्हटले, " आता हा जुना वजीर जे सांगेल त्याने बिथरू नका ! माझ्या शत्रूने जर आपल्या पदावर मला चढलेला पाहिला तर माझ्याविरुद्ध वाईट सांगण्याशिवाय आणखी दुसरे तो काय करील? बादशहाने याला माझा मदतनीस बनविले, तेव्हापासून मला हा माझा प्रतिस्पर्धी आहे असेच वाटत होते. सुलतानाने जेव्हा मला ह्याच्यावरचा हुद्दा बहाल केला तेव्हापासून त्याला आपल्यामागे शत्रू लागलेला आहे, असे वाटले नसेल काय ? माझी प्रतिष्ठा वाढणे म्हणजे आपली नाचक्की होणे असे त्याला वाटते. त्यामुळे तो कल्पांतापर्यंत माझा दुस्वासच धरणार. या संबंधात मी एक दृष्टांत सांगतो तो ऐकावा.

### दृष्टान्त

एका माणसाने स्वप्नात सैतान पाहिला. तो सुरूप्रमाणे उंच यष्टीचा आणि सूर्यासारखा तेजस्वी होता. त्याला न्याहाळून पाहून तो मनुष्य म्हणाला, "अरे चंद्रासम सुंदर पुरुषा ! लोकांना तुझ्या लावण्याबद्दल काहीच कल्पना नाही. ते तुला हिडीस व भयानक समजतात पण स्नानगृहात तुझी विचित्र आकृती रेखाटतात."

हे ऐकून सैतान हसला व म्हणाला, " ती माझी आकृती नव्हेच पण लेखणी माझ्या वैऱ्याच्या हाती आहे ना ! मी स्वर्गातून त्याची पाळेमुळे खोदून काढली आहेत. म्हणून ते मला कुरूप रेखाटतात."

वजिराने पुढे म्हटले, " खाविन्द ! अजून तरी माझी इभ्रत शाबूत आहे. पण मत्सरामुळे माझा शत्रू मला कधीच सज्जन म्हणणार नाही. माझ्यामुळे ज्याची पदावनती झाली त्याच्या उपद्व्यापापासून मी दूर असणेच बरे ! पण मला बादशहा नाराज होतील म्हणून मुळीच भीती वाटत नाही. कारण जो निष्पाप असतो त्याच्या अंगात मोठेच बळ असते. जोपर्यंत मी लेखणी उत्तम चालवू शकतो तोपर्यंत मी माझी नालस्ती करणाऱ्यांना का भ्यावे ? जर कोणा कर्मचाऱ्याने कधी फसवेगिरी केलीच नसेल तर त्याने विरोधी पक्षाच्या हल्ल्याला का भीक घालावी ? जर तुमच्या तराजचे पारडेच फसवे असेल तर तुम्ही निरीक्षक अधिकाऱ्याची धास्ती बाळगावी."

बादशहाला त्याचे बोलणे ऐकून फार आश्चर्य वाटले व त्याला फार रागही आला. तो म्हणाला, " पाहा ! चोर तो चोर आणि वर शिरजोर ! पण याद राख! असल्या हुषारीच्या पण खोट्यानाट्या बाता मारल्याने तू काही सुटणार नाहीस. मी काही तुझ्या शत्रूचे ऐकून बोलत नाही. मी स्वतः माझ्या डोळ्यांनी पाहिले ते

बोलतो आहे. तूच पाहा ! या दरबारात इतके लोक वावरत आहेत पण तुझी नजर नेहमी या पोऱ्यांवर का जावी ? "

तो चलाख मनुष्य पुन्हा स्मित करून बोलला, " होय खाविन्द, खरे आहे ते. खरे लपविण्यात काही अर्थ नाही पण आपण ऐकून घेत असाल तर यातील मर्म मी आपणास विदित करतो ! ईश्वरकृपेने आपले राज्य वृद्धिंगत होवो आणि आपले वैभव वाढत राहो !

आपल्याला माहीतच आहे की भिकारी दरवेश श्रीमंताकडे आशाळभुतासारखा पाहात राहतो. माझ्या तारुण्याचा जोर ओसरला आहे. मौजमजा करण्यात सारे आयुष्य गेले. या गोंडस गुलामांना पाहिल्याशिवाय मला चैन पडत नाही. कारण हे लावण्याचे जणू पुतळेच आहेत. "

" मलाही एके काळी असला सुंदर चेहरा लाभला होता. माझीही यष्टी अशीच मनोहर आणि बिल्लोरी होती. पण काय करू ? सध्या मला माझी कफन (प्रेतवस्त्र) कातली पाहिजे. माझ्या केसांचा कापूस आणि देहाचे दाभण झाले आहे. पण माझे केस एके काळी चकचकीत काळे होते. माझी मान (कबा) काय नाजूक आणि गोलाकार होती म्हणून सांगू ? माझ्या तोंडाच्या आत चांदीच्या विटाने बांधलेल्या भिंतीप्रमाणे दातांच्या दोन रांगा होत्या. पण आता आपण पाहात असालच की मी बोलत असतानाच जुने पूल पडतात त्यांप्रमाणे एकेक दात गळून पडत असतो. आता आपण सांगा की मी त्यांच्याकडे जिभल्या चाटत पाहू नये तर काय करावे ? मला त्यांना पाहिल्यावर माझे गतायुष्य आठवते. तारुण्याचा वसंत मावळला, हा हेमंतही नक्की संपणार ! "

बादशहा त्याचे बोलणे ऐकन थक्क झाला. त्याला वाटले यापेक्षा जास्त समंजसपणाने उत्तर देणे अशक्य आहे. त्याने दरबारातील मंडळींना उद्देशून म्हटले, " सज्जनहो बोला ! यापेक्षा अधिक समर्पक बोलणारा दुसरा कोणी असू शकेल काय ?

सुंदर पात्राकडे नजर फेकावयाची असल्यास डोळा मारण्याची योग्य सबब सांगता आली पाहिजे. मी जर सबुरीने आणि शांतपणाने विचार केला नसता तर त्याच्या शत्रूंच्या सांगण्यावरून त्याची हजेरी घेतली असती. रागाच्या भरात तलवार उपसली तर मागाहून पश्चात्ताप करण्याची पाळी येते. मतलबी माणसाच्या बोलण्याने बिथरून जाऊ नये. हलक्या कानाच्या मनुष्याची नाचक्की होते. "

त्या बादशहाने नव्या वजिराचा गौरव केला आणि जुन्या वजिराला कानपिचक्या दिल्या.

त्या वजिराच्या चाणाक्षपणामुळे त्या बादशहाची ख्याती देशोदेशी पसरली. त्याने दीर्घकाळपर्यंत न्यायाने आणि उदार हस्ताने राज्य केले आणि तो इहलोक सोडून गेल्यावरही त्याचा लौकिक कायम राहिला.

धर्मरक्षक बादशहा धर्माच्या भुजबळाने वैभवसंपन्न होतात.

असला न्यायी बादशहा सध्या तरी मला कोठेही आढळत नाही. जर कोणी असेलच तर अबूबक्र सादच्या शिवाय दुसरा कोणी नाही. त्या बुद्धिमान, उदार आणि शुद्ध चारित्र्यशील बादशहाचा वंश उत्तरोत्तर वृद्धिंगत होवो.

हे बादशहा ! तू स्वर्गातील कल्पतरू आहेस कारण तुझी सावली एक वर्षापर्यंतच्या सफरीसही पुरेशी आहे. मला भाग्यवान होण्याची हौस होती आणि हुमा या संपन्न विहंगाच्या पंखाची छाया हवी होती.

माझ्या बुद्धीने म्हटले, " हुमाविहग कधी दौलत देईल काय ? तुला उर्जितावस्था हवी असेल तर तू सादच्या सावलीत ये !

खुदा ! तू कृपादृष्टी फिरवलीस आणि आमजनतेवर अशी छाया पसरवलीस.

मी या दौलतीसाठी दुवा मागतो. देवा, ही छाया शाश्वत राहो !

कोणासही ठार मारण्यापूर्वी कैदेत ठेवावे कारण एकदा कापलेले शीर जोडता येत नाही. ज्यांची बुद्धी आणि हिकमत छान चालते ते लोकांनी चालविलेल्या आरडाओरडीला जुमानत नाहीत. ज्याच्या डोक्यात अक्कल आणि सबुरी बिलकुल नाही त्याच्या मस्तकावर मुकुट ठेवणे हराम होय !

मी काही सदोदित भांडत राहा असे सांगत नाही पण एवढेच म्हणतो की राग आल्यावर डोके शाबूत ठेवा. शहाणपणा असेल तर सबुरी सहजच घडेल आणि अशा शहाणपणावर दुष्मनाची मात्रा चालणार नाही.

क्रोधाच्या लष्कराने रणशिंग फुंकले तर मात्र न्याय, सौजन्य आणि धर्म यांचा मागमूस राहात नाही.

क्रोधरूपी सैतानाला पाहून फिरिश्तेही पळ काढतात. त्याच्याएवढा अधम पृथ्वीतलावर दुसरा कोणीही पाहावयास मिळणार नाही.

## अपराध्यांना माफी देण्याविषयी

विधिनिषेध इतके महत्त्वाचे असतात की विहित असल्याशिवाय साधे पाणी पिणे हाही दोष ठरतो, तर तीच धर्माज्ञा असल्यास कोणास ठार मारणेदेखील न्यायोचित समजले जाते. अमुक एकाला देहांत शिक्षा द्यावी असा कुराणाचा-शरइयतीचा फतवा असेल तर त्याचा प्राण घेण्याबद्दल तुला मुळीच संकोच वाटता कामा नये. पण त्याच्या वंशातील लोक शिल्लक राहिले असतील तर त्यांना क्षमा करून सौख्याने नांदू दे. अपराध दुष्टाने केला तर त्याच्या बायका-मुलांचा काय दोष ? तुझे शरीर बलवान असेल आणि तुझ्यापाशी चांगला फौजफाटा असेल तर त्याचा वापर विचाराने कर. त्यांना वैऱ्याच्या मुलखात धाडू नकोस. कारण ते उंच किल्ला सर करून तेथील रयतेस छळतील. तुझे जे बंदीवान असतील त्यांचीही तू काळजी घे. कारण त्यांच्यातील कोणीतरी एखादा निरपराधी असेल. तुझ्या राज्यात कोणी परदेशी व्यापारी मेला तर त्याच्या संपत्तीचे अपहरण करणे

फार वाईट. त्याची मुलेबाळे त्याची क्रिया आटोपल्यावर म्हणतील," बिचारा परदेशी व्यापारी मेला, पण हरामखोरांनी त्याची संपत्ती लुटली. "त्याच्या पोरक्या मुलांच्या दु:खी मनांचे सुस्कारे लक्षात घे. पन्नास वर्षे मी जर बायकांप्रमाणे नटूनथटून राहू लागलो तर शत्रूच्या फौजांशी झुंज कोण देईल ? मलाही बऱ्याच गोष्टींची हौस आहे पण काय करू ? हा खजिना काही माझ्या एकट्याच्या चैनीसाठी नाहीना ? खजिने भरावयाचे ते लष्करासाठी. ते आरास आणि भपक्यासाठी रिते करायचे नसतात. जो सैनिक सुलतानावर संतुष्ट नसेल तो सीमा प्रदेशाचे संरक्षण काय करील ? शत्रूने येऊन खेडुताचे गाढव पळविले तर सुलतानाने प्रजेकडून महसूल तरी का घ्यावा ? एकीकडून शत्रू " खर " पळवितो आणि दुसरीकडून सुलतान " कर " वसूल करतो. अशा परिस्थितीत रियासतीला चांगले दिवस येतील कसे ? आपल्या शक्तीचा प्रयोग कोणा दुर्बलावर करू नये. बिचाऱ्या मुंगीपुढील दाणा टिपणारा पक्षी किती कर्म-दरिद्री बरे ! प्रजा ही खरोखर कल्पतरू आहे. तिच्यापासून तुला वाटेल ते फळ मिळेल. निर्घृणपणाने तो उपटून टाकू नकोस. मंदबुद्धी मनुष्य आपल्याच पायावर धोंडा पाडून घेत असतो. जो मनुष्य आपल्या हाताखालील लोकांवर अन्याय करत नाही त्यालाच आरोग्य व ऐश्वर्य भोगता येते. जर तुझा अंकित मनुष्य संकटात असेल तर त्याच्या आक्रोशाबद्दल तुला चिंता वाटली पाहिजे. चांगला नावलौकिक कमाविल्यानंतर एखादे वेळीच नाव बद्दू झाले तरीदेखील सारे मुसळ केरात जाते. मोठ्या कीर्तीस चढलेल्या लोकांनी कधीही दुसऱ्याच्या संपत्तीस हात लावला नाही.

तू साऱ्या दुनियेचा सुलतान असशील पण कोणा धनिकाला जबरदस्तीने लुटलेस तर तू भिकारीच होय.

स्वतंत्र बाण्याचा मनुष्य उपाशी मरेल; पण गरिबाला लुटून पोट जाळणार नाही.

## प्रजेबद्दल दाक्षिण्य ठेवावे

मी असे ऐकले आहे की एक बादशहा साध्या अस्तराच्या गळपट्टीचाच अंगरखा घालत असे. (एरवी बाहेरची बाजू जरतारी असे) एकाने त्यास जरतारी गळपट्टी शिववून घेण्याची विनंती केली तेव्हा त्याने उत्तर दिले, " सन्मान आणि सोयीसाठी साधी गळपट्टी पुरते. याच्याही पुढे जायचे म्हणजे नखरा करणे होय. मी प्रजेपासून जो कर वसूल करतो, तो काही आपल्या स्वत:च्या किंवा गादीगिरदीच्या चैनीसाठी नव्हे. "

जर सामोपचाराने मोठे राज्य पदरात पडत असेल तर रक्तरंजित मोहिमा कशास हव्यात ? जर रक्ताचा एक थेंब जमिनीवर पडला तर त्याची किंमत साऱ्या भूतलालाही येणार नाही हे लक्षात ठेवणे अवश्य आहे.

अतिश्रेष्ठ जमशेद राजाने एका जलाशयापाशी एक लेख लिहविला होता. त्यात म्हटले होते की या जगात या जलशयाचे कित्येक मालक झाले अन् गेले. मी

(जमशेद) सुद्धा अनेक राज्ये जिंकली. परंतु त्यांपैकी कोणतेच माझ्या कबरीत नेता येण्यासारखे नाही. तू शत्रूला जिंकलेस तर जिंकल्यानंतर त्याला कसलाही त्रास देऊ नकोस. कारण की तो अपमान पुरेसा असतो. शत्रू जिवंत आहे आणि लाचारीने तुझ्या पायाशी लोळण घेत आहे, असले दृश्य फार वाईट. त्यापेक्षा तुझ्या सदऱ्यावर त्याच्या रक्ताचे डाग असणे हेच अधिक श्रेयस्कर.

## बादशहाने शत्रू आणि मित्र यांची कशी पारख करावी

प्रसिद्ध जगज्जेता दारयुष एके दिवशी शिकारीस गेला असताना त्याच्या लष्कराची त्याच्यापासून ताटातूट झाली.

त्या वेळी एक गुराखी त्याच्यासमोरून पळत असताना दारयुष बादशहाने आपले धनुष्यबाण हातात घेतले. अरण्यात शत्रूची भीती सदैव असतेच, पण घरात-देखील गुलाबाला काट्यांपासून सुरक्षित ठेवले पाहिजे. गुराख्याने आरडाओरड सुरू केली, " बाबा ! मी तुझा दुष्मन नव्हे. मला ठार मारू नकोस. मी बादशहाच्या घोड्यांची निगा राखत असतो. त्यांना या कुरणात चरायला आणतो. " हे त्याचे बोलणे ऐकून बादशहाची खात्री पटली आणि त्याने स्मित करून म्हटले, " गाढवा ! श्रेष्ट फिरस्त्याने तुझ्यावर कृपा केली समज नाहीतर मी बाण कानापर्यंत खेचला होता. "

त्या कुरणाचा मालक हसून म्हणाला, " खरेच ! मित्रमंडळीपासून हिताची गोष्ट लपवून ठेवू नये. पण काय आश्चर्य ! बादशहाने अनोळखी किंवा शत्रू, ओळखीचा मनुष्य किंवा मित्र यांबद्दल गल्लत करावी हे काहीतरीच वाटते. कोणत्याही सरदाराला आपल्यातील सामान्य मनुष्य देखील ओळखता आला पाहिजे. आपण तर मला कित्येकदा गावी पाहिले आहे. आणि घोड्यांची आणि दाणावैरणीची चौकशी माझ्यापाशी केली आहे. मी आपल्यावरील निष्ठेमुळे आपल्या भेटीसाठी आलो आहे. पण आपल्याला माझ्यात आणि शत्रूमध्ये कोणताच फरक वाटला नाही ! बादशाह सलामत ! माझी हिकमत पाहा. लाखो घोड्यांतून अमूक एक घोडा शोधून काढा-वयास मला सांगा ! मी चटदिशी ते काम करीन. मी माझा कळप लक्षपूर्वक व हुषारीने संभाळतो. आपणही अशाच रीतीने प्रजेचा संभाळ करावा. ज्या देशाच्या राजाची अक्कल गुराख्यापेक्षा कमी दर्जाची त्या मुलखाचे बारा वाजले असे समजले पाहिजे. "

## बादशहाने प्रजेच्या योगक्षेमासंबंधी जागृत असावे

प्रजेपासून तुझे स्थान भलतेच उंच असेल आणि तुझ्या पलंगाच्या मच्छरदाणीचे टोक नक्षत्राला लागले असेल तर तू या भूतलावरील गरीब प्रजेचे गाऱ्हाणे कसे ऐकून घेणार ? म्हणून झोपतानादेखील कोणा न्याय मागणाऱ्यांची किंकाळी ऐकताच उठण्याची तुझी तयारी असली पाहिजे. तुझ्या कारकीर्दीत कोणाही मनुष्याने जुलूम

केला तरी त्याला तुझाच जुलूम म्हणावे लागेल. जर एका आडाणी पाटलाच्या कुत्र्याने व्यापाऱ्याचे धोतर धरून ओढले तर ते काम त्या पाटलाचेच ठरते. सादी ! तू बोलण्यात फार फटकळ आहेस. बरे ! तुझ्या हातात बुद्धीची तलवार आहे, तोपर्यंत किल्ला सर करून घे. तुला जी हकीकत चांगली माहीत आहे ती बेधडक सांगून टाक ! खरे बोलण्यासारखा सरळ मार्ग नाही. त्यात लाचलुचपत नाही किंवा कुटील कार-स्थानही नाही.

आपली जीभ ओठांच्या आत असू दे. शहाणपणाची बांडगुळे फेकून दे. अधाशी-पणाला सोडचिट्ठी दे. एवढे केल्यावर खरे बोल--मग वाटेल ते होऊ दे.

## बादशहाने गरीब प्रजेच्या हितासंबंधी जागरूक असले पाहिजे आणि ते साधण्यासाठी झटले पाहिजे.

इराक देशातील एका ग्राम्य सरदाराने आपल्या सज्जाखाली बसून रडत असलेला एक गरीब मनुष्य पाहिला. त्याचे बोलणे त्यास ऐकू आले, "तू देखील कोणाच्या तरी दारी पदर पसरत,आहेस. तेव्हा तुझ्या दारी आलेल्यांचीही तू विचारपूस कर. दुःखी प्राण्यांचे हृदय बंधनातून मोकळे कर. म्हणजेच तुझ्या हृदयाला दुःखा-पासून मोकळे राहता येईल. संकटग्रस्तांनी न्यायासाठी चिंता केली तर कित्येक बादशहांना तक्ताला मुकावे लागते. तू ऐन दुपारी राजमहालात आरामात पहुड-लेला असतोस. त्या वेळी कोणीतरी गरीब मनुष्य उन्हात तडफडत असेल. जर गरिबाचे गाऱ्हाणे सुलतानाने ऐकून घेतले नाही, तर ईश्वराला त्याच्यासाठी काहीतरी करावेच लागणार.

## पूर्वीचे राजे प्रजाहितार्थ झटत असत

एका विद्वान गृहस्थाने उमर बिन अब्दुल अजीज या थोर सुलतानाची एक गोष्ट सांगितली, "त्याच्या बोटातल्या अंगठीत जो एक हिरा होता, त्याची कोणत्याही जवाहिऱ्याला किंमतच ठरविता येत नव्हती. रात्रीच्या वेळी त्या हिऱ्याचा प्रकाश सर्वत्र पसरत असे आणि तो प्रकाश देखील दिवसाइतका असायचा. एकदा अकल्पितपणे त्या देशात दुष्काळ पडला. पौर्णिमेच्या चंद्रासारखे चेहरे चंद्रकोरी-प्रमाणे सुकून गेले. बादशहाला लोकांचे हाल पाहवले नाहीत, व त्याने स्वतःची चैन आणि आराम यांना रामराम ठोकला."

लोक जर कडू जहर पिण्याएवढे अगतिक झाले असतील तर त्यांना पाहून केशरी सरबत पिण्याची हौस कशी उत्पन्न होईल ?

अमर बिन अब्दुल अजीजने तो हिरा विकून रोख चांदीचे पैसे आणण्यास सांगितले. कारण त्याला अनाथ आणि दरिद्री लोकांचे हाल पाहवले नाहीत. तो

सर्व पैसा एक आठवड्याचे आत फस्त झाला. पण त्यामुळे फकीर दरवेशांची चंगळ झाली.

काही लोक मात्र बादशहाच्या या कृत्यामुळे नाराज झाले, कारण तसा हिरा विकत घेणे बादशहास अशक्य होते. मला असे कळले की बादशहाच्या कानावर जेव्हा ही गोष्ट गेली तेव्हा त्याच्या डोळ्यातून घळाघळा अश्रू वाहू लागले. तो म्हणाला, "प्रजेच्या हृदयाला असह्य वेदना होत असताना हिऱ्यासारख्या शोभेच्या वस्तूसाठी जीव टाकणे बादशहाला शोभत नाही. माझ्या बोटांना अंगठीचा अलंकार नसला तरी चालेल; पण लोकांच्या मनाला यातनेच्या फासांचा विळखा नको. जो स्वतःच्या आरामाची मुळीच पर्वा न करता दुसऱ्यांच्या सुखसोयीसाठी झटत असतो, तो माहात्मा धन्य होय. ज्याला दुसऱ्यांच्या संकटात आपली सुगी दिसते, त्याला जाणत्या लोकांनी कधीच किंमत दिली नाही. मला वाटते की जर बादशहा आपल्या सुवर्णमंचकावर घोरत राहिला तर गरीब प्रजेला रात्री झोपच लागणार नाही. त्याउलट बादशहाने रात्रीच्या रात्री जागरण करून घालविल्या तर मात्र प्रजा गाढ झोपी जाईल. आमच्यावर देवाची कृपा आहे, म्हणूनच हा श्रेष्ठ गुण अबूबक्र बिन साद या आमच्या बादशहाच्या अंगी आहे. सध्या तरी पारस देशात कुटील तंत्र कोठेच आढळत नाही. पण सुडौल बांध्याच्या माशुकाच्या अंगात मात्र अवखळपणा भरपूर आहे. मी काल रात्री मैफलीत ऐकलेल्या पाच पंक्ती मला फार आवडल्या.

## वचन

काल जेव्हा मी माझ्या प्रियपात्राच्या मिठीत होतो तेव्हा मी जे सुख अनुभवले त्याला तोड नाही. प्रिया झोपली त्या वेळी मी तिला म्हणालो, " प्रिये, तुझ्यापुढे सुडौल सुरूचे झाड देखील फिके ठरते. फक्त काही क्षण तू झोप आवरून फुलाप्रमाणे स्मित कर आणि बुलबुलाप्रमाणे किलबिलाट कर. जगालाही अस्वस्थ करून टाकणाऱ्या गोंडस जिवा, तू किती वेळ झोपत राहणार ? ये, माझ्यापाशी लाल मद्याचा पेला घेऊन ये ". त्यावर प्रिया रागाने उसळून म्हणाली, " हे काय ? तुम्ही मला अवखळ म्हणता आणि इथे तर झोपू पण देत नाही ! लक्षात ठेवा, या करड्या नजरेच्या बादशहाच्या राजवटीत कोणीही अवखळ मनुष्य जागृत आढळायचा नाही. त्याला झोपूनच राहावे लागेल."

## दिवंगत अताबक्र तकला बिन जंगी ( देव त्याच्या आत्म्यास शांती देवो )

पूर्वीच्या बादशहाच्या चरित्रात असे लिहिले आहे की, जंगी बादशहानंतर तकला तक्तावर आला. त्याच्या राज्यात कोणी कोणास त्रास देत नव्हते. न्यायी-

पणात अद्वितीय म्हणून त्याची ख्याती होती. एकदा त्याने एका साधुपुरुषाला म्हटले, " माझे आयुष्य वाया गेले. जेव्हा राजवैभव विलयास जाते, तेव्हा फकिरांशिवाय कोणी त्याचा सोबती होत नाही. मला वाटते की दूर एका निवांत जागी प्रार्थना करत बसावे आणि आता जो काही आयुष्याचा थोडाफार काळ शिल्लक असेल तो सत्कारणी लावावा. "

त्या सिद्धपुरुषाने त्याचे बोलणे ऐकून त्यास दटावून म्हटले, " बादशहा तकलाजी ! हे शहाणपण पुरे झाले ! साधुवृत्ती ही काही गोधडी पांघरण्याने येत नाही, किंवा जपमाळ ओढण्याने सुफिपद (तरीकत) प्राप्त होत नाही. खरी सिद्धी जनसेवेतच असते. तू तक्तावर बसून रजोगुण संपादन कर. त्यामुळे तू दरवेशीच होशील. सत्य आणि निष्ठा यांचा कंबरपट्टा आवळून बांध, दंभ व बढाईखोरपणा या हीन तत्त्वांना पायबंद घाल. तरीकतसाठी कृती आवश्यक आहे. बढाया मारून चालणार नाही.

आतापर्यंत ज्या महात्म्यांनी सिद्धी मिळविली त्यांनी आपली साधुवृत्तीची लक्तरे राजेशाही सदऱ्याच्या आतल्या बाजूसच लपवून ठेवली होती.

मला असे कळले की एकदा रूमचा (तुर्कस्तान) राजा एका सुविचारी साधू-पाशी गेला आणि त्याने आपले दुःख त्यास सांगितले, " माझ्या शत्रूंची सरशी झाल्या-मुळे माझे राज्य गेले. हा किल्ला आणि हे शहर यांशिवाय माझे असे आता काही राहिले नाही. माझ्यानंतर माझ्या मुलाला गादी मिळावी म्हणून मी फार खटपट केली, पण माझ्या नीच शत्रूंची फत्ते झाल्यामुळे माझ्या ताकदीचे आणि काबाड-कष्टाचे काही चीज झाले नाही. माझे शरीर आणि मन इतके थकून गेले आहे की आता काय उपाय करावा हे मला सुचेनासे झाले आहे. " तो सत्पुरुष त्याच्या अंगावर ओरडून म्हणाला, " रडतोस काय असा ? खरे पाहाता तुझी अक्कल आणि जिद्द पाहून लोकानांच रडू यावे. राज्य ते कसले आणि तू रडत काय बसलास ? तुझ्या आयुष्याची बरीच वर्षे उलटून गेली आहेत. तुझ्यापाशी सध्या जे काही आहे ते तुझ्या उरल्यासुरल्या आयुष्याला पुरेसे आहे. तुझ्यानंतर हेही दुसऱ्यानांच जाणार. कोण हुषार आणि कोण मूर्ख याची चिंता तुला कशासाठी ? ज्याचे त्यानेच बरेवाईट भोगले पाहिजे. तलवारीच्या जोरावर राज्य मिळवावे आणि ते सोडून चालते होण्याची पाळी यावी असे हे राजपद शहाणपणाचे कसे म्हणता येईल ? तू स्वतः पुरतीच उपाययोजना कर. तुझ्यानंतर येणाऱ्याला आपल्या वाटयाची चिंता असणारच. भूमीवरील पाच दिवसांच्या या निवासात डौल मिरविण्यासारखे काही नाही. नीट विचार कर आणि आपले चंबूगवाळे आटपण्याची तयारी कर. "

इराणच्या अमुक एका राजाने प्रजेचा छळ केला असल्याचे तुला नक्की माहीत आहे काय ?

शाश्वत राजसत्ता कोणास लाभली आहे ? परमेश्वराशिवाय कोणाचीच राजवट चिरंतन होऊ शकत नाही. येथे कायमचे ठाण मांडणे कोणासच साध्य होत नाही. चिरवास्तव्याची जागा ही पृथ्वी नव्हे. एके काळी सोन्याचांदीच्या वस्तूंनी कोठार भरणारा देखील थोड्याच दिवसांनी भिकेस लागतो. पण जो सदैव परोपकारी आणि सत्प्रवृत्त असतो तो देवाच्या दयेला अंतरत नाही. ज्या मनुष्याचा लौकिक शाबूत आहे, त्यालाच चिरंजीवी असे जाणते लोक म्हणतात. ध्यानात ठेव की दीन-दरिद्री जनतेचे दुःख तू दूर केलेस की तुला अक्षय फळ प्राप्त होईल. तू सतत दयाळू वृत्तीने वागले पाहिजेस. म्हणजेच कयामत किंवा अंतिम न्यायदानाच्या दिवशी तुला तुझ्या परोपकारांना अनुरूप असे स्थान मिळेल. जो मनुष्य सतत प्रयत्नशील असतो त्याचा दर्जा खुदाच्या दरबारात उंच जागी असतो. जो मागे पडतो तो अप्रामाणिक ठरून त्याची नालस्ती होते. ज्याला कसलाच अनुभव नसतो त्याचा अपमान अटळ आहे. अशा भयंकर भट्टीत भाकरी भाजलीस तर तुझी फटफजिती होईल. पेरणीच्या वेळी केलेली दिरंगाई तुला कापणीच्या वेळी भोवल्यावाचून राहाणार नाही.

## अन्यायी बादशहा आणि साधुपुरुष

सीरिया देशात खुदादोस्त नावाचा साधू सन्यस्तवृत्तीने एका गुहेत राहात असे. एका अंधाऱ्या कोपऱ्यात तो बसलेला असावयाचा आणि ईश्वराला दुवा मागत आणि मिळेल त्यावर संतोष मानून जीवन कंठत होता. त्याने कधीही आपले मस्तक कोणा दुसऱ्याच्या उंबरठ्यावर वाकविले नव्हते. म्हणूनच आता मोठमोठे लोक त्याच्या गुहेपाशी नतमस्तक होऊन त्याची वाट पाहात असत. शुद्धाचरणी ज्ञानी माणसाची इच्छा एवढीच असते की भिक्षापात्र अवलंबावे आणि मोह, लोभ टाकून द्यावा.

आपले मन "द्याहो" म्हणून क्षणोक्षणी म्हणते पण त्यामुळे अपमान सहन करत गावोगाव हिंडावे लागते.

हा ज्ञानी वृद्ध जेथे राहात होता तेथील बादशहा मोठा जुलमी होता. कोणी असहाय्य माणूस भेटला म्हणजे त्याचा तो फार छळ करत असे. त्या निर्दय, दुष्ट आणि जुलमी बादशहाने आपल्या उद्दाम वृत्तीने प्रजेला सळो की पळो केले होते. एक जमातीची जमात त्याच्या जुलमाला कंटाळून देशाबाहेर निघून गेली आणि तिने बादशहाची बदनामी गावोगाव केली. काही जमाती छळ सोशीत गरिबीने दिवस कंठत राहिल्या पण त्यादेखील आपला व्यवसाय करत असताना बादशहाला शिव्या-शाप देत होत्या. जेथे जुलमाचे थैमान असेल तेथे हसू कसे बरे उमलेल ? तो बादशहा कधी कधी खुदादोस्त साधूच्या भेटीसाठी जावयाचा पण साधू त्याच्याकडे विशेष लक्ष देत नसे. एकदा बादशहाने चिडून साधूला म्हटले, "महाराज आपण माझ्याशी इतक्या तिटकाऱ्याने वागू नका. आपल्याला माहीत आहे की मी आपला भक्त आहे. मग आपण माझा दुस्वास का धरावा ? मी कबूल करतो की माझे राज्य एवढे मोठे

नाही तरी पण काय झाले ? माझी योग्यता कोणा दरवेशापेक्षा कमी खास नाही. मी काही श्रेष्ठ असल्याचा दावा करत नाही. तरी पण आपण इतरांशी जसे वागता, तसे माझ्याशी वागण्यास हरकत कोणती ? "

त्या हुषार साधूने त्याचे बोलणे ऐकले. त्या बादशहाचा त्याला भारी राग आला व त्याने त्याला झिडकारून म्हटले, " बादशाह सलामत ! जरा विचाराने बोलावे. आपल्या अस्तित्वामुळेच प्रजेचे पीडन होत आहे. मला प्रजेचे हाल पाहवत नाहीत. जे माझे मित्र आहेत त्यांचे आपण दुष्मन आहात. तेव्हा आपल्याला मी माझा मित्र कसा समजू ? त्यातूनही मी आपल्याशी सख्य केलेच तरी देखील त्याचा काही उपयोग होणार नाही. कारण खुद्द परमेश्वरच आपला शत्रू बनलेला आहे. या खुदादोस्ताची जरी आपण चामडी सोलली तरी तो आपल्या मित्राच्या शत्रूशी दोस्ती करणार नाही. ज्या बादशहाची दहशत घेऊन लोक झोपी जातात त्यांच्या झोपण्याचे देखील मला नवल वाटते. योग्य वेळी जागा हो. आपली बुद्धी शाबूत असेल तर औदार्य व कृपादृष्टी यांचा अंगीकार कर आणि निःश्रेयसाच्या प्राप्तीसाठी झट. "

श्रेष्ठ पुरुषा, दुर्बळांशी जबरदस्ती करू नकोस, कारण या जगात ठराविक रीतीने कोणत्याच गोष्टी घडत नसतात. कोणा हतबलाचा तू जर हात पकडलास तर तो पुढे बलवान झाल्यावर किरकोळ कारणांवरून तुझ्यावर मात करील. कोणालाही त्याच्या स्थानावरून हुसकून लावू नये. कारण जेव्हा तुझा पडता काळ येईल तेव्हा तो हात दाखविल्याशिवाय राहणार नाही. आपल्या मित्रमंडळींची मर्जी राख; कारण कोणाचा जाच करणे हे खजिना रिकामा होण्यापेक्षाही वाईट होय. कोणाच्याही कामात उगाच दिरंगाई करू नये. कारण एखादे वेळी त्यांच्या पायाशी लोळण घेण्याचा आपल्यावर प्रसंग यावयाचा. भांडकुदळ माणसाशी निकराने झुंजावे. जुलमी माणसाच्या हातापेक्षा धैर्यवंतांच्या दंडांना अधिक मान मिळतो. कोणी जर त्रस्त मनुष्याच्या शुष्क ओठांकडे बघून हसला तर त्यास सांग की हसू नकोस ! जुलमी मनुष्याचे दातही उपटले जातील.

झोपी गेलेला शेठ नगाऱ्याच्या आवाजाने उठला आणि चडफडू लागला तर त्यास म्हणावे, "जरा रखवालदाराची अवस्था पाहा. कारण तो तर रात्रभर जागरण करतो. तांड्यातील व्यापारी आपल्या गाठोड्यांच्या विवंचनेत असतो, पण गाढवांची पाठ खरचटते याची त्याला वार्ता देखील नसते. अलबत् मी तुला असहाय्य समजत नाही, तरी देखील जर दुसरा कोणी असहाय्य असेल तर त्याच्याकडे तू लक्ष द्यावयाला हवे. याविषयी मी तुला एक गोष्ट सांगतो नाहीतर तू मला निर्बुद्ध म्हणशील.

## आपल्यापाशी असलेल्या सामर्थ्याने दुर्बलाला मदत करावी

एकदा दमास्कस शहरात इतका भयंकर दुष्काळ पडला की प्रेमवीरांचे प्रेमच बेपत्ता झाले. आकाशाने पृथ्वीशी एवढा कंजूसपणे वागण्याचा सपाटा चालविला

का शते व झाडे यांच्या देखील तोंडचे पाणी पळाले. सगळे झरे आटले. पाणी फक्त एका ठिकाणीच आढळत असे आणि ते म्हणजे अनाथांच्या डोळयात तेवढेच. कोणा दीन विधवेच्या सुस्कान्यांचाच काय तो हुंकार ऐकू येई. गावातील धुराडी थंड झालेली होती. झाडे सर्वत्र दरवेशांप्रमाणे उघडीनागडी उभी होती. एके काळी जे पैलवानांप्रमाणे तगडे दिसत तेसुद्धा सुकून पालीएवढे झाले. कोणत्याही डोंगरावर हिरवळ शिल्लक राहिली नाही. बागेत झाडांच्या फांद्यांच दिसत नव्हत्या. टोळधाडीने बागांचा फन्ना उडविला होता तर माणसांनी टोळांचा फडशा आरंभला होता.

अशा वेळी माझ्याजवळ माझा एक मित्र आला. त्याच्या हाडाच्या सांगाड्यावर चांमडे कसेबसे चिकटलेले होते. पण तो एके काळी श्रीमंत असल्याचे कळून येताच मला आश्चर्याचा धक्का बसला. मी त्याला म्हटले, " बाबा, तू एवढा सज्जन मनुष्य ! काय ही तुझी दुर्दशा ! मला तरी सांग, तुला काय होत आहे ते. " त्याने चिडून मला म्हटले, " तुझे डोके शाबूत आहे ना ? सर्व काही ठाऊक असून काहीतरी विचारत राहणे चांगले नव्हे. कोणता कठीण प्रसंग ओढवला आहे ते तू पाहात नाहीस काय ? हालअपेष्टांना काही सीमा राहिली आहे काय ?

आकाशातून पावसाचा थेंबही पडत नाही. आर्त लोकांच्या सुस्कान्यांचे ढग आकाशालाही पोचत नाहीत. "

मी म्हटले, " हो, पण तुझे काय अडले आहे ? जेथे विषहरण करणारा मणी नसेल तेथेच सापाचे भय असते. कोणी दरिद्री माणूस दगावला तर त्यात काय नवल ? बादळाचा बाऊ बदकाला काय म्हणून वाटावा ? "

माझ्या हुषार मित्राने माझ्याकडे तुच्छतेने पाहिले. मूर्खाकडे विद्वान याच दृष्टीने पाहात असतात. " जो मनुष्य काठावर उभा आहे, तो देखील समोर समुद्रात गटांगळ्या खाणाऱ्यांकडे पाहून स्वस्थ कसा उभा राहील ? माझा चेहरा दारिद्र्यामुळे पडलेला नसून माझ्या निर्धन मित्रांच्या हालअपेष्टांनी माझा रंग पिवळा पडला आहे. कोणालाही आपल्याला किंवा दुसऱ्याला कष्ट होत असताना मुळीच चैन पडू नये. देवाच्या दयेने मला जरी दुखापत झाली नसली, तरी दुसऱ्यांचे दुःख पाहून माझ्या अंगात कापरे भरते.

सुदृढ मनुष्य झोपलेला असला आणि त्याच्या शेजारी दुखणेकरी कण्हत असला तर त्याला कधी चैन पडेल काय ? जर गरीब दरवेशाची अन्नान्नदशा झाली तर माझ्या घशातल्या घासाचे विष होते आणि मला कळा येऊ लागतात.

तुझा जिवलग जर कारावासात खितपत पडला असेल तर तुला बागेत कसली उसंत लाभणार आहे ? "

एके दिवशी रात्रीच्या वेळी लोकांच्या किंकाळ्यांचा सर्वत्र कल्लोळ उडाला. मला कळले की अर्धे बगदाद शहर जळून खाक झाले. तेव्हा एकाने मनात देवाचे आभार मानून म्हटले, " तरी बरे ! माझे दुकान तरी शाबूत आहे. "

एका अनुभवी गृहस्थाने त्यास खडसावून म्हटले, " वा:, तुला तर आपल्या हितापलीकडे काहीच दिसत नाही ! तुझे एकटयाचे घर जर सुरक्षित राहणार असेल तर तुला सारे शहर जळल्याचे सोयर सुतक काय ? लोक भुकेने व्याकुळ होऊन पोटावर दगड बांधून घेत असले, तरी पोटभर खाण्याची हौस बाळगणारा मनुष्य निर्दयीच समजला पाहिजे. दरवेश जर भुकेने तडफडत असेल तर श्रीमंत मनुष्य तोंडात घास कसा घालील ? रुग्णाचा उपचार करणारा धडधाकट मनुष्यही व्यथितच होत असतो.

कनवाळू लोकांना आपल्या मित्रांनी खूप मजल गाठल्यानंतर देखील वाटतच असते की ते बरेच मागे राहिलेले असावेत. काटे खाणारे गाढव चिखलात अडकलेले पाहून मोठमोठ्या बादशहांच्या मनावरही ओझे येऊन पडते. जर कोणा भाग्यवंताला सुख लाभले असेल तर सादीचा एक शब्ददेखील त्याला पुरेसा आहे. तुला मी सांगतो तेवढे पुरे आहे. ऐक. जर तू काटे पेरले असशील तर त्यातून जाईजुईची पैदास कशी होईल ? "

## न्यायाचे फळ

तुला माहीत असेलच की इराणच्या कित्येक बादशहांनी आपल्या प्रजेवर जुलूम केला. पण त्याचा परिणाम काय झाला ? त्या राजांचे वर्चस्व राहिले नाही, राज्य राहिले नाही व शेवटी त्यांचा जुलूमही फार काळ टिकला नाही.

त्यांनी केलेल्या जुलमाचा बभ्रा मात्र या भूमीवर शिल्लक राहिला आणि छळणारा बादशहा आणि पीडित जनता नियतीच्या नियमाप्रमाणे नाहीशी झाली. न्यायी बादशहा धन्य होय. कारण कयामतीच्या दिवशी न्यायासनाखालीच त्याचे स्थान राहील. ज्या राष्ट्रावर ईश्वराचे खरेखुरे प्रेम असते तेथे तो न्यायी बादशहाची नेमणूक करतो. त्याला कोणा एका राष्ट्राचा बीमोड करावयाचा असेल तेव्हा तो ते राष्ट्र एखाद्या सैतानी बादशहाच्या ताब्यात देतो. देवाच्या शापामुळेच जुलमी बादशहा प्रजेच्या नशिबी येतो, हे माहीत असल्यामुळे सज्जन आणि शहाणे लोक तसला शाप देणे टाळतात.

आपल्याला सन्मान आणि मोठेपण ईश्वरापासून मिळत असल्याने त्याचे आभार मान. जो ईश्वराचा उतराई होत नाही त्याचे वैभवही वाया जाते. देवाला धन्यवाद दिल्याने आपले वैभव वाढते हे तू कुराणात वाचले आहेस. तू आपल्या राज्याबद्दल आणि संपत्तीबद्दल देवाचा ऋणी राहिलास तर तुझे राज्य आणि वैभव चिरकाल टिकेल. राज्यवैभव संपादन करून तू जुलूम करू लागलास तर बादशाही नष्ट होऊन तू भिकारी बनशील.

ज्या बादशहाच्या राजवटीत दुर्बलांचा बलिष्ठांकडून छळ होतो, त्या बादशहाचा आराम हराम होय.

प्रजेला तिळमात्र दुःख देऊ नये, कारण बादशहा गोपाल असून प्रजा ही गोकुळ होय. जर बादशहा प्रजेवर जुलूम करू लागला तर त्याला गोपालक कसे म्हणावयाचे ? तो लांडगाच असून त्याबद्दल तीव्र नापसंती दर्शविली पाहिजे. आपल्या आश्रयाला आलेल्या प्रजेचा जो छळ करतो त्याचे भाग्य नष्ट झाले आणि त्याला दुर्बुद्धी सुचली असे म्हटले पाहिजे. तू मेल्यावर लोकांनी तुला शिव्याशाप देऊ नयेत असे वाटत असेल तर तू लोकांशी चांगला व्यवहार केला पाहिजेस. त्यामुळे कोणीही तुला नावे ठेवणार नाही."

## न्यायी व दुष्ट अशा दोघा भावंडांची गत काय झाली ?

मी असे ऐकले की पश्चिमेकडील एका देशात एका पित्याला दोन मुलगे होते. ते दोघेही धडधाकट, शूर, देखणे आणि हुषार होते. पण त्यांच्या पित्याला का कोण जाणे, नेहमी वाटावयाचे की त्यांच्या मध्ये कधी ना कधी वितुष्ट आल्याशिवाय राहणार नाही. म्हणूनच त्याने मरण्याच्या अगोदर जमिनीचे दोन हिस्से केले आणि प्रत्येकाला एक एक हिस्सा देऊन टाकला. हो ! नाहीतर काय घ्या ! ते एकमेकांच्या उरावर बसावयाचे आणि खून पडण्यापर्यंत पाळी यावयाची ! त्यानंतर थोडे दिवस बाप जगून वाचून होता. पण शेवटी त्याने देह ठेविला. त्याच्या मृत्यूमुळे त्याच्या सर्व आशांचा शेवट झाला व तो मेल्यावर सर्व सत्कर्मे बंद पडली. त्याचे राज्य, प्रचंड सैन्य आणि द्रव्य दोघा बादशहांनी काबीज केले. त्या दोघांनी त्यांना सुचले त्याप्रमाणे अलग अलग मार्ग अवलंबिले. एकाने न्याय आणि धर्माचा पाठपुरावा केला आणि चांगला लौकिक मिळविला; तर दुसऱ्याने प्रजेला पिळून तिचे वित्तहरण केले. एक सौम्यपणाने साधुसंतांची सेवा करू लागला. त्याने नव्या नव्या इमारती उठविल्या. सहस्रभोजने घातली. सैनिकांना वेळच्यावेळी पगार दिला. साधुसंतांसाठी धर्मशाळा बांधल्या. चैन करण्यासाठी करावा तसा खजिना रिकामा केला. त्याबरोबरच त्याने आपले लष्कर फुगविले. प्रजेच्या जयजयकाराचा जल्लोष अस्मानाला भिडला. असले दृश्य सध्या आमच्या सुलतान अबूबक्र साद यांच्या राज्यात सर्वत्र पाहवयास मिळते. कारण हा बादशहा श्रेष्ठ कुळीचा, बुद्धिमान आणि उदार आहे. त्याचा उमेदीचा वृक्ष वृद्धिंगत होवो. आता गोष्ट ऐका, तो सच्छील मुलगा मोठ्या मानास चढला. तो केव्हाही सत्कर्मरत असे आणि सांजसकाळ देवाची प्रार्थना करी. त्याच्या राज्यातून कुबेर (कारून) देखील आपली संपत्ती घेऊन खुशाल जाऊ शकला असता. कारण सर्वत्र न्यायाचे राज्य होते; आणि गोरगरीब खाऊन पिऊन तृप्त होते. त्याच्या राजवटीत कोणाचा छळ असा झालाच नाही. कोणाच्याही मनाला कसलीच व्यथा झाली नाही. त्याच्यावर प्रजा खूष होती. त्यामुळे राज्यातील मातब्बरांपेक्षाही त्याचा वरचष्मा झाला आणि त्याच्या आज्ञेपुढे मोठमोठे लोक देखील मान तुकवीत.

आता दुसऱ्या भावाला काय वाटत होते ते ऐका. तो आपले राज्य वाढविण्याच्या

फंदात पडला आणि प्रजेला त्याने करभाराखाली चिरडून टाकले. व्यापाऱ्यांच्या दौलतीवरही त्याचा डोळा होता. त्या बिचाऱ्यांना त्याने नानापरीने लुबाडले. आता गरिबांबद्दल बोलावयाचे तर तो त्यांचा शत्रू होता असे म्हणण्यापेक्षा त्या पापामुळे तो स्वतःचाच शत्रू बनला असे म्हणावे लागेल. लोभी इतका होता की त्याने कुणाला दिले तर नाहीच पण स्वतःदेखील पोटभर खाल्ले नाही. अर्थात त्याने हे वाईट केले असे कोणीही समज असलेला मनुष्य म्हणेलच. त्याने लांडयालबाडया करून खूपच संपत्ती मिळविली. पण सैन्य उपाशी ठेवल्यामुळे ते वैतागाने रोडावले. व्यापाऱ्यांना कळून चुकले की त्या मूर्खाच्या राज्यात अन्यायाचा नंगा नाच चालू आहे. त्यांनी त्याच्याशी चालू असलेला खरेदी-विक्रीचा संबंध तोडला. शेती बंद पडल्याने प्रजेच्या तोंडचा घासही लुप्त झाला. दैवाने त्याच्यावर वक्रदृष्टी केली आणि त्याच्या शत्रूने त्याचे राज्य हिरावून घेतले. कालचक्राने त्याच्याशी शत्रुत्व आरंभिले. त्याने त्याची पाळेमुळे उखडून टाकली. त्याच वेळी शत्रूच्या घोडदळाने त्याचा मुलूख उध्वस्त केला.

दिलेले वचन मोडले तर एकनिष्ठेची अपेक्षा कोणाकडून करावयाची ? कूळच पळून गेले तर सारा कोणाकडून वसूल करावयाचा ?

ज्या बेरडाच्या पाठीमागे शिव्याशाप लागतात तो कधी काळी कोणाचे भले करेल असे वाटते काय ? तो जन्मला तेव्हा सत्कर्म त्याच्या वाटेस आले नव्हते. म्हणूनच थोरामोठयांनी जे करण्याचा उपदेश केला आहे, ते त्याने कधी केले नाही. खरेच, सज्जनांविषयी सर्व थोरामोठयांनी एकच वाक्य म्हटले आहे, "बाबा ! तू आपल्या सत्कर्माचे फळ चाख. अन्यायी मनुष्याला ते कधी मिळणार नाही."

जुलूम करणे हे देखील शेवटी कोणत्यातरी न्यायकर्मासाठीच असते असे म्हणणाऱ्याच्या अकलेचे दिवाळे वाजले आहे आणि तर्कशक्ती लुळी पडली आहे, असे समजावे.

## दृष्टान्त

एकजण फांदीवर बसून झाडाचा बुंधा कापण्याची खटपट करत होता. त्या बागेच्या यजमानाने ते पाहिले आणि तो विचार करू लागला, "हा मनुष्य माझे काहीच नुकसान करत नसून आपलेच अहित साधत आहे. उपदेश ही एक अशी गोष्ट आहे की तू लक्ष देऊन ऐकशील तरच तुझी पीडा टळेल ! म्हणून सांगतो की तुझ्याजवळ बळ असेल तर त्याचा प्रयोग दुर्बळांवर करू नकोस. कारण तू ज्या भिकाऱ्याला तुच्छ मानतोस तोच उद्या कयामतीच्या दिवशी एखाद्या बादशहाला देवापुढे आणून उभा करील. कयामतीच्या दिवशी तुला मानाचे पान हवे असेल तर कोणत्याही कफल्लक माणसाचे देखील मन दुखवू नकोस. तुझी बादशाही खतम झाल्यावर यःकश्चित फकीर देखील तुझी ससेहोलपट करील. तू कोणालाही दुर्बळ समजून त्यांच्याशी भांडू नकोस, कारण जर तो जबरदस्त निघाला, तर तुला शरमेने

मान खाली घालावी लागेल. आपल्यापेक्षा कनिष्ठ मनुष्याकडून मार खाणे हे लज्जास्पद आहे. याविषयी विचारवंतांमध्ये दुमत नाही. भाग्यशाली लोक आपल्या सदाचरणानेच राजसिंहासन आणि मुकुट मिळवितात.

जे सरळ वागतात त्यांच्याशी कपट करू नकोस. तुला सत्य ऐकण्याची इच्छा असेल तर शेख सादीचे म्हणणे ऐक.

## ईश्वरेच्छा मान्य करून संतुष्ट राहणाऱ्या दरवेशांची प्रशंसा

तुम्ही असे समजू नका की बादशाहीपेक्षा श्रेष्ठ पद नाही. दरवेश हाच खरा सर्वतोपरी सुरक्षित असा बादशहा होय. ज्यांच्यावर ओझे बेताचे असते त्यांची गती जलद असते. हे सत्य, सर्व जिज्ञासूंनी ध्यानात ठेवावे. जो निर्धन असतो त्याला रोटीचा एक तुकडा बस्स ! बादशहाला साऱ्या दुनियेची हाव असते. फकिराला रात्रीच्या वेळी खावयाला भाकरी मिळाल्यावर तो शामच्या (सिरिया) सुलतानापेक्षाही अधिक सुखाने पहुडतो.

सुख काय किंवा दुःख काय ! माणूस मेल्यावर दोन्ही स्मृतीतून नाहीशीच होणार.

डोक्यावर किरीट असला काय किंवा मानेवर करभार असला काय ! कोणी श्रीमंत महालात लोळत असला काय किंवा कोणी दरिद्री मनुष्य कैदेत खितपत असला काय ! जेव्हा दोघेही मृत्युमुखी पडतील, तेव्हा त्यांना ओळखणे अशक्य होईल.

## साधू आणि कवटी

मला असे कळले की तैग्रीस नदीच्या किनाऱ्यावर एका साधूचे आणि एका कवटीचे संभाषण चालू होते. कवटी बोलली :—

" मी एके काळी जगात फार गाजलो होतो. माझ्यावर राजमुकुट असे. दैव मला नेहमी अनुकल असे आणि जेथे तेथे माझी फत्ते होई. मी एकदा माझ्या मर्दुमकीने इराक देश जिंकला होता. पुढे मला मुलुखगिरीची हाव उत्पन्न झाली अणि किरमान (इराण) सर करण्याचा मी मनसुबा केला. एवढ्यात माझ्या डोक्यात कृमींनी प्रवेश केला (माझे मरण ओढवले). "

तू कानात बोळे घालून निर्धास्त झाला आहेस खरा, पण तुला शहाणा व्हावयाचे असेल, तर ते बोळे काढून टाक म्हणजे तुला मृतात्म्याचे बोधपाठ ऐकायला मिळतील.

## सत्कर्म आणि दुष्कर्म यांची फळे

जो मनुष्य सत्कर्म करतो त्याच्या नशिबी दुर्गती कधीच येत नाही. त्याचप्रमाणे जो दुष्कर्मात गढून गेलेला असतो त्याचे फळ म्हणून सद्गती कधीच प्राप्त होत नाही.

खोडसाळ मनुष्य केव्हाही आपल्याच दुष्कर्माने दगावतो. एकदा विंचू घरट्या-बाहेर पडला तर नशीब शिकंदर असेल तरच घरी परततो. तुझ्या पिंडात जर कोणाचे बरे करण्याची प्रवृत्ती नसेल तर तुझे सत्त्व आणि कठिण दगड यात फारसा फरक राहणार नाही.—चुकलो हं ! एक वेळ दगड, धातू, लोखंड वगैरे पदार्थ कठीण असले तरी त्यांपासून लोकांना फायदा मिळण्याची शक्यता आहे पण तुझा ताठा मात्र व्यर्थ ! म्हणूनच ज्या मनुष्याचा दगडाएवढाही उपयोग होत नाही तो जिवंत असून-नसून सारखाच. प्रत्येक मनुष्य पशूपेक्षा चांगला असतोच असे नाही. पण वाईट मनुष्यापेक्षा पशू परवडला. पशूपेक्षा केवळ बुद्धिमान मनुष्यच श्रेष्ठ ठरेल. पशूप्रमाणेच हल्ला करणाऱ्याला श्रेष्ठ कसे म्हणता येईल ? ज्याला खाणे, पिणे आणि झोपणे यांपेक्षा दुसऱ्या कशातच गोडी वाटत नाही त्याला पशुकोटीपेक्षा कोणत्या बाबतीत श्रेष्ठ समजावयाचे ? मारे ऐटीत घोड्यावर स्वार होऊन भरारी मारणारा अभागी माणूस नुसता मिरवतच फिरत राहील आणि संथपणे पायी चालणारा त्याच्या अगोदरच मजल गाठेल. चांगले नशीब हे काही बी पेरून मिळत नाही. ईप्सितासाठी छातीचा कोट करून उभे राहावे तेव्हा कोठे पुरुषार्थ साधता येतो. कोणा वाईट मनुष्याला सद्‌गती प्राप्त झाल्याचे आमच्या तरी ऐकिवात नाही.

## जुलमी सरदार

एक मोठा बलिष्ठ पैलवान होता. त्याच्यापुढे मी मी म्हणणारे ताकदवान देखील नरम पडत असत. एकदा तो एका विहिरीत पडला. दुष्ट मनुष्याच्या नशिबी दुर्भाग्यच ठेवलेले असते. तो फार गयावाया करू लागला. आपण अतिशय दुर्भागी आहोत असे त्याला वाटू लागले. त्याला रात्रभर झोप तर नव्हतीच, पण आक्रोश करण्यापलीकडे तो काही करूही शकत नव्हता. इतक्यात एक माणूस तेथे आला आणि त्याने त्याच्या डोक्यावर दगड मारला.

"आतापर्यंत तू किती लोकांच्या किंकाळ्या ऐकून मदतीस धावला आहेस ? म्हणून आता लोकांनी तुझी हाक ऐकावी अशी अपेक्षा तू का बाळगतोस ? तू बी पेरलेस ते द्वाडपणाचे. त्याला साजेल असेच फळ तू भोगत आहेस. तू कितीतरी हृदयांना घायाळ केले आहेस, तेव्हा तुझ्या मनाच्या जखमेवर मलमपट्टी कोण करणार ? आम्हा लोकांना पाडण्यासाठी म्हणून तू ही विहीर खणलीस, पण तीत तू स्वतःच पडलास."

विहीर खोदून घेणारे दोन प्रकारचे लोक :

सज्जनांनी खोदून घेतलेल्या विहिरींनी लोकांचा फायदा होतो.

दुर्जन दुसऱ्यांना पाडण्यासाठी म्हणून विहीर खोदवितो पण स्वतःच तीत पडतो.

एकाने लोकांची तहान भागावी म्हणून विहीर बांधली.

दुसऱ्याने लोकांनी पाय घसरून पडावे म्हणून.

तू वाईट कर्म करतोस म्हणून स्वतःच्या कल्याणाची आशा बाळगू नकोस. द्राक्षे काही चिंचेच्या झाडाला लागत नाहीत.

हिंवाळयात जर तू जव पेरण्यात गुंतलास तर सुगीत तुझ्या घरी गव्हाची पोती कशी येतील ?

निवडुंग जरी तू जिव्हाळयाने वाढविलेस तरी त्यापासून तुला चवदार फळे कशी मिळतील ?

खजूरसुद्धा वेळूवर उगवत नाही. म्हणून माणसाने आपण जे पेरले त्याचेच पीक घेण्याची आशा बाळगावी.

## हज्जाज बिन युसुफ आणि सत्यवचनी साधू

असे म्हणतात की एका सत्यवचनी साधूने हज्जाज बिन युसुफ या सरदाराला खडी ताजीम दिली नाही. तेव्हा त्याने भालदाराला म्हटले, " चामडयाची सतरंजी आंथर आणि तीवर याची मुंडी छाट. " शेषं कोपेन पूरयेत्-जेव्हा सयुक्तिक असे काही करता येत नसेल, तेव्हा दुर्जन आगच पाखडतात. साधू प्रथम हसला. पण नंतर त्याला वाईट वाटू लागले. ते पाहून त्या निर्दय हज्जाजला आश्चर्य वाटले. " तो हसतो आणि रडतो, याचा काय अर्थ " असे त्यास कोडे पडले, व त्याने त्यास त्याचे कारण विचारले.

त्या साधूने म्हटले, " मी रडलो ते दैव प्रतिकूल आहे म्हणून. कारण मला चार मुले आहेत. त्यांचे काय होईल याची मला काळजी वाटते. याउलट मी हसलो अशासाठी की मी जगातून छळ सोसून बाहेर पडत आहे, कोणाला त्रास देऊन नव्हे. "

त्यावर एका खाशाने विनविले, " जहाँपनाह, त्या बिचाऱ्याला माफ करावे. साऱ्या जगाला तो वंद्य वाटतो. प्रजेला असा एकदम धक्का देणे योग्य नव्हे. आपले औदार्य आणि क्षमाशीलवृत्ती त्यास दाखवावी आणि त्याच्या कुटुंबियांचा विचार करावा. "

जो दुसऱ्याच्या कुटुंबाची धुळधाण उडवितो तो आपल्याच कुटुंबाच्या विनाशाची तयारी करीत असतो. तू जर अनेकांची मने दुखविली असशील तर कयामतीच्या दिवशी तुला काही चांगले लाभेल असे समजू नकोस.

त्रस्त मनुष्य झोपत नसतो. त्याच्या निश्वासाची धास्ती घे. सकाळी निघणाऱ्या त्याच्या आर्तस्वरांच्या धुरापासून आपला सांभाळ कर. विशुद्ध मनाच्या कण्हण्याने, देवाला केलेल्या आळवणीने तू मुळीच बिचकू नकोस. "

हज्जाज रागाच्या भरात जे बोलला त्याला समंजस असे कोणतेच कारण नव्हते. नाहीतरी सैतानाला सुविचार सुचतच नसतो. वाईट बीजापासून गोड फळांचा वृक्ष उगवणार नाही. जर कोणाशी लढाई जुंपली तर प्रतिपक्षीयांची अब्रू घेण्याची

कृत्ये करू नयेस. कारण आपली देखील अब्रू सांभाळायची असते. जर एखादे पोर तुला सहज चीत करू शकत असेल, तर बलाढ्य माणसाशी कुस्ती लढण्यासाठी दंड थोपटू नकोस.

मला नंतर समजले की या विनवणीचा हज्जाजवर काही परिणाम झाला नाही. आणि त्याने त्या साधूस ठार मारले. दैवगतीपुढे कोणाचे चालते ?

एक सत्पुरुष या अन्यायाची खंत बाळगत रात्रभर जागा राहिला. त्याचा डोळा लागला, तेव्हा त्याच्या स्वप्नात तो मृतात्मा येऊन म्हणाला, "मला एका क्षणापेक्षा अधिक दुःख झाले नाही. पण त्याच्या (हज्जाजच्या) उरावर दैवी कोप कयामतीपर्यंत राहील."

एकजण आपल्या मुलाला उपदेश करत होता. "हुषार माणसांचे बोलणे ध्यानात ठेवावे. बेटा, तुझ्याहून जे कमी बलवान असतील त्यांना छळू नकोस. कारण की तुझ्याहून कोणी जबरदस्त भेटला तर तुझी देखील भंबेरी उडेल. तू नाठाळ लांडगा आहेस. पण तुला देखील फाडून खायला कोणी बिबटा टपलेला असेलच की ! मी जेव्हा जवान होतो तेव्हा ताकतीने माजलो होतो. माझ्यापेक्षा हिणकस असलेले माझ्याबद्दल धास्तावले होते. पण जेव्हा माझ्यापेक्षा जबरदस्त असलेल्या पहिलवानाने माझी रग जिरवली तेव्हापासून मी दुर्बळांना छळणे सोडून दिले.

## प्रजापालन आणि दीनोद्धार

वेळीच जागे व्हा ! गाफील होऊन झोपू नका. पुढारी आहे त्याचा आराम हराम होय. दुर्बळांबद्दल कळवळा असू द्या. कारण नियतीच्या चक्रनेमिक्रमाने दुर्बळही अधिक बलवान होईल हे ध्यानात घ्या.

कनवाळूपणाने केलेला उपदेश कडूच असतो. कडू औषधाप्रमाणे तो रोग निवारकही असतो.

असाच एक राजा होता. त्याला नारू झाला व तो त्या आजारामुळे अशक्त होऊन दाभणाइतका रोडावला. दीर्घकाळच्या आजारामुळे त्याचे मनही दुर्बळ बनले व तो सामान्य लोकांचा देखील मत्सर करू लागला.

बुद्धीबळातला राजा हा जरी अतिश्रेष्ठ मोहरा असला तरी काटशह बसल्यावर प्यादे देखील त्याच्यावर मात करते.

राजाच्या एका स्नेह्याने अदबीने त्यास म्हटले, "ईश्वर हुजुरांची आयुष्य-वृद्धी करो ! या गावात एक अत्यंत विशुद्ध मनाचा साधू आहे. साधूंमध्ये देखील असा सच्चा माणूस विरळाच आढळतो. पुष्कळ लोक त्याच्या दर्शनासाठी जातात आणि त्यांचे मनोरथ तो तात्काळ पुरे करतो. त्यास आपण इकडे बोलवावे आणि त्याच्या मंत्रसिद्धीने जो ईश्वरी प्रसाद प्राप्त होईल त्याने आपली पीडा टळेल."

बादशहाने शागीर्दाला त्या साधूस पाचारण करण्यासाठी पाठविले. तो आल्यावर त्यास त्याने फार अजिजीने आपल्याला बरे करण्यासाठी विनविले.

वृद्धत्वाने वाकलेल्या त्या साधूने रागाने म्हटले, "देव नेहमी न्यायी मनुष्यासच मदत करतो. तू ही स्वत: कृपावंत हो. आणि ईश्वराच्या कृपेची वाट पाहा. तू कित्येक गरिबांना अंधार कोठडीत डांबून ठेवले आहेस. तेव्हा माझा मंत्र तुझ्यावर कसा बरे चालेल ! तू प्रजेशी औदार्याने वागत नाहीस तेव्हा तुला राज्यापासून सुख कसे मिळणार ? प्रथम आपण केलेल्या पापाचरणाबद्दल क्षमा मागावी लागते; तेव्हाच साधुजनांच्या मंत्राचा फायदा होतो. आता तर गांजलेल्या प्रजाजनांचे शाप तुझ्या पाठीशी लागले आहेत. तेव्हा साधूंच्या आशिर्वादाचा काही उपयोग होणार नाही."

बादशहा साधूचे बोलणे ऐकून संतापला पण त्याला स्वत:बद्दल खंतही वाटली.

तो मनात म्हणाला, "मी का चिडावे ? साधू जे म्हणतो ते खरे आहे."

लगेच त्याने कैद्यांना मुक्त करण्यास फर्माविले. साधूने कुराणाचे दोन श्लोक म्हटले आणि सर्वश्रेष्ठ परमेश्वराजवळ बादशहाला बरे करण्यासाठी प्रार्थना केली. तो म्हणाला,

"हे खुदा ! तू या प्राण्याला लढाईत कैद केले होतेस. आता शांतीचा काळ आहे तेव्हा तू याला मुक्त कर."

साधू आपली प्रार्थना म्हणत असतानाच बादशहाला बरे वाटू लागून तो आपल्या पायावर उभाही राहिला. त्याला इतकी तरतरी वाटू लागली की तो मोराप्रमाणे उड्डाणही करील असे लोक म्हणाले. नारू बाहेर आलेला पाहिल्यावर त्याने त्या साधूच्या माथ्यावर आणि पायावर मोती उधळण्यास सांगितले. असत्याच्या दडपणापायी सत्य सांगण्यास कचरू नये. यास्तव साधूने बादशहास म्हटले, "यापुढे आपण असे वागू नये. कारण नारू पुन्हा सतावेल. एकदा पाय घसरून पडल्यावर जपून चालावे. नाहीतर पुन्हा पाय घसरावयाचा. सादीपासून हे सत्य शिका की माणूस पडल्यावर तो उठेलच असे प्रत्येक वेळी म्हणता येत नाही."

## या जगाच्या अस्थिरतेसंबंधी

बेटा ! हे जग चिरकाल टिकणारे नाही ! येथे अमूक एक गोष्ट नक्की घडेल असा नेम नाही ! पैगंबर सुलेमान हे खरे अति बलाढ्य. त्यांचे तख्त वाहत्या वाऱ्याबरोबर उडून जाणारे नव्हते हे खरे ! पण दीर्घकाळानंतर का होईना ते नष्ट झालेच की नाही ! त्यात चांगले येवढेच झाले की त्यांचा कधी अपमान झाला नाही किंवा त्यांना अपमृत्यु आला नाही.

जो परहितरत असतो, तोच शेवटी बाजी जिंकतो. जो थोडे तरी सत्कृत्य करतो त्याचे जीवित सफल होते. जो ढीगभर संपत्ती जमवून सर्व येथेच सोडून जातो, तो मात्र करंटा खरा !

**कालचक्र सोडी न कुणा**
**संपदा तर चपल चरणा ।**

मला एकाने ही गोष्ट सांगितली. इजिप्तच्या एका बादशहावर यमराजाने धाड घातली. त्या बादशहाच्या तोंडचे पाणी पळाले. सूर्यच पिवळा पडला तर दिवस म्लानच होतो. हकीम औषधोपचार निरर्थक असल्याचे सांगू लागला तेव्हा सरदार मंडळी फार बेचैन झाली.

देवाचे राज्य तेवढेच स्थिर. तख्त, मुकुट हे सारे अस्थिर. शेवटचा क्षण येऊन ठेपल्यावर तो जे म्हणाला ते लोकांनी ऐकले, " इजिप्त देशात माझ्यासारखा बादशहा झाला नाही. गादीवर असता मरणाची मी कधीच क्षिती बाळगली नाही. मी संपत्ती खूप मिळविली. पण ती भोगली नाही. आता चाललो भिकाऱ्यासारखा ! संग्रह करतो आणि भोगतो तोच खरा श्रीमंत ! तू खाशील तेवढेच तुझे. येथे सोडून जाशील ते धन नव्हे. ते तुझे निःश्वास आणि त्या तुझ्या अतृप्त वासना !

शेटजी मरताना एक हात पुढे पसरतात व दुसरा हात मागे घेतात ! असे का ?

त्यांची वाचा मृत्यूभयाने बंद पडलेली असते. पसरलेल्या हाताने ते दिलदार-पणा सुचवितात. तर मागे घेतलेल्या हाताने जुलूम आवरता घ्या अशी खूण करतात. हातात शक्ती आहे तोवर पायातील काटा काढून घ्या. एकदा तुम्ही शवपेटीत बसल्या-वर तुमचे हात हालणार नाहीत. बाहेर सूर्य, चंद्र, सुरैया (कृतिका) यांचा झगमगाट असेल. पण थडग्यातून तुम्ही डोके बाहेर काढू शकणार नाही.

## बादशहा कजल अर्सलान आणि आस्थान विद्वान

कजल अर्सलान या इराणच्या तुर्की बादशहाचा एक उंचच उंच किल्ला होता. तो अलवंद डोंगराची बरोबरी करी. त्याला ना कसला धोका, ना विवंचना ! गोंडस पात्राच्या कुरळयाकेसांप्रमाणे त्याचे रस्ते गोलाकार होते. सभोवताली हिरवळ आणि मध्ये उंच किल्ला पाचूच्या तबकडीतील अंड्याप्रमाणे दिसावयाचा. मला कळले की दूरच्या एका देशातून एक थोर गृहस्थ बादशहापाशी आला. तो सत्यवक्ता जगत्पर्यटक आणि पूर्णप्रज्ञ होता. तो स्मित करून म्हणाला, " हुजूर ! हा किल्ला ऐटदार आहे खरा; पण याची शाश्वती सांगवत नाही. आपल्या अगोदर देखील येथे बरेच बादशहा आले होते. ते येथे बरेच दिवस राहिले. पण शेवटी चालते झाले. आपल्या-नंतरही बरेच बादशहा येतील व स्वतःच्या आकांक्षा तृप्त करून घेतील. आपण आपल्या वडिलांची कारकीर्द आठवा आणि आपले मन, चिंता, विवंचना यांपासून मोकळे करा ! कालचक्राने तुमच्या वडिलांना एका कोपऱ्यात बंदिस्त केले. त्यांची एका कवडीवर-देखील सत्ता चालत नाही. त्यांना आता कोणाचाच उपयोग होत नाही. देवाची कृपा तेवढी त्यांना आधार देऊ शकेल.

ऐहिक जीवन बरेचसे दुसऱ्यांच्याच तंत्राने चालते. तेव्हा शहाण्या मनुष्याने यात काय म्हणून लक्ष घालावे ? "

खुसरु बादशहाला एका वेड्याने म्हटले, " महान् जमशेद राजाचे वारस खुसरु शाह ! समजा ! जमशेद चिरंजीवी असता तर तुम्ही बादशहा कसे झाला असता !

कुबेराची संपत्ती तुला मिळाली तरी तुझ्या पदरी पडले असे एवढेच : जेवढे तू लोकांना दान केलेस आणि तेवढे तू स्वतः भोगलेस. "

अलप अर्सलानच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा गादीवर आला. त्याने बापाला तख्त आणि मुकुट यांपासून अलगद दूर ठेवले. बसण्याउठण्यासाठी देखील अपुरी पडेल एवढ्या-जागेत-खड्ड्यात त्यास बसवून दिले.

दुसऱ्या दिवशी नवा बादशहा घोड्यावरून ऐटीत मिरवत जात असताना एक चाणाक्ष दिवाण त्याला उद्देशून म्हणाला, " काय ही विचित्र कालगती ! बाप खड्ड्यात जातो आणि मुलगा घोड्यावर बसतो. जग हे असेच चालायचे. कशाचाही भरवसा नाही, कशाचा काही नेम नाही. कधी कोणी ठासून सांगू शकणार नाही की मी नक्की अमुकच आहे.

" बुढ्ढा आयुष्य संपल्यावर मान खाली टाकतो तेव्हाच कोवळा भाग्यवान पाळण्यातून डोके वर काढतो. जग हे परके आहे. त्याच्या नादी लागू नकोस ! ते गवयाप्रमाणे पैसे असतील तेथे जाणारे आहे. तुझा माशूक जर रोज एकाच्या कुशीत दिसला तर त्याच्यापासून तुला कसले सुख मिळणार ? "

" या वर्षी तरी तू गावचा पाटील आहेस ! लोकांचे कल्याण करता येईल तेवढे कर. पुढच्या वर्षी पाटील बदलणार आहे. "

## एका बादशहाची गोष्ट

न्यायी राजाचे राज्य दीर्घकाळ चालते. इराणातील गोरचा बादशहा दुष्ट होता आणि तो खेडुतांची गाढवे वेठीस धरत असे. त्यांच्यावर अतोनात ओझे लादले जाई. त्यामुळे त्यांपैकी काही तडफडून मेली.

एखादा हलका मनुष्य मोठ्या पदी चढला तर तो संतांचा काळ बनतो. मस्तवाल माणूस वरच्या मजल्यावर राहात असला तर खाली राहणाऱ्या लोकांना केर, कचरा, लघवी वगैरेचा प्रसाद मिळतो.

मला कळले की एकदा तो शिकारीसाठी म्हणून बाहेर पडला. सावजाचा पाठलाग करत तो फार दूर गेला व त्याचे लष्कर मागेच राहिले. तो एकटाच असल्याने त्याला नीट रस्ता सापडला नाही. म्हणून रात्री त्याला एका खेड्यात मुक्काम करावा लागला. तेथे त्याला एक गलेलठ्ठ, चपळ आणि वाटेल तेवढे ओझे वाहणारे गाढव दृष्टीस पडले. एक कुर्द जातीचा इसम एक दांडगा सोटा घेऊन त्या गाढवाची हाडे

मोडेपर्यंत मारत असल्याचे त्याने पाहिले. बादशहाने त्यास दटावून म्हटले, "पुरे आता ! तुला कळते की नाही ! ते गाढव बिचारे तुझ्या माराला टिकणार नाही. तू असशील मोठा पैलवान. पण तुझा जोर त्या मुक्या प्राण्याला काय म्हणून दाखवतोस ? "

बादशहाचे बोलणे त्या माणसाला रुचले नाही. तो ओरडून बादशहास सांगू लागला, "मी काही असले काम उगाच करत नाही. त्यात तुला काय कळते ? जा तू आपले काम कर.

"तुला पटेल असे बोलण्याची आवश्यकता सर्वांना नसते. थोडा विचार केला तर ही गोष्ट सहज तुझ्या ध्यानात येईल."

बादशहाला त्याचे उत्तर ऐकून राग आला. त्याने त्यास खरी हकीकत सांगण्यास फर्माविले, "मला वाटते तू बेअकली आहेस. तू प्यालेला खास नाहीस, पण पागल आहेस."

तो खेडूत हसून म्हणाला, "खामोष ! मूर्ख तूर्का, तुला पैगंबर खिजर यांची कथा माहीत नाही काय ? ते मूर्खही नव्हते आणि कोणी त्यांना दारुड्या पण म्हटले नाही. असे असून देखील त्यांनी गरिबांची नाव का नष्ट केली ? "

बादशहा त्वेषाने म्हणाला, "अरे दुष्ट प्राण्या ! खिजर यांनी असे का केले ते तुला कसे कळणार ? त्यांच्या राज्यात एक दुष्ट बादशहा होता आणि त्याच्या छळाने तेथील प्रजा त्रस्त झाली होती. त्याच्या जुलमामुळे लोकांमध्ये प्रक्षोभ झाला होता आणि सारा देशच त्याच्या विरुद्ध पेटला होता. खिजर यांनी त्या लोकांची नाव त्या दुष्ट बादशहाच्या हाती लागू नये म्हणून मोडून तोडून टाकली.

तुझ्याकडे तुटके सामान असेल तरच बरे. कारण ते चांगल्या अवस्थेत तुझ्या शत्रूंच्या हाती पडेल, तर ते तुलाच भोवणार." बादशहाचा हा युक्तिवाद ऐकून तो हुषार गावकरी हसला आणि म्हणाला, "श्रीमंत ! बघा कशी मी जिंकली ! मी काही अडाणीपणान गाढवाचा पाय मोडला नाही. मला माहित होते की आमचा बादशहा जुलमी आहे. माझे गाढव त्याच्या हाती लुळे लंगडे होऊन पडले तरच बरे. नाहीतर त्याला बादशहाचे ओझे वाहावे लागले असते.

तू काही खिजरसारखे नाव मोडून मोठेपण दाखविणार नव्हतास ! उलट कयामतीपर्यंत बदनाम होणार आहेस ! ज्याच्या मानेवर अपकीर्तीचे ओझे आहे अशा बादशहाचा धिक्कार असो. हा जुलूम साधूसंतावर नसून बादशहा स्वतः आपल्यावरच करत असतो. कारण अंतिम न्यायदानाच्या दिवशी त्याची मानगूट आणि दाढी पकडून त्याला खेचले जाणार आहे. त्याच्या मानेवर पापांचे ओझे असेल आणि शरमेने तो तोंड वरही करू शकणार नाही. मी कबूल करतो की आज गाढव त्याचे ओझे वाहून नेत आहे. पण कयामतीच्या दिवशी त्याला किती गाढवांचे ओझे वाहावे लागेल ?

" खरी गोष्ट अशी आहे की ज्या माणसाचा उल्हास म्हणजे लोकांचे प्राणसंकट त्याचे जीवन व्यर्थ होय."

" त्याच्या मौजमजेचे पाचच दिवस. पण त्यांची लोकांना फार झळ लागते."

" झोपलेला दुरात्मा जागाच झाला नसेल तर फार उत्तम. कारण त्याच्या धास्तीने लोकांच्या झोपा उडतात."

बादशहाने हे सर्व ऐकले व तो गप्प बसला. त्याने घोडा बांधला आणि खोगीर बाजूला ठेवून तो लवंडला. रात्रभर तो जागा होता व तो पडून तारे मोजत होता. त्याचा डोळा मुळी लागलाच नाही. सकाळी कोंबडा आरवला तेव्हा रात्रीची तळमळ विसरून तो उठून बसला. त्याचे सगळे स्वार रात्रभर त्याचा शोध करीत होते. पण उजाडल्यावर घोड्याच्या टापांच्या खुणा त्यांनी ओळखल्या. त्याच्या रोखाने धावत आल्यावर स्वारांना बादशहा आणि घोडा दृष्टीस पडताच ते अदबीने घोड्यावरून खाली उतरले व पायी चालू लागले. बादशहास पाहून सर्वांनी डोके जमिनीस टेकले. क्षणार्धात ते निर्जन मैदान लष्कराने गजबजून गेले आणि त्यास सागराची कळा आली.

लगेच खाशांच्या स्वाऱ्या आसनावर बसल्या आणि नाश्त्याची तयारी झाली. नाश्ता झाल्यावर सभा भरली. बादशहाला आनंद झाला होता. तितक्यात त्याला आदल्या रात्री गावकऱ्यांशी उडालेल्या चकमकीची आठवण झाली. त्याने त्यास शोधून आणण्यास फर्माविले. लष्कराने त्यास मुसक्या बांधून आणले आणि त्याची विटंबना करून त्यास तख्तापाशी उभे केले. शेवटी त्याच्या शिरच्छेदाची आज्ञा झाल्यावर मारेकरी जेव्हा तलवार उपसून त्याच्यापाशी आला, तेव्हा मात्र त्या बिचाऱ्यास काय करावे ते सुचेनासे झाले. त्याला आपण मरणार याची खात्री झाली आणि अत्यंत धीटपणाने आपल्या मनास येईल ते तो बोलू लागला. तुझ्या मानेपाशी सुरी आली तर तुझी जीभ सुद्धा त्या सुरीपेक्षा जास्त धारदार होते हे तुला माहीत नाही काय?

आपल्याला जीविताची आशा उरली नाही मग इतरांची तमा का बाळगा? म्हणून त्याने बोलण्यास सुरुवात केली. निराशेने तोंड वर करून तो म्हणाला,

" कोणत्याही जिवंत माणसाला मेल्यासारखे कसे स्वस्थ राहता येईल? तू अत्यंत दुष्ट बादशहा आहेस आणि तुझ्या छळांची दाही दिशांत चर्चा होत आहे. तुझ्या जुलमाचा बळी मी एकटाच नसून सारी प्रजाच हवालदील झाली आहे. त्यातीलच एकजण आज मारला जात आहे हे पक्के समजून घे. मला नवल वाटते ते अशाबद्दल की मी एकट्यानेच तुझ्या पापांचा पाढा वाचला म्हणून तू मला ठार करणार आहेस असे नव्हे, सगळेच जण तुला नावे ठेवतात. मग तुझ्या अंगात हिम्मत असेल तर सर्वांना ठार मार! पण जर मला एकट्याला शिक्षा देणे अयोग्य वाटले तर अन्यायाची पाळेमुळेच खोदून का टाकीत नाहीस? याला एकच उपाय आहे तो म्हणजे तू

छळ करण्याचे सोडून दे. एका असहाय्य आणि निरपराध माणसाला मारून तू कोणता पुरुषार्थ साधणार आहेस ? तू दुष्टपणा केलास तर गावोगावी तुझा जयजयकार होईल अशी खोटी आशा कशाला बाळगतोस ? तुझ्या छळाचे बळी झोपेविना तडफडत असता तुला झोप कशी लागते याचे मला आश्चर्य वाटते. लोक तुझ्यापुढे तुझी मारे तारीफ करतील. पण सभेत झालेली तुझी तारीफ खरी नव्हे. तुझ्या पुढ्यात तुझी प्रशंसा झाली तर त्याचा तुला काय फायदा ? तुझ्या पाठीमागे लोक तुझ्याबद्दल बोटेच मोडत असतात ना ! "

त्या दुष्ट बादशहाने हे त्याचे बोल ऐकले. त्याला आपल्या गाफीलपणाबद्दल खंत वाटली. त्या गावात असतानाच सुखरूपपणे पहाट उगवली या विचाराने त्याने त्या माणसाला त्या गावची पाटीलकी बहाल केली. तुझा नक्षा उतरविणाऱ्या अडाणी माणसापासून तुला जे शहाणपण शिकता येईल तेवढे सुविद्य आणि सुविचारी माणसाच्या सहवासानेसुद्धा शिकता येणार नाही.

तुला आपल्या स्वभावाची नीट पारख व्हावी असे वाटत असेल, तर तुझ्या-बद्दल तुझ्या शत्रूचे मत ऐकून घे, कारण तुझा जो खरा मित्र आहे त्याला तुझ्या कसल्याच वागण्यात दोष असा काही दिसणार नाही.

तुला वाखाणणारेच तुझे मित्र असे तू समजू नको. तुझी नालस्ती करणारे देखील तुझे मित्रच ठरतात.

जिवाभावाने तुझ्यावर प्रेम करणाऱ्या सुस्वभावी मित्रांपेक्षा आंबट चेहरेच तुझी चांगली कानउघाडणी करू शकतील !

यापेक्षा चांगली शिकवणूक तुला मिळणे कठीण. तू खरा शहाणा असशील तर एवढी सूचना तुला पुरेशी आहे.

### अब्बासी वंशाचा खलिफा मामून आणि त्याची दासी—

अब्बासी घराण्यातील मामून जेव्हा खलिफा म्हणजे इस्लामी रियासतीचा बादशहा झाला तेव्हा त्याने एक सुरेख दासी विकत घेतली. तिचा चेहरा सूर्यासारखा तेजस्वी होता आणि शरीर फुलासारखे कोमल होते. तिला पाहिल्यावर मोठमोठ्या ज्ञानी लोकांचाही संयम ढळायचा. तिची नखे लालबुंद होती. जणू काही तिने आपल्या चाहत्यांचे हृदयच बाहेर ओढून काढले होते ! प्रेमी जनांच्या जिवाला यातना देणाऱ्या तिच्या भुवयांवरील वसमा (कलप) सूर्याभोवतालच्या इंद्रधनुष्यासारखा दिसे.

समागमाच्या रात्री मात्र ती चंद्रमुखी अप्सरा मामूनला आपल्या मिठीत घेऊ देईना. मामून तिच्यावर खूप चिडला. त्याला वाटले तिला उभी चिरून मिथुन राशीप्रमाणे तिचे एकातच दोन तुकडे करावे. त्याची चुळबूळ पाहून दासी म्हणाली, " हे माझे शिर तुमच्या पुढ्यात आहे. घ्या तलवार आणि खुशाल माझे डोके उडवा. पण मला बिछान्यावर ओढून अतिप्रसंग करू नका ! "

मामून जरा सर्द पडला. त्याने हळूवारपणे विचारले, " असे का आढेवेढे घेतेस ? मी तुला आवडत नाही का ? " दासी फणकारून बोलली, " तुम्ही मला उभी चिरा किंवा माझे डोके उडवा ! मला तुमच्या तोंडाची घाण मुळीच सहन होत नाही. तलवार बिचारी एक क्षणभर दुखवेल आणि प्राण घेईल. पण तुमच्या तोंडातील दुर्गंधामुळे मला सतत जिवंतपणीच मेल्यासारखे वाटत राहील. "

त्या सुस्वभावी मामूनने तिचे बोलणे ऐकून दीर्घ निःश्वास टाकला. त्याला तिचा लिटकारा बराच झोंबला. पण त्याने योग्य उपचार करून घेण्याचे ठरविले. आणि काही दिवसांत त्याच्या तोंडातून कुसुमकळ्यांचा सुगंध दरवळू लागला.

नंतर एके दिवशी त्याने त्या सुंदरीला आपल्या बाहुपाशात घेऊन तिला सांगितले की त्याचे वैगुण्य तिने स्पष्टरीतीने सांगितल्यामुळे ती खरोखरी त्याची प्रियसखी झाली होती. !

माझ्या दृष्टीने जो माणूस मला माझ्या कल्याणाच्या मार्गातील अडथळे स्पष्ट सांगतो तोच माझा हितचिंतक होय. माझे चुकले असतानादेखील त्याने जर म्हटले, " त्यात काय झाले ! तुझेच बरोबर आहे, " तर तो माझ्यावर अत्याचारच करतो. ज्याची खोड त्याच्या तोंडावर सांगितली जात नाही, तो ती खोडच आपला सद्‌गुण समजतो. ज्याला एरंडेलच हितकारक असेल त्याला मध किंवा साखर चारू नका. वैद्याचे शहाणपण लक्षात घ्या. तो म्हणेल की जर तुला बरे व्हावयाचे असेल तर मुकाट्याने कडू गोळी गीळ. पण ती गोळी ज्ञान आणि अक्कलहुषारीने शुद्ध केलेली असावी व तिला भक्तीच्या मधाचे अनुपान असावे.

## सच्चा साधू आणि बेहूट बादशहा

मला अशी हकीकत समजली की एका साधूबद्दल एका बलिष्ठ बादशहाला दुस्वास वाटत होता. कदाचित त्या साधूने त्यास फटकळपणाने काही सुनावले असेल किंवा त्या बादशहानेच आपल्या उल्लूपणामुळे त्याच्यावर आग पाखडली असेल. तो मोठा ताकतवान बादशहा होता. त्याने त्याला कैदखान्यात डांबून ठेवले. तेव्हा साधूच्या एका मित्राने त्यास म्हटले, " तू जे बोललास ते शहाणपणाचे नव्हते, साधू लगेच उत्तरला; "

" खरा धर्म म्हणजे जे सत्य असेल ते सांगून टाकणे होय. मला कारावासाची काहीच क्षिती वाटत नाही. कारण तो काहीकाळापुरताच भोवेल. मी खरी गोष्ट अगदी खाजगीत बोललो होतो. पण ती गोष्ट बादशहाच्या कानावर गेली. "

बादशहा हसून म्हणाला, " साफ खोटे ! त्याला आपण कैदेतच कुढत मरणार याची कल्पना नसावी. "

त्याचे बोलणे ऐकून एक गुलाम साधूपाशी गेला आणि त्याने बादशहा जे म्हणाला ते त्यास सांगितले. साधूने त्यास म्हटले, " तू जाऊन बादशहास सांग की

हा संसार एका घटकेचा खेळ आहे आणि सुखदुःखे फकिराला सारखीच वाटतात. तू माझा छळ केलास तरी त्याचे मला काही वाटणार नाही. किंवा माझी मुंडी छाटलीस तर त्याचे दुःखही वाटणार नाही. तुझ्याजवळ फौजफाटा असेल किंवा तुझ्यापाशी हुकमत आणि संपत्ती असेल. माझ्यापाशी फक्त कुटुंबाचे ओझे, चिंता आणि विवंचना हीच काय ती आहेत. पण आम्ही दोघे जेव्हा मृत्यूच्या दारापाशी जाऊ, तेव्हा एका आठवड्याच्या आतच आम्हा दोघांची योग्यता सारखीच होईल. ह्या क्षणिक जीवनात इतका रमून जाऊ नकोस आणि आपला देह संसारतापात जाळू नकोस. तुझ्यापूर्वीही बरेच आले होते आणि त्यांनी आपली तुंबडी भरून जगाला आग लावली होती. तू अशा रीतीने जगावेस की लोकांनी तुझे आनंदाने नाव घेत राहावे. तू मेल्यानंतर तुझ्या थडग्यापाशी येऊन त्यांनी बोटे मोडता कामा नये. कोणतीही वाईट प्रथा प्रचलीत करू नये, कारण लोक ती प्रथा पाडणाऱ्याचा धिक्कार करतील. यातून कोणी शिरजोरपणे थयथयाट करू लागला तर थडग्याची माती त्याला थंड पाडल्याशिवाय राहणार नाही."

त्या साधूने पाठविलेल्या निरोपाने बादशहाचे पित्त खवळले आणि त्याने त्यास त्या फकिराची जीभ ओढून काढण्यास फर्मावले.

ते ऐकून सत्य जाणणाऱ्या त्या फकिराने म्हटले, "तुझ्या हुकुमाचा मला मुळीच बाऊ वाटत नाही. माझी जीभ छाटल्याने मला वाईट वाटण्याचे कारण नाही. परमेश्वराला आपण जे बोलत नसतो तेही कळते. मला उपासमार सोसावी लागेल किंवा दुसरी कसली तरी हिंसा माझ्या नशीबी येईल. पण या सर्वांचा शेवट जर हितकारक ठरावयाचा असेल तर त्यात माझे काय बिघडले?

"जर शेवट कल्याणकारक होत असेल तर माझ्या मृत्यूने तुला आनंद वाटला तरी त्यास माझी काही हरकत नाही."

## दरिद्री पहिलवान

एक पहिलवान खरोखरच फार दुर्दैवी होता. त्याला ना धड सांजचे खायला मिळे ना नाश्ता. भुकेने व्याकुळ होऊन तो बिचारा माती वाहून नेत असे. कारण कुस्तीने पोट भरत नाही ना! सदैव प्रकिकूल असलेल्या नशिबामुळे त्याच्या मनाला आणि देहाला मालिन्य आले होते. कधी तो आपल्या फुटक्या कपाळाशी भांडे आणि कधी कधी विधिलिखिताबद्दल खिन्न होई. कधी कधी तो लोक सुखात असलेले पाहून उद्विग्न होत असे. कधी कधी तो आपल्या जगावेगळ्या करंटेपणाबद्दल ढसाढसा रडेही.

"जगात मिष्टान्न आणि कोंबडी खाणारे इतके लोक असताना मला कधी भाजी भाकरीही मिळू नये? काय जगाचा न्याय आहे पाहा! माझ्या अंगावर एक चिरगूट नाही, पण श्रीमंतांच्या मांजरालाही गरम कोट असतो.

मी दैवाला किती दोष देऊ! त्याने मला ढीग संपत्ती बहाल केली असती तर त्या बेट्याचे काय वेचले असते?"

नेहमी तो कण्हत कुंथत असे. त्यामुळे त्याला हायसे वाटे. मला कळले की एके दिवशी तो जमीन खणत असताना त्याला एक बुरसटलेले हनुवटीचे हाडूक आढळले. मातीने ते बरबटले होते आणि त्या हाडाला लागलेले काही दात गळून पडले होते. ते हाडूक त्याला उपदेश करू लागले, "राजा! इतका मलूल होऊ नकोस. माती खाली गेल्यावर प्रत्येक तोंडाची दशा माझ्यासारखीच होते. मग त्याने आयुष्यभर मिठाई खाल्लेली असो किंवा स्वतःच्याच हृदयातील रक्त प्यालेले असो. कालचक्राची काळजी करू नकोस. कधी कधी ते फार खोडसाळपणा करते."

त्या पहिलवानाला हे बोल ऐकून दुःखाचा विसर पडला. जीवा! तू किती कच्चा आणि मूर्ख आहेस. तू उगाच तळमळून मरण ओढवून घेत आहेस

एकाच्या मानेवर ओझे आहे आणि मान मस्तीने आकाशाशी भिडली आहे! पण मरणाने झडप घातल्यावर दोघांचाही फज्जा उडणार आहे. कुणाचे दुःख शिल्लक राहात नाही किंवा कोणाचा आनंदही टिकून राहात नाही. अर्थात सत्कर्माचा थोडा बहुत अंश आणि नावलौकिक टिकून राहतोच म्हणा!

तख्त आणि ताज (किरीट) लोप पावतात. पण सच्चरित्र अमर राहते. तू सदा देत राहा. तुझे ऋण शिल्लक न राहो. राज्य, पदवी, संपत्ती यावर विसंबून राहू नको. कारण कित्येक महात्मे तुझ्या अगोदर होऊन गेलेले आहेत आणि तुझ्या नंतरही जन्मास येतील. सादीजवळ पैसाअडका नाही. तरी त्याने बुद्धीची हिरे माणके उधळली. तूही त्याच्याप्रमाणे तुझ्याजवळची दौलत खूप उधळ. कारण आपल्या सर्वांना या जगातून निघून जावयाचे आहे.

## मौनाचे फायदे

असाच एक दुष्ट मनुष्य होता. तो एका देशाचा बादशहा होता. त्याच्या राजवटीत लोकांना दिवस जसा काही अधुंक तिन्हीसांजेप्रमाणे वाटावयाचा. रात्री त्यांना बादशहाच्या दहशतीने झोप येत नसे.

सगळ्या सज्जनांचे दिवस चिंतेत जाऊ लागले. रात्री प्रार्थना करणाऱ्याचे हात वर जात तेव्हा काही मंडळींनी वैतागाने एका साधूजवळ जाऊन बादशहाच्या जुलमाचा पाढा वाचला.

"महाराज या तरुण बादशहाला ईश्वराचे भय वाटेल अशी शिकवण द्या."

साधू म्हणाला, "या दुष्टापाशी ईश्वराचे नाव उच्चारणे म्हणजे त्याची किंमत कमी करण्यासरखे आहे. जो मनुष्य ईश्वराची काही फिकीर करीत नसतो तो अशा संदेशासाठी नालायक आहे.

"मी अबूबक्रसारख्या भाविक सुलतानाला सत्य सांगू शकतो. सत्य सांगावे ते सज्जनांना. मूर्ख माणसाला उपदेश करण्यात मी व्यर्थ वेळ खर्चत नाही. कारण ते खाऱ्या जमिनीत बी पेरण्यासारखे आहे. ऐकणाऱ्याला उपदेश पटला नाही तर तो मलाच शत्रू समजतो. तो स्वतः दुःखी होतोच; पण मला देखील कष्टी बनवितो–"

अबूबक्र बादशहा ! न्यायाने वागण्याचे तुझे ब्रीद आहे. त्यामुळे खरे बोलणाऱ्याला धैर्य येते. हे भाग्यवान राजा ! एखादा दागिना बनवायचा असेल तर तो मेणात कोरावयाचा असतो. कठीण दगडात नव्हे. जुलूम करणारा माझ्यावर रागावला तर त्यात काही नवल नाही कारण तो चोर आणि मी फौजदार ! अबूबक्र शहा, तू न्याय आणि सच्चेपणाचा वाली आहेस आणि त्यामुळे ईश्वर तुझे रक्षण आणि संवर्धन करो. हे काही तू परोपकार समजून करत नाहीस. ही ईश्वराचीच कृपा आहे. आणि उपकार हे तुझ्या कृतज्ञतेचे गमक आहे. ईश्वराने म्हणूनच तुला सत्कार्यरत ठेवले आहे. इतराप्रमाणे तुला विषयोपभोगात, आळसात राहू दिले नाही. प्रयत्नासाठी तर सारेच रान मोकळे असते. पण यश काही सर्वांनाच मिळत नसते. तू स्वर्ग जिंकलास तो काही खटपट करून नव्हे-तर देवानेच तुझ्यामध्ये स्वर्गीय गुण ओतलेले आहेत. तुझे मन प्रसन्न राहो. तुला सुख लाभो. तुझा पाय स्थिर होवो आणि तुझी प्रतिष्ठा वाढो. तुला दीर्घायुष्य लाभो. तुझे नातलग प्रेमळ असोत. तुझी प्रार्थना मान्य होवो आणि तुझ्या मागणीला प्रतिसाद मिळो.

## सामोपचाराने झालेली कार्यसिद्धी मुत्सद्देगिरीची.

जोपर्यंत चतुराईने कार्यसिद्धी होऊ शकते तोपर्यंत शत्रूशी लढाई करण्यापेक्षा सामोपचार बरा. जर शत्रूचा मुकाबिला फौजेने करता येत नसेल, तर धन देऊन कट कटीचा दरवाजाच बंद करावा. जर त्याच्यापासून तुझ्यावर मोठी आफत येत असेल तर त्याच्यावर उपकार करून त्याचे हात बांधावे. त्याच्यावर दगडधोंड्यांदिकांचा वर्षाव करण्यापेक्षा त्याला पैशा अडक्याने न्हाऊ घाल. कारण उपकाराने तीक्ष्ण दात देखील बोथट होतात. मुखस्तुतीने आणि चतुराईने साऱ्या जगावर हुकुमत गाजविता येते. तुला दुश्मनाचे हात छाटता येत नसतील, तर त्यांचे चुंबत घे.

इस्फंदियार बादशहास नामोहरम करून टाकणारा भीम पराक्रमी रुस्तम देखील मुत्सद्देगिरीने वश करता येतो. पुढे मागे आपल्याला सवडीप्रमाणे शत्रूची चामडी सोलता येईलच. पण त्या आधी त्याला प्रेमळ मैत्रीने मोहीत करावे. दिसायला साधा असलेल्या माणसाशीही जपून वागावे. कारण अनेक थेंबांमुळेच महापूर ओढवतो. तुला शक्य होईल तोपर्यंत कपाळाला आठ्या घालू नकोस. तुझा शत्रू किरकोळ असला तरी आपलासा कर.

ज्याला मित्रापेक्षा शत्रूच अधिक असतात त्याने आपल्या शत्रूला खूष ठेवावे. मग मित्र नाराज झाला तरी चालेल.

आपल्यापेक्षा बलिष्ठ फौजेशी झुंज देऊ नये. तरवारीच्या धारेवर बुक्की मारणे मुर्खपणाचे होय. आता तू जरी बलिष्ठ असलास, तरी आपल्यापेक्षा कमी ताकत असलेल्यांशी दांडगाई करण्यात कोणता पुरुषार्थ आहे ? तू हत्ती किंवा वाघासारखा बलिष्ठ असलास, तरी माझ्यामते लढाईपेक्षा शांतीनेच कार्य साधणे चागले. मात्र सगळीकडून कोंडमारा झाल्यावर मुद्दाम प्रवृत्त होणे रास्तच आहे.

तुझ्या शत्रूला शांती हवी असेल तर तू त्याचा अव्हेर करू नकोस. पण तू टक्कर देऊ इच्छित असशील तर तू घोड्याचा लगाम खेचू नकोस.

त्यानेच जर युद्धाची वाट बंद केली तर तुझा रुबाब आणि वर्चस्व अधिकच वाढेल.

त्याने जर युद्धास आव्हान दिले तर कयामतीच्या दिवशी परमेश्वर तुला मनुष्यवधाबद्दल जाब विचारणार नाही. कोणी खोडसाळपणा केला तर लढल्याशिवाय राहू नकोस कारण अशा वेळी शत्रूची गय करणे पाप ठरते. तू जर नीच माणसाशी गोडीगुलाबीने वागलास तर त्याचा धीटपणा आणि मगरुरी वाढतच जाईल. पण जर तुझा शत्रू अजिजीने तुझ्या दाराशी आला, तर तुझ्या मनातला आणि डोक्यातला राग यांना गचांडी दे. तुझ्या शत्रूने अभयदान मागितले, तर तू मन मोठे कर, आणि त्यास माफी दे. पण त्याच्या फसवेपणाबद्दल जागरूक राहा. अनुभवी माणसांचा सल्ला दुर्लक्षू नकोस. कारण वृद्ध माणसांना कित्येक वर्षांचा अनुभव असतो.

तरुण तलवारीने आणि स्थविर चतुराईने खोल रुतलेल्या संकटाचा मुळासकट नायनाट करतात.

लढतानादेखील पळ काढण्याची तरतूद करून ठेव. कारण जय कोणाचा होईल याचा नेम नसतो. जर शत्रूच्या लष्कराने पोबारा केला, तर तू एक्कलकोंडेपणाने वावरू नकोस. घात होईल !

तू किनाऱ्यावर असशील, तर मुकाट्याने पलायन कर. जर तू शत्रूच्या सैन्यामध्ये सापडला असशील, तर त्यांच्या लष्कराचाच पोषाख धारण कर.

तुझे लष्कर हजारोंनी आणि शत्रू शेकड्यानी असले तरी रात्रीच्या वेळी शत्रूच्या हद्दीत मुक्काम ठोकू नकोस.

रात्रीच्या अंधारात पन्नास स्वारदेखील दडी मारून पाचशे माणसांइतका धुमाकूळ घालू शकतील. रात्रीच्यावेळी कूच करण्याचे ठरविलेस, तर शत्रू कोठे दडून बसलेला नाही याबद्दल प्रथम खात्री करून घे. दोन लष्करांपैकी एक जर दिवसभर चालून आलेले असेल, तर त्याच्यात लढण्याची ताकत नसते. तसल्या थकलेल्या लष्करावर तू खुशाल चाल करून जा. कारण त्या मूर्ख लष्कराने आपलाच घात करून घेतलेला असतो. तू लढाई जिंकल्यावर तुझा झेंडा उंच करून फडकावत ठेव. कारण तुझा झेंडा खाली आलेला पाहून शत्रूला हल्ला करण्याची बुद्धी सुचेल. जेव्हा शत्रू पळ काढतो, तेव्हा त्यांचा फार वेळ पाठलाग करण्यात अर्थ नाही. कारण त्यामुळे तू कदाचित आपल्याच लष्करापासून फार पुढे जाशील.

तुला रणधुमाळीचे ढग दिसू लागले आणि तुझ्याभोवती भाले-तलवारींचा गराडा पडला, तर अशा वेळी लूट करण्यासाठी तुझी फौज रवाना करू नकोस.कारण

एकदा राजाचा तळ हलल्यावर सर्वच रिते होऊन जाते. लढाई जुंपली असताना लष्कराने बादशहाची राखण करण्याशिवाय दुसऱ्या कसल्याही उलाढाली करू नयेत.

**शांतेतच्या काळी लष्कराची महती आणि ख्याति ऊर्जित अवस्थेत ठेवावी.**

ज्या बहाद्दराने एकदा आपले शौर्य गाजविले त्याला अनुरूप बढती बहाल करावी. त्यामुळे तो दुसऱ्यांदाही जीव पणास लावून लढेल. त्याला माजूज वा रानटी टोळचांची काहीच दिक्कत वाटणार नाही. सैन्याला सर्व सुखसोयी देऊन खूष ठेव, म्हणजेच ते संकटकाळी मन लावून लढेल. शिपायांचा गौरव आताच कर! शत्रूने रणशिंग फुंकल्यावर तुला तो करता येणार नाही. ज्या सैन्याला रसद मिळत नाही, त्याचे मन रमत नाही.

आपल्या राज्याच्या सीमांचे लष्कर ठेवून शत्रूच्या हल्ल्यापासून रक्षण कर आणि लष्कराला पगार देऊन खूष ठेव. लष्कर सुखासमाधानात असेल तरच बादशहाला शत्रूवर जय मिळविता येईल.

ज्याला आपले शिर पणाला लावून पोट भरावे लागते, त्याला हाल सोसावे लागणे न्यायसंगत नव्हे.

शिपाई पगार खिशात घालू शकला नाही तर तो हात तलवारीवर कसा नेईल? प्रसंग हातघाईचा आणि पैसा बेपत्ता असेल, तर बिचाऱ्या शिपायाने मैदानावर मर्दुमकी कशी गाजवावी?

**अनुभवी लोकांना उत्तेजन द्यावे.**

बहाद्दराशी झुंजायला बहाद्दरच पाठवावेत. वाघांशी दोन हात वाघच करू शकेल. अनुभवी माणसांच्या सल्ल्याने कार्य करावे. कारण म्हातारा लांडगाच चांगली शिकार करतो. महान योद्धा तरुण असेल तर भिण्याचे कारण नाही, पण अनुभवी वृद्धांच्या बाबतीत जपून वागावे. जे तरुण हत्तीला सहज लोळवितात आणि वाघाला मुसक्या बांधून आणतात ते देखील म्हाताऱ्या कोल्ह्याचा कावा ओळख शकत नाहीत. अनुभवाला अनुसरून बुद्धी प्रगल्भ होते. वृद्ध माणूस सुखदुःख, यशापयश इत्यादी द्वंद्व अनुभवलेला असतो. कर्तबगार आणि भाग्यवान तरुण कधीह- वृद्धांच्या सल्ल्याची अवहेलना करीत नाहीत. तुला जर तुझे राज्य वैभवशाली बनवावयाचे असेल, तर मोठमोठ्या कामगिऱ्यांवर अननुभवी तरुणांची नेमणूक करू नकोस. ज्याने प्रत्यक्ष युद्धात सक्रिय भाग घेतलेला असेल त्याचीच सरसेनापती म्हणून नेमणूक कर. शिकारीचा अनुभव असलेले कुत्रे चित्त्यालासुद्धा भीक घालीत नाहीत. त्या उलट ज्या वाघाला कधी लढावेच लागले नसेल तो साध्या कोल्ह्याला देखील दचकून वागतो. जे मूल शिकारीच्या जंगलात वाढते ते प्रत्यक्ष लढण्याचा प्रसंग आल्यावर मुळीच न बावरता सुचेल तसा प्रतिकार करते.

तात्पर्य असे की ज्याला रणभूमीवर मर्दुमकी गाजवायची असेल त्याला कुस्ती शिकार आणि नेमबाजी सतत करावी लागते. जो लाडात वाढलेला असतो, त्याला रणशिंग वाजल्याबरोबर अंगात कापरे भरते.

ज्याला दोन माणसांनी उचलून घोड्यावर बसवावे लागते तो एका चिमुरड्या पोराला हार गेला तर त्यात काय नवल ? जर तू कोणाला लढाईतून पळ काढताना पाहिलेस आणि त्याला शत्रूने ठार केले नसले तरी तू त्याचा वध कर. जो युद्धाच्या दिवशी लढायला बाहेर पडत नाही त्याच्यापेक्षा हिजडा पत्करला.

× × ×

इराणातील एक प्रसिद्ध पहिलवान गुर्गान याने आपल्या मुलाला किती सुरेख उपदेश केला पाहा ! त्याचा मुलगा बाण, भाता वगैरे युद्धसामग्री घेऊन निघाला होता. त्याला तो म्हणाला,

"तू जर बायांप्रमाणे पळ काढणार असशील तर तू रणभूमीवर जाऊच नकोस. म्हणजे लढवय्यांची अब्रू तरी वाचेल. जो मैदानातून पोबारा करतो, तो स्वतः तर मरतोच, पण गाजलेल्या शूरांचादेखील बळी घेतो. युद्धात आपले सर्वस्व पणाला लावलेले असे दोघे मित्रच बहाद्दरी गाजवू शकतात, की जे एकाच विचाराचे असतात, जे एकत्र खाणेपिणे करतात आणि ज्यांची भाषाही एकच असते. असेच दोघे मित्र मन लावून लढतात. शत्रूच्या कैदेत असताना आपला भाऊ पळून जाणे ते लाजिरवाणे समजतात.

पण तुला असे आढळेल की दोघा मित्रांत एकोपा राहात नाही; तेव्हा मात्र पलायन शहाणपणाचे ठरते.

## विद्यावंतांची कदर करावी

बादशहा ! तू गरिबांचा वाली आहेस. तरी तू शूर शिपाई आणि खाजगी चिटणीस या दोन प्रकारच्या सेवकांची विशेष काळजीने निगा राखत जा. जो मुत्सद्यांचे आणि लढवय्यांचे हित करतो, त्या बादशहाचाच विजय होतो. ज्यांना तलवार आणि लेखणी या दोहोतून एकही पेलता येत नाही, तो दगावला तरी फार वाईट वाटून घेण्याचे कारण नाही. तलवारबहाद्दर आणि लेखणीबहाद्दर या दोघांचीही कदर केली पाहिजे. गवयाची बायको काय पराक्रम करू शकेल ? शत्रू स्वारीच्या तयारीला लागला असताना तू प्रेमपाशात आणि संगीत मैफलीत गढून जाणे योग्य नव्हे. मोठमोठे श्रीमंत लोक खेळत बसले आणि हरल्यावर भिकारी झाले.

## शत्रूशी हुशारीने वागावे

शत्रूशी लढाईचा प्रसंग आला तर जपून वागावे असे मी म्हणत नाही. उलट त्याने समझोत्याचा निरोप पाठविला, तरच तू जपून वागावेस. कित्येक लोकांनी सकाळी तहाची बोलणी केली आणि रात्री झोपल्यावर हल्ला केला.

छावणीतील शिपाई चिलखत घालूनच झोपी जातात कारण गादी फक्त स्त्रियांना लागते. म्हणून तंबूतील शिपायाने बायका जशा कपडे काढून झोपतात तसे शस्त्रास्त्रे शिरस्त्राण काढून ठेवून झोपू नये. शस्त्रास्त्रे बनविताना गुप्तता राखावी. कारण शत्रूदेखील लपून छपून हल्ला करतो. ज्यांना सर्व गोष्टींचा अनुभव असतो, तो खबरदारीचे महत्व ओळखतो. लष्कराच्या तळाभोवती हेरांचे जाळे पसरविल्याने जणू शिशाची भिंत बांधावी त्याप्रमाणे तळ सुरक्षित राहातो.

## शहाणपण आणि मुत्सद्देगिरीने शत्रूपासून बचाव करून घ्यावा.

आपल्यापेक्षा कमी हिंमतीच्या दोघा शत्रूंशी वागताना निश्चित राहणे शहाणपणाचे नव्हे. कारण जर त्या दोघांमध्ये दिलजमाई झाली तर ते दोघे तुमच्यापेक्षा कमी दर्जाचे राहणार नाहीत; उलट तुम्हाला भारीच पडतील. त्यांपैकी एकाला लालूच देऊन आपल्या नादी लावावे आणि दुसऱ्याला एकटे पाडून ठार करावे. जर तुमच्यापेक्षा बलिष्ठ शत्रूशी गाठ पडली, तर मुत्सुद्देगिरीच्या शस्त्राने त्याला खतम करावा ! तुमच्या दुष्मनाच्या दुश्मनाशी संधान बांधा. म्हणजे त्याला आपला अंगरखादेखील बोचू लागेल. शत्रूच्या सैन्यात दुही माजली की आपली तलवार म्यानांत घालून टांगून ठेवा. दोघा लांडग्यांमध्ये जुंपली की मेंढ्यांनी खुशाल चरत राहावे. जेव्हा शत्रू आपल्या वैऱ्याशी लढत असेल, तेव्हा तू दोस्तांच्या मेळाव्यात निश्चित राहा.

## सामोपचाराने शत्रूस नरम करणेच चांगले

तू लढण्यासाठी तलवार उपसत असतानाच समझोत्याच्या शक्यतेची खात्री करून घे. मोठमोठे जगज्जेते देखील बाहेरून लढण्याचा आवेश दाखवितात. पण मनातून त्यांना समझोताच हवा असतो. शूर माणसाचे मन आकर्षून घेतलेस तर तो चेंडूसारखा तुझ्या पायाशी येईल. युद्धात जर कोणी सरदार तुझा कैदी बनला तर त्याची कत्तल करण्याची घाई करू नकोस. कारण उरल्यासुरल्या सैन्यातून देखील एखादा सरदार तुमच्या कह्यात येईल. शिवाय तू जर घायाळ कैद्याला ठार केलेस, तर तुझ्या शिपायांपैकी जे शत्रूच्या कैदेत पडले असतील त्यांना तू कसा परत मिळवशील ?

बंदिवानावर अत्याचार करणाऱ्याने आपणही कधी काळी बंदीवान होऊ हे लक्षात ठेवावे. अर्थात जो स्वतः बंदिवान झाला असेल तो इतर कैद्यांवर माया करतोच.

शरण आलेल्या सरदाराशी तू गोडीने वागलास तर दुसरा एखादा सरदारही तुला शरण येईल.

तू शंभरवेळा स्वाऱ्या करून रक्तपात करण्यापेक्षा कोणासही कळणार नाही अशा रीतीने दहा जणांची मने जिंकलीस तर तुझा अधिक फायदा होईल.

## शरणागत शत्रूशी जपून वागावे

तुझ्या शत्रूंपैकी कोणी जर तुझा मित्र बनला, तर तू त्याच्या फसवेपणाबद्दल खबरदार असावेस. त्याला आपल्या आप्तजनांची आठवण होत असताना तू सूडबुद्धीने वागलास, तर त्याचे मन दुखी होईल. शत्रूच्या गोड बोलण्याने हुरळून जाऊ नकोस. कारण त्या मधात विषाचा थेंबही असेल.

जो मनुष्य आपल्या मित्रांशी देखील शत्रूप्रमाणेच खबरदारीने वागतो, तोच आपल्या शत्रूपासून आपला प्राण सुरक्षित ठेऊ शकतो. जो साऱ्या जगालाच खिसेकापू समजून वागतो, त्याचीच मालमत्ता सुरक्षित राहते.

ज्या सैनिकाला अधिकाऱ्याचा हुकूम धाब्यावर बसविण्याची खोड असते, याला शक्यतोवर कामावर नेमू नकोस. त्याला जर आपल्या वरिष्ठांची काहीच क्षिती वाटत नसेल तर तो तुझे काम कसे ऐकेल ? त्याने आणाभाका घेतल्या तरी त्यावर विसंबू नकोस; उलट त्याच्यावर पाळत ठेवण्यासाठी हेराची नेमणूक कर. त्यातून जर कोणी नवशिक्या निघाला, तर त्याला पुष्कळ वाव दे. नाहीतर तो तुझ्या जवळपास देखील येणार नाही.

तुझ्या हाती जर दुसऱ्या कोणाचे राज्य आले तर सर्वप्रथम कैदेत असलेल्यांची मुक्तता करून त्यांच्यावर राज्य सोपव. कारण कैदेतून सुटलेला मनुष्य त्याला छळणाऱ्यांचे मुडदे सहज पाडील. मुलुखगिरीत तुला लाभलेल्या राज्यातील प्रजेस संतुष्ट ठेव. कारण शत्रूने बंडाळी केली, तर प्रजाच त्याचा समाचार घेईल. याउलट जर तू प्रजेलाच छळशील तर तुझ्या शत्रूला दरवाजा उघडा आढळेल. तू शत्रू वेशीत आला आहे की नाही एवढेच पाहू नकोस; प्रथम शत्रूचे साथीदार गावातच आहेत की काय ते पाहा.

शत्रूशी प्रथम हिकमतीच्या बळावर मुकाबला करावा. मसलत पक्की कर आणि आपला मनसुबा लपवून ठेव. आपली गुपिते वाटेल त्याला सांगत सुटू नकोस कारण हेर सगळीकडेच पसरलेले असतात.

अलेक्झंडर जेव्हा पूर्वेकडील देशांवर स्वारी करीत असे, तेव्हा त्याच्या तंबूची तोंडे पश्चिमेकडे दिसत. वेहमन बादशहाने जेव्हा झबलिस्तानवर स्वारी केली, तेव्हा गोंगाट डाव्या बाजूकडे होत होता आणि फौज उजव्या बाजूने पुढे सरकली. तुझ्या मनसुब्याचा दुसऱ्या कोणाला सुगावा लागेल तर धिक्कार असो तुझ्या बेअकलीपणाचा.

एरवी तू दयाशील राहून लढाई टाळलीस तर तू दुनियेचाच बादशहा होशील. जर एखादे काम हसत खिदळत होऊ शकेल, तर ते शिरा ताणून चेहरा लालबुंद करून धापा टाकत करण्यात कसले शहाणपण आहे ?

तुला जर आपले मन दुःखी होऊ नये असे वाटत असेल, तर तू पीडितांच्या मनावरील दुःखाचे ओझे हलके कर. फौजफाटा अफाट असल्याने काही यश पदरी पडतेच असे नाही. लवकर जा आणि दलितांचा दुवा पदरात पाडून घे.

तुझ्यावर भिस्त ठेवून राहणाऱ्या दीनांचा दुवादेखील दांडग्या माणसांच्या दंडापेक्षा अधिक उपयोगी पडेल. जो दरवेशाचा दुवा मिळवील तो फरीदून सारख्या पराक्रमी बादशहाला देखील जुमानणार नाही.



□□□

अध्याय २

# परोपकार

तू शहाणा असशील तर कोणत्याही गोष्टीच्या बाह्यस्वरूपाकडे न पाहता तिच्या आशयाकडे लक्ष दे. कारण चेहरेपट्टीला किंमत असते ती भावामुळेच. ज्याच्यापाशी चैतन्य आणि सौजन्य नाही त्याच्या चेहऱ्यालाही काही अर्थ नाही.

ज्याच्या प्रभावामुळे प्रजाजन रात्री गाढ झोपी जाऊ शकतात, त्या राजाला कबरीत चिरनिद्रा प्राप्त होते.

आपले दुःख तू एकटा आपल्या हयातीतच भोग, कारण तू मेल्यावर तुझे आप्तइष्ट कष्टी होतील ते तू मेल्याबद्दल नव्हे तर त्यांना मिळणारा वाटा बंद झाला म्हणून.

श्री आणि संपदा आपल्या हाती असतानाच त्यांचे दान करावे. कारण ती गेल्यावर आपली आज्ञा कोणी मानणार नाही.

आपण दुःखाने होरपळून जाऊ नये असे वाटत असेल, तर तू पीडित जनांकडे दुर्लक्ष करू नकोस. तुझा खजिना आपल्याच हाताने उधळून टाक, कारण उद्या त्याची चावी तुझ्याकडे राहणार नाही.

तू आपली शिदोरी स्वतःबरोबर घेऊन जा, कारण तुझी बायकामुले तुझ्या पश्चात् तुझ्यासाठी काहीच करणार नाहीत.

जो आपल्या पुण्याची दौलत आपल्या बरोबर घेऊन परलोकी जातो, तोच धन्य. आपली पाठ नेमक्या जागी खाजवायची असेल तर आपल्या नखापेक्षा जास्त कोण उपयोगी पडेल ? (आपले दुःख आपल्यालाच कळते. )

तुझ्याजवळ जे काही असेल ते दुसऱ्याच्या हातावर ठेव, कारण उशीर झाला तर तुला पस्तावावे लागेल.

गरिबाची लाज राखण्यासाठी त्यास वस्त्रदान केलेस, तरच खुदा तुझे अंग झाकून तुझी अब्रू राखील.

तुझ्या दारी आलेल्या परदेश्याला रिकाम्या हाताने घालवून देऊ नकोस ! ईश्वरकृपेने तुला आशाळभूतपणे दारोदार फिरण्याची पाळी न येवो.

मोठी माणसे गरजवंताला मायेने वागवितात, त्याचे कारण हे की असहाय्य स्थितीत दुसऱ्यांच्या तोंडाकडे पाहण्याची पाळी आपल्यावरही येईल अशी त्यांना भीती वाटत असते. म्हणूनच कधीतरी आपल्याला देखील कुणी विचारणार नाही या जाणिवेने तू सुद्धा निर्धन आणि अगतिक माणसाची विचारपूस कर.

जे रंजले गांजले असतील त्यांच्या मनाला बरे वाटेल असे काही तरी कर. तू स्वतः ज्या दैन्यास तोंड दिले असशील ते आठव.

तुझ्यावर मागण्याची पाळी आली नाही याबद्दल देवाचे आभार मानण्यासाठी तरी तुझ्या दारी आलेल्याला हाकलून देऊ नकोस.

**अनाथांवर माया असू दे**

ज्याच्या डोक्यावर पितृछाया नसेल त्याच्यावर मायेचे छत्र धर. त्याच्यावर मेहेरनजर करून त्याला बोचणारी शल्ये काढून टाक. तो कोणत्या अवस्थेत होता व आता कसल्या चिंतेत आहे ते तुला कळावयाचे नाही. जर मुळेच नसतील, तर झाडाला टवटवी येणार कोठून ?

जर कोणी अनाथ बालक दीनमुद्रेने तुझ्यासमोर उभा असेल, तर तू त्याच्या-देखत आपल्या लाडक्या मुलाचा पापा घेऊ नकोस. कारण त्याला आपल्या बापाची आठवण होऊन तो दुःखी होईल.

अनाथ मुलगा रडत असेल तर त्याला कोण गोंजारील ? तसेच तो रुसला फुगला तर त्याचे कोडकौतुक कोण करील ?

पोरक्या जीवांना कधी अश्रू ढाळावे लागणार नाहीत याबद्दल खबरदारी घे. कारण देवाचे उच्चासन जे " अर्श " ते अनाथांच्या आक्रोशाने डळमळते. त्यावर आपली कृपादृष्टी ठेवून आसवे पूस व उदार अंतःकरणाने त्याच्या चर्येवरील दीनता दूर कर. त्याच्या डोक्यावरील छत्र नाहीसे झाले असेल तर तुझ्या सावलीत त्याला घे ! माझ्या वडिलांचा आधार मला होता त्या वेळी मला वाटे की माझ्या डोक्यावर जणू किरीटच आहे. माझ्या अंगावर माशी बसली तरी कित्येक लोक बेचैन होत असत.

पण आता ! आता तर माझ्या हातात बेड्या घालून मला कोणी घेऊन जात असले तरी माझ्या मित्रांपैकी कोणीही माझ्यासाठी धावून येणार नाही. मला लहान मुलांबद्दल कळवळा वाटतो, त्याचे कारण माझ्या लहानपणीच माझ्या डोक्यावरील पितृछाया लुप्त झाली.

## १. सत्कर्माचे फळ

खुजंदाचा एक सरदार एका पोरक्या पोराच्या पायातून काटा काढीत असल्याचे एकाने स्वप्नात पाहिले. तो सरदार म्हणत होता की, " मी या सुंदर स्वर्गीय उपवनात आहे ते त्या काटा काढण्यामुळेच. मजवर ही जो सुंदर पुष्पवृष्टी होत आहे तीही त्यामुळेच ! "

दुसऱ्यावर कृपा करण्यात तू सहसा मागेपुढे पाहू नकोस. तू दुसऱ्यावर कृपा करशील तर तुजवरही श्रेष्ठ लोकांची कृपा होईल. कोणावर काही उपकार केल्याबद्दल स्वयंमन्य होऊन मी मोठा भाग्यवान व दुसरे दीन दरिद्री आहेत असे समजू नकोस

कारण खडतर कालचक्राची तीक्ष्ण तलवार काही इतक्यातच आवरली गेली आहे असे नाही.

तुझ्या संपत्तीमुळे हजारो लोक तुला आशीर्वाद देण्यास सरसावतील व कित्येक तुझ्यापासून काही प्राप्त होण्याची आशा बाळगतील. पण तुला कोणापासून काही आशा बाळगावी लागत नाही, याबद्दल ईश्वराचे आभार मान.

उपकार हा थोरांचा गुण आहे असे म्हटले जाते, ते चूक आहे. तो तर खरोखर पैगंबरांचा नेहमीचा परिपाठ आहे.

## २. पैगंबरांच्या गुणांचे वर्णन

पैगंबर इब्राहीम खलीलुल्ला स्वभावाने कनवाळू होते. कोणी पाहुणा आल्याशिवाय ते सकाळचे काही खात नसत. त्यांच्या अन्नसत्रात सात दिवस कोणीही वाटसरू न आल्यामुळे ते बाहेर गेले व जंगलात इकडे तिकडे फिरून बारकाईने तपास करू लागले. त्यांस एकाकी व अती वार्धक्यामुळे मस्तक व केस शुभ्र झालेला असा एक मनुष्य आढळला. तेव्हा दानशूरांच्या शिरस्त्याप्रमाणे त्याचे स्वागत करून त्यांनी त्यास जेवणाचे आमंत्रण दिले.

तो म्हातारा 'बरे' म्हणून लगबगीने चालू लागला. कारण त्याला त्या पूज्य पैगंबरांचा स्वभाव माहीत होता.

घरी येताच त्यांच्या सेवकांनी त्या परधर्मी वृद्धास मोठ्या सन्मानाने बसवून त्याच्या आज्ञेनुसार भोजनाची तयारी केली. ज्या वेळी तेथे असलेले सर्व लोक भोजनास बसले, तेव्हा सर्वांनी बिस्मिल्ला म्हणण्यास सुरुवात केली. पण त्या म्हाताऱ्याच्या तोंडून काही शब्द निघालेला ऐकू आला नाही.

तेव्हा पैगंबर म्हणाले, "अरे! तू तर अती जरठ. पण वृद्ध लोकास शोभेल अशी सद्धर्मनिष्ठा व शुचिता मला तुझ्यात दिसत नाही. रोजचे अन्न खाताना अन्नदात्याचे नाव घ्यावे हे तुला ठाऊक नाही काय?" त्यावर तो म्हणाला "आजुरप्रणीत अग्निउपासक सनातन धर्माशिवाय दुसऱ्या कोणाचाही धर्ममार्ग मी मानीत नाही."

यावरून त्या पुण्यश्लोक पैगंबरास कळले की हा एक अती दरिद्री व वृद्ध अग्निपूजक गबर (पारसी) आहे. तेव्हा त्याने त्या परधर्मी वृद्धास तुच्छ समजून हाकलून दिले कारण धर्मनिष्ठांना पाखंडी लोकांचे वावडे असते.

हे पाहून त्या सर्वश्रेष्ठ परमेश्वराकडून एक देवदूत संतप्त होऊन त्या पैगंबराचा धिक्कार करत आला व म्हणाला, "अरे इब्राहीम! ईश्वराने याला शंभर वर्षेपर्यंत अन्न व प्राण दिले असता त्याचा तुला एका क्षणात का वीट आला? तो अग्नीपुढे लोटांगण घालतो म्हणून तू आपला पालनकर्त्याचा हात त्याच्या पुढून मागे का घ्यावास? तो आता परमेश्वराच्या नावाने रडतो, ओरडतो आहे व सर्वांगावर व

डोक्यात राख घालून घेत आहे. याकरिता तू जाऊन त्या वृद्धाला परत बोलावून आण व परमेश्वराच्या वतीने त्याचे स्वागत कर."

हे ऐकून पैगंबर त्याचेकडे गेले व त्यांनी त्याला त्या जंगलातून घरी बोलावले. तो जवळ आला तेव्हा ते त्याला म्हणाले, "तू धन्य आहेस. परमेश्वराने तुझी प्रार्थना मान्य केली आहे. परमेश्वरानेच मला तुजकडे पाठविले आहे."

त्या वयोवृद्धाने ही गोष्ट ऐकताच शहादतचा कल्मा म्हणून मुसलमानी धर्माचा स्वीकार केला.

परमेश्वराची लीला अगाध आहे. त्याच्या कृपेनेच तो वृद्ध मुसलमान झाला व त्याच्या दैवयोगानेच पूर्वी जरी तो दरिद्री होता तरी आता धर्मविषयात बादशहांच्या बरोबरीचा झाला.

### सज्जन व दुर्जन यांच्यावर उपकार

अमुक एक मनुष्य लुच्चा व तमुक ढोंगी व लबाड म्हणून तू उपकाराच्या थैलीचे तोंड बंद करू नकोस. विद्या व थोरवी अन्नाकरिता विकणारा विद्वान मनुष्य स्वत:चेच नुकसान करून घेतो.

शहाण्याने ऐहिक गोष्टीच्या बदल्यात कुराणवचने विकणे हे कसले शहाणपण? पण तू अशा लोकांपासून धर्म विकत घे. कारण स्वस्त भावाने विकणाऱ्यांपासून शहाणा मनुष्य आनंदाने माल विकत घेतो.

## ३. सद्भक्त व ढोंगी

एका कवीने एका भाविक गृहस्थास म्हटले, "मी फारच दुस्तर चिखलात फसलो आहे. कारण एका लुच्च्याचे मला दहा दिरम (पावली) देणे आहे. त्यातील एकेक दांग (आणा) म्हणजे दहामणाइतका जड वाटतो. त्यामुळे सर्व रात्र मी चिंतेत असतो. दिवसा तो सावलीप्रमाणे माझा पाठलाग करतो. माझ्याकडे त्याच्या वरचेवर येण्याने जसे माझ्या घराचे दार खिळखिळे झाले आहे तसेच त्याच्या बोलण्याने माझे अंत:करणही व्यथित झाले आहे. तो जन्मल्यापासून त्याला भगवंताने 'त्या' दहा दिरमाशिवाय काहीच दिलेले नसावे! आता धर्माच्या बाबतीत म्हणावे तर तो शुंभच आहे! "ला यन्सरफु" (तू हालू नकोस*) या कुराणाच्या अध्यायाशिवाय त्याला काही येत नाही. (म्हणजे तो माझ्या घरासमोरून हालत नाही!) दिवस उगवल्यावर या इसमाने माझ्या घरी येऊन कडी वाजविली नाही, असा एकही दिवस गेला नाही. कोणीतरी उदार मनुष्य यावा व त्याने त्याला पैसे देऊन माझी सुटका करावी, असे मला सारखे वाटत असते."

त्या कनवाळू माणसाने त्याचे बोलणे ऐकून त्याच्या अस्तनीत दोन अशरफीची

* याचा अर्थ "तू खर्च करू नको" असा देखील करता येईल.

नाणी ठेवून दिली. ती मिळताच त्या मनुष्याचा चेहरा नवोदित सूर्यासारखा प्रसन्न झाला व तो चटकन तेथून निसटला.

तेव्हा एक जण त्या साधुपुरुषास म्हणाला, "अहो! हा कोण आहे हे तुम्हाला ठाऊक नाही काय ? असला मनुष्य मेला तरी कुणी रडू नये! याचा भीक-मागेपणा कुबेरालाही कंगाल बनवील. याच्या युक्त्या अशा आहेत की तो अबुजैद-सारख्या बुद्धीबळपटूला सहज हरवील!"

साधू चिडून म्हणाला, "पुरे कर! तुला कसे बोलावे हे कळत नाही. तू फक्त ऐकून घ्यावेस! याच्याबद्दल माझे मत खरे ठरले, तर मी याची चारचौघात लाज राखली असे समज. जर त्याने लबाडी केली असेल तर माझी फजिती झाली असे समजू नकोस. कारण असल्या पाजी माणसापासून माझी अब्रू तरी वाचली! चांगल्या आणि वाईट अशा दोन्ही प्रकारच्या माणसांना दान दे. चांगल्याला दिल्याने पुण्य मिळेल. वाईटाला दिल्याने ब्याद दूर होईल. विद्वानांच्या आणि सज्जनांच्या सहवासात शहाणपणा शिकणारा मनुष्य धन्य होय!"

तुझी बुद्धी तरतरीत असेल व तू चाणाक्ष असशील तर "सादी" काय सांगतो ते ऐक. कारण तो केवळ हितोपदेश करतो. अमकीचे डोळे कसे आहेत, तमकीच्या बटा कशा आहेत, कोणाच्या कानाची लव कशी, कोणाचा रंग कसा यासारख्या गप्पा तो कधी मारत नाही.

## ४. कृपण पिता व उदार पुत्र

एक गृहस्थ मेला व कृपणपणाबद्दल त्याचे नाव मागे राहिले. त्याला एक विद्वान व उदार अंतःकरणाचा मुलगा होता. तो कृपण लोकांप्रमाणे द्रव्याविषयी घट्ट मुठीचा नसून मुक्तजनांप्रमाणे त्याविषयी अगदी बेपर्वा होता. दरवेश्यांच्या गर्दीमुळे त्याच्या घरात व पांथस्थांमुळे त्यांने बाधलेल्या धर्मशाळेत प्रवेश मिळत नसे. स्वपरजनांची संतुष्ट मने तो मिळवीत असे. पित्याप्रमाणे द्रव्य जमा करून ते पुरून ठेवीत नसे.

त्याची कानउघाडणी करण्याच्या हेतूने एकाने म्हटले, "अरे उधळ्या गृहस्था, आहे नाही ते सर्व एकदम नाहीसे करू नकोस. खळे जमा होण्यास एक वर्ष लागते. ते एकदम जाळून टाकणे हा काही शहाणपणा नव्हे. गरिबीच्या वेळी तुला समाधानाने राहता यावे यासाठी भरभराटीच्या वेळी हिशोबीपणा दाखव.

### याविषयी दूरदृष्टीचे उदाहरण सांगतो, ते ऐक

"एका खेड्यातील पाटलिणीने (अमीरजादी) आपल्या मुलीस एकदा सदुपदेश केला. तो असा की सुबत्तेत गरिबीच्या काळासाठी सामानाची सिद्धता करून ठेव. नेहमी पखाल व घागर भरून ठेव. कारण गावात कालव्याचे पाणी सदा वाहातच असते असे नाही.

"या जगात द्रव्याने परमार्थ साधता येतो. पैशाने पिशाचाचे मनगटही मुरगळता येते. रिकाम्या हाताने काहीच मनोरथ साधत नाही, पण जर आपल्यापाशी पैसा असेल तर सफेद दैत्याचे डोळेदेखील बाहेर काढता येतात.

"तुझ्यापाशी माया नसेल तर मित्रापाशी जाऊ नकोस. पण पैसा असेल तर तो बाहेर काढ व मग त्याच्याकडे जा. कफल्लक असशील तर कामिनीच्या मोहात पडू नकोस. कारण अकिंचन मनुष्याची त्यांना काहीच योग्यता वाटत नाही. जवळचे सर्व धन दुसऱ्याच्या हाती ठेवशील तर गरजेच्या वेळी तुझी मूठ रिकामी राहील. तुझ्या प्रयत्नाने सर्व दरिद्री माणसे कधीच श्रीमान होणार नाहीत. पण तू मात्र कफल्लक होशील अशी मला धास्ती वाटते."

कानउघाडणी करणाऱ्याने ही गोष्ट सांगितली. त्या उपदेशाने त्या उदार मनुष्याचा मनःक्षोभ होऊन तो रागाने ओरडला, "बडबड बंद कर! ही संपत्ती माझ्या हाती येण्यापूर्वी माझे वडील आपण माझ्या आजोबांच्या संपत्तीचे वारस म्हणून मिरवीत असत. माझे वडील आणि माझे आजोबा हे दोघेही, त्यांनी जन्मभर काळजीने संभाळलेली ही माया अनावर दुःखाने येथेच टाकून नाही का गेले? माझ्या पित्याची दौलत माझ्या हाती आली व ती पुढे माझ्या मुलाच्या हाती पडणार, म्हणून म्हणतो की शहाण्यांनी तिचा आजच उपभोग घ्यावा हे बरे. कारण उद्या माझ्या पश्चात् ती कुणी लुटून नेणार नाहीत याची कोण हमी देईल? वाटेल तितके खावे, प्यावे, दुसऱ्यांना तृप्त करावे. दुसऱ्यांसाठी नागोबा होऊन दौलतीवर बसून राहण्यात काय अर्थ? शहाणे लोक असे करूनच आपल्या बरोबर (यशोधन) नेतात. पण बेअकली आणि नीच मात्र वासना आपल्याबरोबर घेऊन जातात.

पैसाअडका तुझा असतो तोवर त्याचे दान कर. कारण तुझ्या पश्चात् त्याच्यावर तुझी सत्ता राहणार नाही. इहलोकी असतानाच सद्गतीची सोय करून घेता येते. म्हणून सांगतो राजा! पैसे देऊन सद्गतीची खरेदी कर, नाहीतर वासना घेऊन परलोकी जाशील."

## ५. शेजाऱ्याच्या उपयोगी पड.

एक बाई रडत आपल्या नवऱ्याला म्हणाली, "अहो, आपल्या गल्लीतल्या वाण्याकडून पुन्हा कधी पाव आणू नका. वाटले तर मोठ्या दाणेवाल्याकडून गहू आणा. हा वाणी लबाडी करतो. तो दाखवितो गहू पण देतो जव! आठआठ दिवस त्याचे तोंड कोणाला दिसत नाही, ते त्याच्याकडे गिऱ्हाइके पुष्कळ म्हणून नव्हे तर त्याच्या तोंडाभोवती माशा घोंघावत असतात म्हणून."

तिचा नवरा बिचारा सालस मनुष्य होता. तो आपल्या बायकोची समजूत घालून म्हणाला, "लाडके, हे पाहा, त्या वाण्याने आमच्यावर भिस्त ठेवून येथे दुकान

थाटले आहे. त्याला जर दोन पैसे मिळत असतील तर ते न मिळू देणे बरे नव्हे. मनुष्याने कसे निर्भय आणि दिलखुलास असावे. आपण नीट उभे असताना पडलेल्यांना हात द्यावा. जाऊ दे ! त्या वाण्याचे काय एवढे घेऊन बसली आहेस ! किरकोळ दुकानदाराशीच सच्चा माणूस व्यवहार करतो. दिलदार माणूस हा खरा साधूच असतो. शाहेमर्दा हजरत अली यांचा क्षमा करणे हाच सद्‌गुण आहे."

## ६. कर्मठ आणि दांभिक देवभक्त.

एक मनुष्य मक्केची यात्रा करताना वाटेत पावलागणिक दोन दोन रकात नमाज पढत असे. तो इतका तन्मय झाला होता की रस्त्यात बाभळीचे काटे बोचले तरीही ते न काढताच तो पुढे चालत असे.

त्या अहंकारी मनुष्याला आधीच आपले हे घातक विचार प्रिय. त्यातच सैतानाच्या चिथावणीमुळे तो शेफारून गेला. आपल्याप्रमाणे खडतर व्रत आजवर कोणीही पाळले नसेल या दिमाखातच तो गढून गेला.

ईश्वराला हे कळले व कृपावंत होऊन त्याने खैर केली. आपल्या अहंकारामुळे तो सन्मार्गापासून च्युत झाला असता. आकाशवाणीने त्यास समज दिली, " अरे भाग्यवान व कुलीन गृहस्था ! तू असे खडतर व्रत केलेस म्हणून देवाच्या दरबारात मानाचे पान मिळेल अशी आशा बाळगू नकोस. परोपकार बुद्धीने कोणा एकालाही जरी तू संतुष्ट करशील तरी ते पावलागणिक हजार रुकत नमाज पढण्यापेक्षा अधिक श्रेयस्कर होय."

## ७. सरकारी नोकर.

एका सुलतानाच्या नोकरास त्याच्या बायकोने म्हटले, "अहो उठा ना ! आमच्या पोटापाण्याची काहीतरी व्यवस्था करा. बाहेर जाऊन दुसरे सरकारी नोकर आपल्याला मिळालेल्या शिध्यातून तुम्हालाही देतात का पाहा. आपली मुले भुकेने व्याकुळ झालेली आहेत."

नवरा म्हणाला, " आज मुदपाकखान्यात सगळे काही थंड आहे, कारण रात्री सुलतानाने उपवास करावयाचे ठरविले होते."

बायकोने वैतागून मान खाली घातली व ती भुकेच्या व्यथेने स्वतःशीच पुटपुटली, " म्हणजे काय ! सुलतान उपवास सोडील तेव्हाच आमच्या मुलांचा सण व्हावयाचा ! असे रोजे करून राजास मिळणार काय ते कोणास ठाऊक ! जो मनुष्य रोजे उपवास पाळत नाही, पण दुसऱ्यांचे भले करतो तो उपासतपास करणाऱ्या व्यवहारी मनुष्यापेक्षा बरा. ज्याला दिवसा भुकेलेल्यांना भाकर देता येईल त्यानेच रोजे (उपवास) करावेत. कायाक्लेश करून भूक मारणे व नंतर

आपलाच अन्नाचा वाटा खाणे यात काय अर्थ आहे ? मूर्ख मनुष्य देव देव करावयास लागला तर धर्म आणि अधर्म यांच्याबद्दल गोंधळ माजतो. पाणी व काच ही दोन्ही सारखीच स्वच्छ दिसली म्हणून काय झाले ? पुरेसे तारतम्य असल्याशिवाय ती ओळखता येणार नाहीत."

## ८. निर्धन दानशूर व कैदी

एक उदार गृहस्थ होता. त्याला दान करण्याची दांडगी तळमळ होती. पण त्याच्याजवळ काहीही नव्हते. द्यावे म्हटले तरी त्याची मिळकत काहीच नव्हती.

मूर्ख मनुष्य श्रीमंत नसावा व उदार माणूस निर्धन नसावा. दानशूरापाशी त्याला वाटते तितके दान करावयाला द्रव्य नसते. त्याची स्थिती डोंगरावरील पाण-लोटासारखी असते. तितक्या उंचीवर पाण्याला राहता येत नाही.

आपली स्थिती न पाहता दान करत सुटल्यामुळे तो गृहस्थ कफल्लक झाला होता. एकदा एका दरिद्री इसमाने त्यास दोन शब्द लिहून पाठविले, "हे भाग्यवान आणि उदार गृहस्था ! मला थोडे द्रव्य देऊन मदत कर. मी कर्जापायी कैदेत पडलो आहे."

त्याला कोणत्याच गोष्टीची फिकीर नव्हती, पण त्याच्यापाशी छदामही नव्हता. तो कारागार पाळकाकडे जाऊन विनवू लागला, "हे यशवंत उदारा, याला थोड्या दिवसासाठी मोकळा सोडा. तो जर पळून गेला तर मी त्याला जामीन आहे."

तो थेट त्या कैद्यापाशी जाऊन म्हणाला, "ऊठ. तुझ्या सर्व शक्तीने या शहरातून पोबारा कर."

पिंजऱ्याचे दार उघडताच बंदिस्त पाखरू जसे अधीर होते, त्याप्रमाणे त्या कैद्याने क्षणाचाही विलंब लावला नाही व तो असा वायुवेगाने पळाला की प्रत्यक्ष धुळीलाही त्याचा पाठलाग करता आला नसता.

नंतर काही दिवसांनी अधिकाऱ्यांनी त्या उदार गृहस्थास पकडले व कैद्याचे देणे भरण्यास फर्मावले. पिंजऱ्यातून सुटलेला पक्षी पुन्हा कधी पिंजऱ्यात शिरत नसतो हे त्या दानशूर इसमास ठाऊक होते व म्हणून तो मुकाट्याने स्वतः कैदी झाला. बरेच दिवस तो कारागृहात राहिला. त्याने कोणासही पत्र लिहिले नाही व कोणाजवळ दैन्य कथन केले नाही. तो दिवसभर उपाशी व रात्री जागा राही.

एकदा एका सज्जन मनुष्याने त्यास विचारले, "तू चोर असशील असे मला वाटत नाही. पण तू कैदी कसा काय बनलास ?"

त्याने उत्तर दिले, "सद्गृहस्था, मी कधी कुणाला फसवून पैसा मिळविला नाही हे खरे. पण एक गरीब मनुष्य कैदेत तडफडत होता आणि स्वतः कैदी बनल्या-शिवाय त्यास सोडविता येण्यासारखे नव्हते. त्याने कारावास भोगावा आणि मी मात्र चैन करावी हे कोणाही बुद्धिवंताला पटणार नाही."

शेवटी तो कैदेतच मेला व कीर्तीसह परलोकी गेला. कारण त्याचे यश मेले नाही हे किती बरे उत्तम झाले!

दिलदार आणि कनवाळू माणूस मेला, तरी त्याचे मरण मेलेल्या अंतःकरणाचा शहाणा मनुष्य जिवंत रहाण्यापेक्षा अधिक श्रेयस्कर. दिलदार मनुष्य कधी मरत नाही. त्याचा देह मेला तरी त्याचे काय मोठेसे!

## ९. प्राणिमात्रावर दयाबुद्धी दाखविण्याविषयी.

एका जंगलात एक कुत्रे तहानेने व्याकुळ होऊन तळमळत होते. एका धर्म-भोळ्या मनुष्याने ते पाहिले. लगेच त्याने आपल्या अस्तन्या वर करून आपल्या फेट्याला आपली कानटोपी बांधून पाणी ओढले व त्या दीन कुत्र्याला पाजले. त्याच्या त्या पुण्य कृत्याची एका पैगंबराने देवाला बातमी दिली व त्याची सर्व पापे नाश पावली.

दुष्टपणा करशील तर खबरदार! परोपकाराचा मार्ग पत्कर आणि श्रद्धाळू हो. जो मनुष्य कुत्र्यावरसुद्धा उपकार करतो त्याचा चांगुलपणा वाया जाईल असे कधी होणार नाही. शक्यतो सर्वांवर उपकार कर. अल्लाने कोणी किती चांगुलपणा करावा अशी मर्यादा ठरविलेली नाही. लोकांसाठी रानात विहीर बांधण्याइतकी तुझी ऐपत नसेल, तर निदान यात्रेकरूंच्या सेवेसाठी वाटेत दिव्याची व्यवस्था कर. श्रीमंताने आपल्या तिजोरीतून थैल्या भरून केलेल्या दानापेक्षा मजुराने केलेले एखाद्या दीनाराचे दान कितीतरी श्रेष्ठ होय. जो तो आपल्याला झेपेल तेवढेच ओझे उचलेल. मुंगीला एखाद्या टोळाची तंगडीही जड वाटते. तुझ्यावर उद्या कोणतेही संकट न यावे यासाठी तू सर्वांशीच चांगला वागत जा.

पडणाऱ्याला सावरताना उपकारी मनुष्यच पडला, तरी फार वेळ त्याला पडून राहावे लागत नाही. कोणी तुझा गुलाम आहे म्हणून त्याच्यावर तू जुलूम करू नकोस. कारण तोही कधीतरी आपली सत्ता गाजवील. तुला सुदीर्घ सद्भाग्य व ऐश्वर्य लाभले तरी तू दरवेश्यांवर आणि दीनजनांवर बलप्रयोग करू नकोस. बुद्धिबळात काही वेळा प्यादे सुद्धा वजीर होते, तसा तो दीनदुबळा मनुष्य तुझ्याहून श्रेष्ठ आणि श्रीमंत होईल.

माझे सांगणे ऐक. कोणीही विचारी मनुष्य दुसऱ्याच्या मनात किल्मिष पेरत नाही. आपल्या खळ्यातील कणसांतून एखादा भिकारी दाणे वेचत असताना त्याला घालवून देणारा मालक स्वतःचेच नुकसान करून घेतो. कारण समजा उद्या त्या भिक्षेकऱ्याला देवाने श्रीमंत बनविले, तर त्याबद्दल ह्या मगरूर मनुष्याला हळहळीचे ओझे वाहावे लागेल.

किती तरी बलिष्ठ लोक धुळीस मिळतात आणि कित्येक दीनदुबळ्यांना नशीब हात देते.

## १०. सधनांचा मस्तवालपणा.

एक भिक्षेकरी एका श्रीमंताच्या दारी शोकाकुल होऊन भिक्षेस आला. तो काळचा काळजाचा मनुष्य त्याला पै पैसा न देताच त्याच्या अंगावर धावून आला. त्या विषण्ण भिक्षेकऱ्यास त्याच्या दांडगाईचा खेद वाटून तो म्हणाला, "नवलच आहे! हा श्रीमंत वागा का करतो! गरिबी आणि याचनेची झळ कदाचित आपल्यालाही लागेल याची धास्ती त्याला वाटत नसावी."

त्या धनिकाच्या सांगण्यावरून त्याच्या गुलामाने त्या भिक्षेकऱ्यास झिडकारून घालवून दिले. तेव्हा तो बिचारा शोक करत पुढे चालता झाला. देवाचे उपकार विसरल्यामुळे पुढे एकदा त्या धनिकाचे दैव फिरले असे मी ऐकले. त्याने श्रीमंतीबद्दल बाळगलेल्या घमेंडीमुळे त्याचा विनाश ओढवला. नशिबाने त्याच्या ऐश्वर्यावर बोळा फिरविला. दुर्दैवाने त्यास लसणासारखे उघडे नागडे बनवून टाकले. "माल" आणि "हमाल" दोघेही त्यास सोडून गेले. त्या हतभाग्याची अन्नान्नदशा झाली. जादूने दौलत उत्पन्न करणाऱ्या पण वस्तुतः स्वतः निर्धन असणाऱ्या जादुगाराप्रमाणे त्याच्या हातात व खिशात शून्यच राहिले. त्याचे सारे जीवन बदलले. अशा स्थितीतच बराच काळ लोटला. जो एके काळी त्याचा गुलाम होता तो एका श्रीमंताच्या पदरी गेला. तो धनिक सढळ हाताचा, उदार अंतःकरणाचा व परिपक्व विचारांचा होता. त्याला गरिबांच्या दुःस्थितीचे निवारण करताना नव्याने श्रीमंती प्राप्त झालेल्या कंगालाला जितका हुरूप वाटतो तितका वाटत असे.

एका रात्री एक अत्यंत थकलेला भिक्षेकरी आपल्या दाराशी आलेला पाहून त्या धनिकाने आपल्या गुलामास त्या दीन याचकाची विचारपूस करण्यास सांगितले. तो सेवक आज्ञेबरहुकूम त्यास अन्न वाढण्यासाठी घेऊन आला. पण त्याला पाहताच मोठ्याने रडतच धन्यापाशी परत आला. त्याच्या अश्रूमुळे त्याला केवढे दुःख झाले हे त्याच्या मालकास समजले.

त्या सुस्वभावी मालकाने विचारले, "तू का रडतोस? तुझ्यावर कोणी अत्याचार केला काय?" तो सेवक म्हणाला, "या वृद्ध भिक्षेकऱ्यास पाहून मी फारच कष्टी झालो. कारण एके काळी मी त्याचा गुलाम होतो व तो मोठा श्रीमंत होता. अतिथि-सत्काराविषयी त्याचा हात आखडता असल्याने त्याच्यावर आज दारोदार हिंडण्याची पाळी आली आहे."

तो सरदार स्मित करून म्हणाला, "पोरा, यात अत्याचार कसला? कालचक्राच्या फेऱ्याला कोणी अत्याचार म्हणत नाही. हा दरिद्री याचक म्हणजे पूर्वी आपल्या श्रीमंतीमुळे मस्तवाल बनलेला व्यापारीच. त्याने ज्याला आपल्या दारातून घालवून दिले तोच मी! नशिबाने माझी अवस्था त्यास बहाल केली. दैवाने माझी भरभराट घडवून आणली आणि माझ्या तोंडावरील सगळे दैन्य दूर केले. जरी देवाने

विचार करून कधी एखादे दार बंद केले तरी त्याच्या कृपाळूपणामुळे दुसरे एखादे द्वार खुले राहतेच. शेकडो लोकांचे दारिद्र्य नाहीसे होते आणि हजारो बलिष्ठ व श्रीमंत लोक हवालदील होतात."

## ११. सदाचारी भक्त.

तू सन्मार्गी व सदाचारी आहेस ना? मग एका सत्पुरुषाची गोष्ट सांगतो ती ऐक. मागे एकदा शिब्ली नावाच्या साधुपुरुषाने वाण्याकडून एक गव्हाचे पोते घरी नेले. त्यातील गव्हात एक मुंगी सैरावैरा धावत होती. तिला पाहून त्याला तिची दया आली. त्याला त्या रात्री स्वस्थ झोप आली नाही. त्याने ती मुंगी योग्य जागी पोहचविली. त्या मुंगीस भलत्याच जागी ठेवणे योग्य नव्हे असे त्यास वाटले असावे.

कष्टी लोकांना संतुष्ट करशील तर देव तुला सुखी ठेवील. सच्छील अशा फिर्दुसीचे[५३] बोधवचन किती सुंदर आहे! ईश्वर त्याच्या कबरीवर कृपादृष्टी ठेवो! "दाणा वेचणाऱ्या मुंगीस सुद्धा दुखवू नकोस, कारण तिलाही जीव असतो व तो तिला प्रिय असतो. एखाद्या मुंगीलाही ज्याच्याकडून उपसर्ग पोहोचतो तो मनुष्य नाठाळ आणि पाषाणहृदयी असलाच पाहिजे. दुर्बलावर हात उगारू नकोस. कारण एखादेवेळी त्याच्याच पायाखाली तुला मुंगीसारखे मरावे लागेल. ज्योतीला जळणाऱ्या परवान्या (शलभा) ची दया येत नाही. म्हणूनच तिची दुर्दशा पाहा! ती मैफलीत सर्वांसमोर जळून नष्ट होते."[५४] तुझ्याहून कमी दर्जाचे लोक अनेक असतील हे कबूल, पण तुझ्यापेक्षा मातब्बर असा कोणी तरी असणारच की नाही?"

**बोधवचन : उपकार व त्याचे फळ**

बाळा उपकार कर! उपकाराने माणसाची व फास लावून श्वापदाची शिकार करता येते. शत्रूची मान उपकाराच्या जाळ्यात अडकविली पाहिजे. कारण ते जाळे शस्त्राने कापणे कठीण असते. उपकार, दया आणि कनवाळूपणा पाहून शत्रूच्या मनात देखील वैरभाव उत्पन्न होत नाही.

दुराचारी होऊ नकोस. कारण त्यामुळे तुझे खरे स्नेहीदेखील तुझे शत्रू बनतील. वाईट बीजापोटी रसाळ गोमटी फळे कशी येतील? दुस्वास आणि लबाडी केल्याने तुझे प्रत्यक्ष मित्रही तुझा दर्प आणि दिमाख सहन करणार नाहीत. सरदाराने जर शत्रूंना चांगले वागविले, तर ते देखील त्याचे मित्र बनतात.

## १२. उपकार करून मने काबीज करण्याबद्दल.

मी रस्त्यावरून जात होतो तेव्हा एक तरुण माझ्यापुढे चालत होता व त्याच्या मागोमाग एक शेळी धावत होती. मी त्याला म्हटले, "ही शेळी तुझ्यामागून येत आहे, त्याचे कारण दोरी व गळफास."

त्याने लगेच तिच्या गळयातून पट्टा व दोरी काढून घेतली. शेळी सैरावैरा धावत सुटली. तरी पण ती त्या माणसामागूनच चालत होती. कारण त्याच्या हातून जव आणि हिरवागार चारा तिने खाल्ला होता.

त्या शेळीचे वागडणे आटोपल्यावर त्या मनुष्याने मला पाहून म्हटले, "विचारवंत गृहस्था, ह्या शेळीच्या गळयात दोरी नसून माझ्या मायेचा फास आहे. हत्ती माहुताची मेहेरनजर जाणतो म्हणून तो त्याच्यावर कधी हल्ला करत नाही. भल्या माणसा, दुष्टांवरही उपकार कर. तुझी भाकर खाल्यावर कुत्रादेखील तुझी कदर करील. जर कोणी चित्याला दोन दिवस खरवस चाटवला तर त्याच्याशी वागताना त्याचे दात बोथट होऊन जातात."

## १३. गरीब साधू व कोल्हा.

एक साधू दरवेश होता. त्याने एक लंगडा लुळा कोल्हा पाहिला. त्याला देवाच्या करणीचे कौतुक वाटले. तो अपंग कोल्हा कसा जगत असेल, त्याला हातपाय नसताना त्याच्या पोटाला कसे काय मिळत असेल, असे विचार त्याच्या मनात आले. तो असा विचारमग्न असतानाच एक वाघ पंजात बोकड धरून घेऊन आला. बोकड खाऊन तो निघून गेला व लुळया कोल्ह्याने उरलेला भाग खाल्ला.

दुसऱ्या दिवशीही कर्मधर्म संयोगाने असाच प्रकार घडला व अन्नदात्याने त्या दिवसाची सोय केली.

दरवेशाचे डोळे उघडले व त्याचा परमेश्वरावर पूर्ण विश्वास बसला. त्याने त्या दिवसापासून एका कोपऱ्यात मुंगीसारखे बसून राहण्याचे ठरविले. कारण हत्ती बलाढ्य असला तरी स्वतःच्या हिमतीने मिळवतोच असे नाही.

काही दिवस तो मान खाली घालून स्वस्थ बसला व अन्नदाता परमेश्वर कोठून तरी आपली भूक भागवील असे त्याला वाटले. त्याच्या हालअपेष्टांकडे परके तर सोडा, ओळखीचे लोकही पाहीनासे झाले. त्याचे शरीर सुकून फक्त अस्थिचर्म शिल्लक राहिले व तो एखाद्या चंगा (ढोलक्या) सारखा दिसू लागला.

तो अशक्त झाला व त्याची प्रज्ञाही राहिली नाही. मग तो फार उतावीळ झाला. जवळच्या भिंतीतील महीरपीतून त्याच्या कानात आवाज (आकाशवाणी) आला, "मूर्खा ऊठ! वाघासारखा वाग! तू त्या लुळया कोल्ह्याचे अनुकरण करू नकोस. वाघाप्रमाणे दुसऱ्याचेही पोट भरण्याची खटपट कर. त्या कोल्ह्याप्रमाणे उरले सुरलेले खाऊन जगण्यात काय पुरुषार्थ आहे? ज्याची गर्दन वाघाप्रमाणे भारी असते, तो कोल्ह्यासारखा पडून राहील तर त्याच्यापेक्षा श्वान कितीतरी श्रेष्ठ!

"सावज पंजात पकडावे व दुसऱ्यांच्या सोबतीत त्याचा फन्ना उडवावा! दुसऱ्यांचे उष्टे खाण्याची ओढ असू नये. शक्यतोवर स्वतःच्या कर्तृत्वाने पोट भर

म्हणजे तू केलेली खटपट तुझ्या कर्माच्या तराजूत जोखली जाईल. मर्दाप्रमाणे काबाडकष्ट कर आणि दुसऱ्यानांही सुख दे. दुसऱ्यांच्या जीवावर फक्त षंढच जगत असतात.

"तुला उपदेश पटतो ना? मग तू स्वतः दुसऱ्यांना मदत कर. दुसऱ्यांपुढे मदतीसाठी तोंड वेंगाडू नकोस. ईश्वरसुद्धा दुसऱ्यांना सुख देणाऱ्या मर्दावरच कृपा करतो. ज्याच्या कवटीत मेंदू असतो तोच दुसऱ्यांना मदत करू शकतो. ज्यांना हिंमत नसते त्यांचा मेंदू देखील कुचकामी असतो. जो या जगी प्राणिमात्रांना सुखी करतो त्याच्या वाट्यास इहलोकी व परलोकी सुखच येते."

## १४. कृपण देवभक्त.

पॅलेस्टाइनच्या पुण्यभूमीत एक सात्विक मनुष्य राहतो व तो सदानकदा तीर्थयात्रा करत असतो असे कोणीतरी मला सांगितले होते. मी व माझ्याबरोबर प्रवास करत असलेल्या काही मित्रांनी त्याचे दर्शन घेण्याचे ठरविले. त्याने आम्हा सर्वांच्या हातांचे आणि डोळ्यांचे चुंबन घेऊन आमचे स्वागत केले व आम्हांस आसन देऊन तो स्वतः बसला.

मी त्याची शेतीवाडी, मळे, मालमत्ता, नोकरचाकर सर्व पाहिले. पण मला तो बिनफळाच्या झाडाप्रमाणे करंटा वाटला. त्याची रीतभात फक्कड होती. पण त्याच्या स्वयंपाकघरात मात्र काही हालचाल दिसत नव्हती. जपातपामुळे व भुके-मुळे आम्हाला रात्री झोप लागत नसे.

तो सकाळी उठल्याबरोबर कंबर बांधून घेऊन दरवाजा उघडत असे व पुन्हा आदल्या दिवसाप्रमाणेच (पोकळ) आदरातिथ्य करत असे.

एक ऐटदार आणि सुस्वभावी तरुण आमच्याबरोबर होता. तो त्या कृपणाला म्हणाला, "अहो! स्वागतासाठी म्हणून तुम्ही हाताचे चुंबन घेता, त्याऐवजी स्वागत जरा चांगले करा. म्हणजे 'पापा' देण्यापेक्षा पोळी द्या. माझी सेवा करण्यासाठी माझ्या जोड्याला हात लावू नका. त्यापेक्षा तुम्ही माझ्या पोटाला द्या, आणि डोकीवर जोडे हाणा! धनाचा त्याग करणारेच श्रेष्ठ ठरतात! नमाज पढणारे जागरण बहाद्दर मेलेल्या काळजाचे असतात.

तुर्की टार्टर चौकीदारही असेच मेलेल्या काळजाचे आणि जिवंत नजरेचे असतात. श्रेष्ठपणा आणि दानशूरपणा हा अन्नदानाने सिद्ध होतो. रुक्ष प्रवचने तबल्यासारखी पोकळ असतात. ज्याने दांभिकपणा सोडला आणि दानाचा खरा अर्थ जाणला त्याला कयामतीच्या दिवशी स्वर्गप्राप्ती होते. बोलण्याला अर्थ कृतीमुळे येतो. पाऊल न उचलता बोलणे म्हणजे रिकामटेकडेपणाच होय."

# १५. हातीमताई – आख्यान.

## हातीमताईच्या उदारपणाचे वर्णन

असे म्हणतात की हातीमताईच्या काळी त्याच्या तबेल्यात एक श्यामवर्णी घोडा होता. तो वायुवेगाने धावत असे आणि मेघासारखा गरजत असे. तो सौदामिनीहून चपळ होता. मेघाप्रमाणे तो डोंगरावर गारा पाडत जात असे. कधी तो पुराच्या लोटाप्रमाणे जंगल व्यापत असे. हवा तर धुळीप्रमाणे त्याच्या मागेच धावत असे.

जाणत्यांनी हातीमची ही हकीकत रूम (पॅलेस्टाइन) च्या सुलतानास सांगितली. "दानशूरपणात त्याचा हात धरणारा कोणी नाही. त्याच्या घोड्यापेक्षा लढण्यात आणि सवारीत सरस असा दुसरा घोडा नाही. नाव नदी पार करते तसा तो माळरानातून धावत असता कावळादेखील त्याच्या मागेच राहतो."

सुलतान वजिरास म्हणाला, "अशी तारीफ करण्यात काही वावगे नसले तरी ती उपमर्द करणारी आहे. मी त्याच्यापाशी त्या अरबी घोड्याची मागणी करीन. त्याने जर उदार अंतःकरणाने तो मला दिला, तर मी म्हणेन की खराच तो सरदाराप्रमाणे सढळ हाताचा आहे. जर त्याने नाकारले तर मात्र ह्या वायफळ गप्पा आहेत."

त्याने एका हुषार आणि बुद्धिवान जासुदाला त्याच्याबरोबर दहा गडी देऊन रवाना केले. तो अत्यंत आवेशाने वाऱ्यासारखा मार्ग आक्रमण करू लागला आणि हातीमच्या वाड्यापुढे येऊन धडकला. तेव्हा तहानेने व्याकुळ झालेल्या पांथस्थाला नदी पाहून वाटावा तितका उत्साह त्याला वाटला.

हातीम जासुदाला सामोरा आला. त्याला त्याने भोजनाचे आमंत्रण दिले. त्या दिवशीचा बेत घोडा कापण्याचा होता. जेवण झाल्यावर त्याने त्याच्या शेल्यात साखर बांधली आणि हातावर ओंजळभर होन ठेवले.

ती रात्र त्या जासुदाने आरामात घालविली व दुसऱ्या दिवशी सराईत जासुदाप्रमाणे तो मुद्द्याचे बोलला.

हातीम विषण्ण होऊन ऐकत होता. त्याची शुद्ध हरपली. तो व्याकुळ होऊन दात-ओठ चावू लागला आणि म्हणाला, "बुद्धिमान गृहस्था, तुम्ही मला अगोदरच सुलतानाचा निरोप का सांगितला नाही? काल मी त्या वायूप्रमाणे धावणाऱ्या "दुलदुल" घोड्याचे कबाब करवून तुम्हांस मेजवानी दिली. आजकाल पाऊस फार पडतो व नद्यांना पूर आले आहेत. म्हणून घोडा धावू शकत नाही. शिवाय त्या एका घोड्याशिवाय मेजवानीसाठी माझ्याजवळ दुसरे काहीच नव्हते. तुम्ही इतके लांबून आलात तेव्हा तुम्हांस उपाशी झोपावयास सांगणे मला योग्य वाटले नाही. जगात

माझे नाव झाले म्हणजे मला पुरे ! त्यासाठी माझा अप्रतिम घोडा कामास आला तरी बेहत्तर."

त्याने त्या लोकांना पोशाख, पैसा आणि घोडे बहाल केले. खरा दिलदारपणा पिंडातच असला पाहिजे. त्याचे सोंग करता येत नाही.

हातीमताईच्या दिलदारपणाची बातमी रुम देशाला पोहोचली. सर्वत्र त्याच्या औदार्याची वाहवा झाली.

हातीमच्या एवढ्याशा कहाणीवर हुरळून जाऊ नका. याच्याहूनही नवलाच्या गोष्टी मी सांगणार आहे. ऐका.

## यमनचा सुलतान हातीमताईची सत्त्वपरीक्षा करतो

मला ही गोष्ट कोणी सांगितली ते मला आठवत नाही. पण मी ती सांगतो. यमन प्रांतात एक सुलतान होता. त्याची ख्याती दांडगी होती व तो उदारपणातही कोणास हार जाणारा नव्हता. त्याला महादानी मेघ म्हणणे अयोग्य होणार नाही. त्याचा हात होनांचा वर्षाव करत असे.

त्याच्यासमोर कोणी हातीमचे नाव काढले तर त्याचे पित्त खवळत असे. "त्याच्याजवळ राज्य नाही किंवा अधिकाराचे पद नाही. त्याच्या घराचे वासे पोकळ आहेत." असे तो म्हणत असे.

त्याने एकदा सर्व राज्याचे सम्मेलन आयोजित केले. सनईवादनाने लोकांचे मन प्रसन्न झाले. कोणी हातीमबद्दल बोलत होता तर कोणी त्याच्यावर स्तुतिसुमने उधळत होता.

सुलतानाची 'ठरला जणू मत्सर राजा' अशी गत झाली. त्याने मारेकऱ्याला त्याचा खून करण्यासाठी नेमले. तो म्हणाला, "माझ्या हयातीत हातीम जिवंत असेतोपर्यंत माझे नाव होणार नाही."

मारेकरी हातीमताईस ठार मारण्याच्या उद्देशाने त्याच्या ठिकाणाकडे जाऊ लागला. वाटेत त्याला एक तरुण भेटला. त्याच्या स्नेहाचा परिमळ हवेत दरवळत होता. तो दिसावयाला सुंदर, बुद्धिवान आणि गोडबोल्या होता. त्याने त्या मारेकऱ्यास रात्रीच्या मुक्कामासाठी पाचारण केले. त्याने आपल्या आदरसत्काराने, सहृदयतेने आणि माणुसकीने मारेकऱ्याचे मन मोहून टाकले. दुसरे दिवशी सकाळी रीतीप्रमाणे हातापायाचे चुंबन घेऊन त्यास आणखी थोडे दिवस राहण्यासाठी त्याने गळ घातली. मारेकरी म्हणाला, "मी थांबू शकत नाही. माझ्यावर मोठी कामगिरी सोपविण्यात आली आहे." मित्र म्हणाला, "ती कोणती कामगिरी आहे. हे जर मला सांगशील. तर खऱ्या मित्राप्रमाणे मी तुला मदत करीन."

मारेकरी म्हणाला, 'ऐक, मित्रा, मी दिलखुलास मित्रांना आमची इभ्रत राखणारे समजतो. ह्या देशात हातीम हा सर्वांच्या ओळखीचा आहे. त्याचा शीलस्वभाव विश्रुत

आहे. यमनच्या सुलतानाला त्याचे मुंडके हवे आहे. त्या दोघांमध्ये कसले वैमनस्य आहे ते मला ठाऊक नाही. मित्रा, मला त्याच्या गावी पोहोचव. या साहाय्याची मी तुझ्यापासून अपेक्षा करतो.'

तरुण हसला, "अरेच्या! मीच तो हातीम. हातात तलवार घे आणि माझे डोके उडव. सकाळी तुला कोणाचा उपसर्ग होता कामा नये आणि तुला कसली खंतही वाटू नये."

हातीमने आपले मस्तक पुढे केले. मारेकरी विव्हल झाला. किंकाळी फोडून तो जमिनीवर लोळू लागला. हातीमच्या पायाजवळच्या मातीचे आणि त्याच्या हातापायांचे त्याने चुंबन घेतले. आपली तलवार आणि तिरकमठा जमिनीवर ठेवून दासानुदासाप्रमाणे छातीवर हात धरून तो उभा राहिला.

मी तुझ्यावर एका फुलाने जरी प्रहार केला तरी माझे पुरुषत्व संपुष्टात आले असे समज!

मर्द गड्यांच्या मेळाव्यात मला अबला म्हणवून घ्यावे लागेल.

त्या मारेकऱ्याने त्याच्या दोन्ही नेत्रांचे चुंबन घेतले व त्यास मिठी मारली. त्यानंतर त्याने मुकाट्याने यमनचा रस्ता धरला.

सुलतानाने त्याचा पडलेला चेहरा पाहून आपली कामगिरी त्याने बजावली नाही हे लगेच ताडले. त्याला जवळ बोलावून त्याने सर्व हकीकत सांगण्यास फर्माविले. "मारे त्याचे डोके उडविण्यासाठी गेला होतास, तो रिकामाच का परत आलास? कदाचित तुला तुझ्यापेक्षा मातब्बर माणसाशी मुकाबला करावा लागला असेल, आणि त्यामुळे तुझे धाबे दणाणले असेल," सुलतान कुत्सितपणे बोलला.

त्या हुषार मारेकऱ्याने जमिनीचे चुंबन घेऊन सुलतानाची बिरुदावली उच्चारली आणि म्हटले, "खुदावंत! हातीमची थोरवी श्रवण करावी! मला हातीम बुद्धिवान, विनयशील आणि देखणा वाटला. औदार्य, बुद्धिमत्ता आणि शौर्य या गुणांत त्याने माझ्यावर मात केली. त्याने माझ्यावर केलेल्या उपकारामुळे माझी कंबर वाकली. सद्भावाने आणि दयार्द्रतेने त्याने मला जणू ठार मारले! त्याच्या मोठेपणाबद्दल मला जे काय दिसले ते मी हुजुरास सांगितले."

सुलतानाने हातीमच्या वंशाची म्हणजे ताई वंशाची तोंडभर तारीफ केली. त्याने त्या जासुदाला अशरफींचे बक्षीस दिले. हातीमच्या औदार्यावर शिक्कामोर्तब झाले.

ज्याच्या कीर्तीची ग्वाही त्याच्या कर्तबगारीने मिळते, त्या नरवीरासच असा मान मिळतो.

## हातीमताईच्या कन्येवर ओढवलेला प्रसंग.

मला असे कळले की पैगंबरांच्या कारकीर्दीत हातीमच्या "ताई" घराण्याने मुसलमान धर्माचा स्वीकार केला नाही. हुजुरांनी त्यांच्यावर धाक बसवून त्याला

शहाणपण शिकविण्यासाठी लष्कर रवाना केले. त्या सैनिकांनी त्याच्या घरातील अनेक माणसांना बंदिस्त केले. ते नापाक लोक असून त्यांचा धर्म नापाक असल्यामुळे त्यांची गय न करता त्यांना ठार करा असा हुकूम झाला.

एक मुलगी पुढे आली व आपण हातीमची कन्या असल्याचे तिने सांगितले व पैगंबरांनी आपल्यावर दया करावी म्हणून विनविले.

"सरकार! माझ्यावर दया करा कारण माझे वडील दयाळू म्हणून नाणावले होते."

पाक विचारांच्या पैगंबरांनी तिच्या हातापायाच्या बेडचा काढून घेण्यास फर्माविले. त्या कुटुंबातील काही जणांना कंठस्नान घालण्यात आले आणि त्यांच्या रक्ताचे पाट वाहिले.

दुःखावेगाने त्या कन्येने संहार करणाऱ्यांना आपल्या डोक्यावरही तलवार चालविण्यास विनविले.

"मला माफी मिळाली म्हणून काय झाले! सगळे बंदीवान बनल्यानंतर मी एकटीच जिवंत कशी राहू?" ती म्हणाली.

आक्रोश करत ती ताई घराण्याची थोरवी सांगत होती ते सर्व पैगंबरांच्या कानावर पडले. त्यांनी त्या सर्वांना माफ केले. आणि त्यांचा सत्कार केला, कारण मध आणि मोती हे कधी हिणकस असू शकत नाहीत.

## हातीमच्या धैर्याचे वर्णन.

एकदा एका माणसाने हातीमच्या कोठारातून दहा तोळे (दिरम) साखर मागितली. नंतर मला एकाने अशी बातमी सांगितली की त्या माणसाला हातीमने एक गोणी साखर पाठवून दिली. हातीमच्या बायकोने फणकारून म्हटले, "अहो! हा काय तुमचा शहाणपणा! त्या बुढ्याला तर फक्त दहा तोळे साखर हवी होती म्हणे."

ताई घराण्याला कीर्ती मिळवून देणाऱ्या हातीमने हसून म्हटले, "हे कुलभूषणे! ऐक. त्या बिचाऱ्याने गरजेपुरती साखर मागितली असेल पण हातीमच्या घराण्याचा बाणा विसरलीस वाटते? हातीमसारखा सढळ हाताचा धनी तुला साऱ्या दुनियेत भेटावयाचा नाही."

अबूबक्र सअदचा उदार हात कोणाला याचनेची पाळी येऊ देत नाही.

हे प्रजापालक अबूबकर! तुझी प्रजा सुखी राहो. तुझ्या प्रयत्नाने इस्लाम आबाद राहो. हा देश गर्वाने आपली मान उंच करो. तुझ्या न्यायप्रियतेमुळे हा देश ग्रीस आणि रूमसारखा वैभवशाली झाला आहे.

तुझे हातीमइतके उदार अंतःकरण नसते तर दुनियेत हातीमचे नाव देखील कोणी घेतले नसते. हातीमचे नाव इतिहासात अमर झाले आहे तशी तुझीसुद्धा

वाखाणणी होत आहे आणि तुला फळही मिळाले आहे. हातीम आपल्या कीर्तीच्या मागे लागला होता पण तुझा सारा खटाटोप केवळ देवासाठी आहे. दरवेश-फकीर कधी आढेवेढे घेत नसतो. ज्याला वारसा म्हणतात तो केवळ एक शब्द आहे.

तुझ्या हातून जेवढे होईल तेवढे सत्कर्म कर. तुझी थोरवी आणि सादीची वाणी दोन्ही चिरायू होवोत.

## १६. मस्तवाल अमीर आणि दिलदार याचक.

आपल्या ऐश्वर्याने उन्मत्त झालेल्या एका श्रीमंताने भिक्षेकऱ्यांना आपल्या दारी येण्याची बंदी केली होती.

एका एकांत स्थळी एक गरीब दरवेश बसला होता. त्याचे काळीज गरम होते पण मनस्तापामुळे त्याचा नि:श्वास थंड पडला होता. एका आंधळयाने त्यास विचारले, कशामुळे तुला ताप आणि चिंता उत्पन्न झाली आहे ? "

तो शोकाने, क्षीण आवाजाने म्हणाला, " काय ही गल्ली आहे ! मला येथे फार त्रास होतो आहे." आंधळा म्हणाला, " संताप करून घेऊ नकोस. आजच्या रात्री माझ्या घरी येऊन थोडे खा." त्याला लोकांच्या भामटेपणाचा वीट आला होता. त्याने त्यास आपल्या घरी नेऊन जेवावयास बसविले.

दरवेश तृप्त झाला आणि त्यास " तुला देव दृष्टी देवो." असा आशीर्वाद दिला.

रात्री त्या आंधळयाच्या डोळयांतून आसवे टपकली व सकाळी त्याने डोळे उघडताच त्याला दृष्टी आली आणि जग दिसू लागले.

गावात हा हा म्हणता बातमी पसरली की आंधळयाला रातोरात दृष्टिलाभ झाला.

जो आपल्यावर चिडून निघून गेला होता, तोच तो आंधळा असे त्या कृपण अमिराला समजले. त्याने त्यास विचारले, " बाबा हे एवढे कठीण काम तुला इतके सहज कसे साध्य झाले? जगताचे दर्शन घडविणारा दृष्टिलाभ तुला कोणामुळे झाला?"

साधूने उत्तर दिले, " तू जुलमी करंटा आहेस ! तुझी दृष्टी संकुचित आहे. विचारदेखील बावळटपणाचे आहेत. तुला श्रेयस्कर हुमा दिसला नाही म्हणून तू घुबडामागे धावलास. तू ज्या माणसाला तुझ्या दारी येण्याची बंदी केली होतीस त्यानेच मला आश्रय दिला. तू जर माणसांची कदर केलीस तर मी ठासून सांगतो की तुझा चेहरा उजळ होईल. ज्याचे हृदय अंधळे असते त्याला सद्विचाराचे अंजन कसे लावता येईल ? "

त्या हतभाग्याने आपली निर्भर्त्सना ऐकून पश्चात्तापाने आपले बोट चावले.

" माझ्या दिलाचा ससाणा तुझ्या जाळयात अडकला आहे. जे काही माझे

होते ते आता तुझे झाले आहे. ज्याला मूषकाप्रमाणे लोभच तेवढा कळतो त्याला शिकार करणारा ससाणा कसा बरे संभाळता येईल ? "

**जनतेशी सौजन्याने वागावे म्हणजे सत्पुरुषांचे सान्निध्य लाभते.**

तुला सत्पुरुषांचे सान्निध्य हवे ना ? मग सेवाभाव एक क्षणभर सुद्धा सोडू नकोस.

तित्तिर, चकोर, कबूतर यांसारख्या पक्ष्यांना दाणा चार. असे केलेस तरच खगराज 'हुमा' तुझ्या जाळयात येईल. सौजन्याचे बाण चारी दिशांनी सोड म्हणजे चांगले सावज हाती येण्याची आशा बाळगता येईल. बरीच शिंपली गोळा केलीस तर निदान एकात तरी मोती सापडेल.

शंभर बाण मार म्हणजे एक तरी निशाणावर लागेल.

**ह्यासंबंधाने एक गोष्ट.**

एका मुशाफिराचा मुलगा हरवला होता, म्हणून तो रात्रभर छावणीत त्या मुलाला शोधत होता. त्याने प्रत्येक तंबूत जाऊन चौकशी केली. शेवटी त्याचे चिरंजीव रात्रीच्या काळोखात त्यास भेटले.

मी असे ऐकले की, तो जेव्हा तांड्यातील उंटस्वारास भेटला तेव्हा त्याने म्हटले, " मला माझा लाडका कसा सापडला सांगू ? जो जो मनुष्य माझ्या समोर आला तो मला माझा मुलगाच वाटला. "

थोर लोकांना सगळेच लोक मनापासून हवे असतात, कारण त्यांना वाटते की कदाचित त्यामधूनच कधीतरी सत्पुरुषाची संगत घडेल.

ते एका जीवासाठी इतका मोठा खटाटोप करतात. एका फुलासाठी शेकडो काटे ते सहन करतात !

**ह्याच विषयावर आणखी एक गोष्ट.**

एका रात्री मलाख बेटाच्या शाहजाद्याच्या मुकुटातून हिरा खाली पडला.

त्याच्या वडिलांनी त्यास विचारले, " इतक्या अंधारात तुला हिरा कोणता आणि खडा कोणता हे कसे कळले ?"

बेटा ! सगळे खडे संभाळून ठेव. कारण त्यामुळेच हिरा वगळला जाणार नाही. कारण काळयाकुट्ट अंधारात हिरे आणि खडे एकाच ठिकाणी सापडतात, तसेच उनाड लोकांच्या घोळक्यात एखादा सत्पुरुषही आत्मरंगी रंगलेला असेल.

कधी मूर्ख लोकांशी गांठ पडली, तरी त्याची खंत बाळगू नकोस. कारण त्यायोगे सुद्धा तुझी सद्गुरूशी भेट होईल.

प्रियतमाचा लोभ अनावर झाला तर प्रतिस्पर्ध्याची सुद्धा कोणी दखल घेत नाही हे तुला ठाऊक नाही काय ?

आपली पाकळी काट्याने फाटेल याची फिकीर फुलाला कधीच नसते.

ज्याच्या हृदयात रक्त असते तोच डाळिंबाच्या दाण्याप्रमाणे स्मित करतो.

एका जीवासाठी सगळ्यांचा जाच सहन कर.

एकाच्या सोयीसाठी शेकडो लोकांना सवलत दे.

अनवाणी, विस्कटलेल्या केसांचे दुःखी आत्मे पाहून ते दरिद्री फकीर आहेत अशा भावनेने त्यांची कीव करू नकोस कारण त्या लोकांना आपण परमेश्वराचे प्यारे आहोत यातच समाधान वाटत असते.

एखाद्याबद्दल तुझा ग्रह चांगला झाला नसेल, पण तुला काय ठाऊक की तो एक थोर संत (अवालिया) सुद्धा असू शकेल?

ज्यांना पाहताच लोक आपल्या घराची दारे लावून घेतात, त्यांनाच आत्मज्ञानाची (मारुफ) द्वारे उघडी आढळतात.

ज्यांच्या कपाळी हाल-अपेष्टाच आलेल्या असतात, त्यांनाच परलोकी स्वर्गाची महावस्त्रे लाभतात.

शाहजादा कैदेत असला तरीसुद्धा तू शहाणा असशील तर त्याचा सन्मान कर. कारण तो कधीतरी सुटेल आणि त्याची भरभराट झाली तर तुझाही मानमरातब वाढेल.

हिवाळ्यात उघडी पडलेली फुलझाडे जाळू नकोस.

वसंत आला म्हणजे रंगीबेरंगी फुले त्यातूनच तुला पाहावयाला मिळतील.

## १७. कृपण बाप आणि उधळ्या मुलगा.

एका इसमास खर्च करणे म्हणजे मोठे संकट वाटे. तो पैसेवाला होता, पण खाणे त्याच्या भाग्यात नव्हते. आपण खाण्यासाठी पैसे खर्च केले नाहीत, याचा त्याला आनंद वाटत असे. तेच पैसे आपल्याला उद्या उपयोगी पडतील म्हणून तो दानधर्म करण्याच्या फंदात पडत नसे. रात्रंदिवस तो पैशाबद्दलच विचार करी. धनदौलत त्या कृपणाच्या कैदेत पडून होती.

त्याच्या मुलाने एके दिवशी आपला कंजूष बाप पैसे कोठे पुरून ठेवतो ते पाहिले. त्याने तो पैसा खणून काढला आणि बरबाद केला. मला असेही कोणी सांगितले की त्या बेट्याने त्या जागी एक दगड पुरून ठेवला. तो दिलदार असल्याने त्याच्याजवळ पैसा टिकत नसे. पैसा या हाती आला तर त्या हाताने तो नाहीसा होई. बाप आपली भूक मारत होता तर मुलगा गायनवादनाच्या मैफली झडवीत होता. बाप रात्रभर दुःखीकष्टी होऊन जागाच राहिला. मुलगा सकाळी खुषीत येऊन बापाला म्हणाला, "बाबा! पैसा हा पोटासाठी असतो. पुरून ठेवावयाला पैसा कशाला हवा! दगडसुद्धा चालतो. सोने दगडापासून काढून घेतात ते एवढ्यासाठीच की अन्न, वस्त्र, चैन आणि दानधर्म यासाठी ते उपयोगी पडते."

व्यवहारी मनुष्याच्या हाती असलेले सोने जणू काही अजून दगडातच राहिल्यागत असते. जिवंत असताना तू बायकापोरांना नाखूष केलेस म्हणून त्यांनी तुझ्या मरणाची वाट पाहिली तर तुला त्याचे वाईट का वाटावे ?

शेतातील बागुलबुवाप्रमाणे असलेला धनिक माडीवरून पडून मेला तर नातलग सोसाने खातील आणि पितील.

धनदौलत बाळगून असलेला कंजूष प्राणी हा जणू काही तिजोरीवर मंत्रून ठेवलेला ताईतच असतो. इतके दिवस तो पैसा सुरक्षित असतो याचे कारण त्या तिजोरीवरचा ताईत शाबूत असतो. काही दिवसांनी स्मशानातील दगडाने लोक तो ताईत तोडतात आणि पैसाअडका आपापसांत वाटून घेतात. मुंगी जशी काबाडकष्ट करून खाद्यसामग्री गोळा करते आणि योग्य वेळी खाते त्याप्रमाणे तू सुद्धा कबरीतील किडे तुझा देह फस्त करण्याच्या अगोदर साठविलेल्या धनाचा उपभोग घे.

सादीचे वचन हे बोधामृत आहे, त्याबरहुकूम वागशील तर ते तुला उपकारक होईल. याकडे दुर्लक्ष करणे म्हणजे अवदसा आठवणे असे समज. कारण तुझे भले होण्यासाठी हा एकच मार्ग आहे.

## १८. लहानशा उपकाराचे देखील भरपूर फळ लाभतें.

एका तरुणाने दिलेल्या एका पैशाने एका म्हाताऱ्याचे काम भागले होते.

पुढे एके दिवशी त्या तरुणाने केलेल्या एका गुन्ह्याबद्दल बादशहाने त्याला वधस्तंभाकडे नेण्याचा हुकूम दिला.

वाटेत बघ्यांची गर्दी जमली. काही लोक गल्ली–बोळांतून आणि माडीवरून त्याला पाहात होते. लोकांत खळबळ माजल्यामुळे तुर्की शिपायांची तारांबळ उडाली होती.

त्या वृद्ध दरवेशाने तरुण कैद्याला घेऊन जात असताना पाहिले. त्या तरुणानेच एकदा आपल्याला मदत केली होती हे आठवून तो फार कष्टी झाला. त्याने " सुलतान मेला ! सुलतान मेला ! जग राहिले आणि सुलतानाला सद्गती मिळाली," अशी आरोळी ठोकण्यास सुरुवात केली. तो असा आक्रोश करीत असताना तुर्की शिपायांनी ऐकले. ते आपली तलवार उपसून धावून आले. लोक प्रक्षुब्ध झाले होते. लाथा बुक्क्यांचा सुकाळ झाला होता. ते अनवाणी धावत सुटले आणि राजवाड्यात जाऊन पाहतात तर काय आश्चर्य ! सुलतान तक्तावर बसलेला होता.

ह्या भाऊगर्दीत तो तरुण निसटला. पण शिपायांनी त्या म्हाताऱ्याला पकडून त्याला सुलतानासमोर उभे केले.

सुलतान त्याला धाक दाखवीत ओरडला, " मी मरावे असे तुला का वाटले ? माझी वागणूक चांगली आहे तरी तू माझ्या पाठीमागे मला शिव्याशाप का देतोस ?"

तो बहाद्दर बुड्ढा बोलला, " तुझी या देशावर हुकूमत चालते. मी ' सुलतान मेला ' अशी आरोळी ठोकल्याने तू मेला नाहीस पण एक तरुण मात्र वाचला. "

सुलतान त्याचे बोलणे ऐकून खूष झाला. तो त्याला काही बोलला नाही. त्याला त्याने थोडे दान दिले.

बिचारा तरुण धडपडत वाट फुटेल तिकडे चालला होता. एकाने त्यास विचारले, " तुला वधस्तंभाकडे नेत होते, तेव्हा तू काय किमया केलीस म्हणून तू सुटलास?" त्याने हलक्या आवाजाने त्याच्या कानात सांगितले, "मी दिलेल्या एका पैशाच्या मोबदल्यांत माझा जीव वाचला. "

आपण जमिनीत बी कशासाठी पेरतो ?

कारण आपल्या गरजेच्या वेळी फळ हाती यावे म्हणून !

जवाचा एक दाणादेखील संकटकाळी उपयोगी पडतो, हे तुला ठाऊक नाही काय ? हजरत मुसा (मोझेस) यांनी आपल्या बडग्यानेच एक मातब्बर पैलवान ओज बिन उनक याला ठार केले होते.

हजरत मुहम्मद पैगंबरांनी म्हटले ते खरे आहे. दानधर्म आणि सदाचार यामुळेच आत्मरक्षण करता येते.

सुलतान अबूबक्र आहेत, म्हणून या देशावर परचक्र येत नाही. बादशाह सलामत! तुमच्यामुळे प्रजा सुखी आहे. तुमच्या आश्रयाने प्रजाजन आनंदात आहेत, व तुम्हांस दुवा देतात. तुमच्या कारकीर्दीत कोणालाही छळ सोसावा लागला नाही. बागेतील फुलांना देखील काट्याचा उपसर्ग झाला नाही. तुम्ही म्हणजे परमेश्वराचे पृथ्वीवरील कृपाछत्र ! पैगंबरांसारखे तुम्ही सुद्धा मृत्युलोक आणि स्वर्गलोक यावर दया करणारे. तुमची किंमत कोणाला कळली नाही म्हणून काय झाले ?

तसे पाहिले तर " शबेकदर " या पुण्यरात्रीची सुद्धा किती जणांना कदर असते ?

## १९. सत्कार्याचे फळ

कोणा एकाने स्वप्नात महशरचे (अंतिम न्यायदानाच्या दिवसाचे) दृश्य पाहिले. सूर्याच्या तेजाने जमीन तापून तांब्यासारखी झाली होती. सर्वत्र हाहाकार उडाला होता. निदाघ तापामुळे कवटीतून मेंदू बाहेर पडत होता.

ह्या एवढ्या घोर परिस्थितीत देखील एक मनुष्य स्वर्गीय वस्त्रे परिधान करून सावलीत उभा होता. त्याला विचारले, " हे सरदारा, या दरबारात तुझा मदतनीस कोण ? "

त्याने उत्तर दिले, " माझ्या दारी एक द्राक्षाची वेल होती. तिच्या सावलीत एक सत्पुरुष झोपला होता. त्या परिस्थितीतील माझ्या दुष्कर्मांचे परिमार्जन व्हावे

यासाठी त्याने परमेश्वराची प्रार्थना केली. "परमेश्वरा ! याची दुरिते नष्ट कर. कधी काळी याने मला हात दिला होता. मी जे काय बोलून गेलो त्यामुळे मी एका मोठ्या कोड्याचा उलगडा केला आहे."

शिराज नरेश अबूबक्रांना विदित व्हावे. सारी पृथ्वी त्यांच्या शौर्याच्या छायेत आहे. ती निश्चित आहे आणि सुलतानांचे अन्न-संतर्पण तिला लाभले आहे.

दानशूर मनुष्य हा फळ देणारे झाड होय. त्याला सोडून पुढे जाशील तर डोंगरावरील जळाऊ लाकूडच तू पाहशील.

वाळलेल्या झाडाच्या बुंध्यालाच कुऱ्हाडीचे घाव सोसावे लागतात. फळांनी समृद्ध असे झाड कोणी तोडत नाही.

हे पादपश्रेष्ठा (अबूबक्र) तू चिरायू हो. तुझ्यापासून फळ आणि सावली दोन्ही लाभतात.

## राजकारण म्हणजे काय ?
## मुत्सद्देगिरी आणि न्यायबुद्धीचे स्वरूप काय ?

आतापर्यंत मी परोपकारी बुद्धीबद्दल पुष्कळ सांगितले खरे, पण प्रत्येकजण काही उपकारास पात्र असतो असे नाही.

ज्या मनुष्यापासून माणसांचा छळ होतो त्याचा वध करावा आणि संपत्ती लुटावी. वाईट पक्ष्याचे पंख आणि पिसे कापलेलीच बरी.

जो तुझ्या स्वामीबरोबर लढतो त्याच्या हाती दगड आणि बडगा का द्यावा ? काटेरी वृक्ष उपटून टाका आणि फळदार झाडाला सदा जपत जा.

जो हाताखालच्या नोकरांवर जुलूम करत नाही अशालाच सरदारपद द्या.

अत्याचारी मनुष्यास कधीच क्षमा करू नका. त्याच्यावर दया करणे म्हणजे प्रजेवर अत्याचार करणे होय.

जग जाळू पाहणाऱ्याचा प्राणदीप मालवून टाका. सारी प्रजा जळून खाक होण्यापेक्षा एक मनुष्य जळाला तर बरेच होईल.

तुम्ही चोराला क्षमा करता याचा अर्थ तुम्ही स्वतःच आपल्या हातांनी आपले गाव लुटता !

अत्याचारी लोकांचा नायनाट करा.

छळवादी लोकांवर केलेला अत्याचारही न्याय्य ठरतो.

## उपकारास अपात्र असलेल्यांना मदत करणे अनुचित होय.

असाच एक मनुष्य होता. त्याच्या घरात मधमाशांचे पोळे तयार झाले होते म्हणून तो घरातील माणसांच्या खुशालीबद्दल सचिंत झाला होता. त्याच्या बायकोने म्हटले, "तुम्ही काय करत आहात ? कृपा करून कोणालाही स्थानभ्रष्ट करू नका."

तो मूर्ख मनुष्य बायकोचे ऐकून निघून गेला. एके दिवशी त्या मधमाशांनी त्या बाईला डसून हैराण केले. ती बेअकली स्त्री दारात उभी राहून माडीवर चढून आणि गल्लीत येऊन आरडाओरड करू लागली आणि आपल्या नवऱ्याला बोलावू लागली.

नवरा दुकानातून घरी आला. आणि त्या मंदबुद्धी स्त्रीला रागे भरू लागला, "तू दुसऱ्यांच्या नावे खडे फोडू नकोस. गरीब मधमाशांना मारू नका असे तूच तर सांगितले होतेस."

दुष्टांना चांगले वागविणारा त्यांना अधिक दुष्ट बनवितो. जर कोणी लोकांना त्रास देण्याचा छंद घेईल, तर तीक्ष्ण तलवारीने त्याचे मुंडके उडवा.

कुत्र्याला कोणी पाटावर बसवून भरवू नये.

त्याला तर एक हाडुकसुद्धा पुरते.

शहाणे शेतकरी जाणतात की लाथ मारणाऱ्या बैलाच्या पाठीवर अधिक ओझे ठेवले म्हणजे झाले.

कोतवालाने जर चोरांना सांभाळून घेतले तर रात्रभर कोणालाही झोपता येणार नाही.

समरांगणात एक भाला हजारो उसांपेक्षा मौल्यवान ठरतो.

प्रत्येकाला द्रव्य-साहाय्य घेण्याची पात्रता नसते.

कोणला धन द्यावे. कोणाला चोप द्यावा.

तुम्ही मांजरीचे लाड केलेत तर ती तुमची कबुतरे फस्त करील.

तुम्ही जर लांडग्याला खाऊ पिऊ घालून माजू दिले, तर तो युसुफसारख्या सुंदर पुरुषाला देखील फाडून खाईल.

ज्या वास्तूचा पाया मजबूत नाही तिची उंची वाढवू नका. ती वाढलेली असेल तर तुम्ही सावध राहा.

## दूरदृष्टी आणि विवेक.

शिकारीच्या शौकीन बहराम बादशहाला त्याच्या अरबी घोड्याने खाली पाडले होते. त्याने लगेच बंदोबस्त करण्यासाठी दुसरा घोडा मागवला.

पाणी कमी असतानाच बंधारा बांधावा. पूर आला तर ते अशक्य होईल. जर लांडगा तुझ्या हाती पडला तर त्याला ठार कर! नाही तर आपल्या मेंढरांवर पाणी सोड! सैतान कधी नमाज करणार नाही. नीच मनुष्य कधी बरा वागणार नाही.

दुष्ट माणसाला मुळीच थारा देऊ नकोस.

तुझा शत्रू कैदेत असलेला बरा.

सैतान बाटलीत अडकून पडलेला बरा.

सापाला काठीनेच मारावे. परंतु तो जर दगडाखाली असेल तर त्याचे डोके ठेचावे.

जो सुलतान दुर्बळ प्रजेवर शस्त्र उगारतो त्याचे हात कलम करणे हाच त्यावर उपाय.

वाईट कायदे करणारा मुत्सद्दी तुला आगीत फेकण्यासाठी घेऊन जात असतो.

देशाला मुत्सद्दी वजिराची आवश्यकता असते. तो विनाशास आमंत्रण देत असेल, तर त्यास मुत्सद्दी वजीर म्हणू नका.

'सादी' चे हे म्हणणे भाग्यवानासच पटते. तसे आचरण केल्याने देशाची भरभराट तर होतेच, पण योग्य मार्गही तोच होय.

□ □ □

## अध्याय ३

# प्रेम

ज्यांना ईशप्रेमाची तळमळ लागली आहे, ते तरतरीत दिसत नसले किंवा जखमेवर पट्टी बांधून घेतलेले दिसले तरी ते खरे भाग्यवंत होत. त्यांना पाहून वाटते की हा जणू भिक्षेकऱ्यांचा घोळका आहे. ते राजवैभवाचा तिरस्कार करतात. पण त्यांना परमेश्वरापासून सद्गती मिळण्याची आशा असते, म्हणून ते सहनशील असतात. क्षणोक्षणी ते हाल-अपेष्टांच्या मदिरेच्या प्याला पीत असतात. ती मदिरा कडू असली, तरी ती ते मुकाट्याने सहन करतात. त्या दारूची मजा संपल्यानंतर बेहोशीची मजाही त्यांना अनुभवावयास मिळते. फुलांचा राजासुद्धा काट्यापासून मुक्त नसतो.

देवाचा गुलाम कधी आपल्या सुटकेसाठी उत्सुक नसतो. त्याने ज्याची शिकार केली त्याला आपला फास सुटावा असे वाटतच नाही.

हे लोक भिक्षेकऱ्यांच्या मलिन वेषात असले, तरी त्यांचे ते ' राजेन्द्र नेपथ्य ' च असते. त्यांची वाटचाल अनुपम सद्गतीच्या दिशेने चालू असते. त्यांचे पदचिन्ह कोणाच्याही दृष्टीस पडणार नाही.

ते प्रियतमाच्या (अल्लाह्) रागावण्यानेदेखील खिन्न होत नाहीत. मस्त उंट आपले ओझे वाढले तरी तो तोऱ्यातच चालतो.

त्यांचे सद्गुण "आबे हयात" अमृतासारखे काळोखातच असतात. म्हणजे ते सामान्यांच्या नजरेस पडत नाहीत.

ते बैतुल मुक्कदस-अलअक्सा प्रमाणे बाहेरून पडीक असून आंतून दैदीप्यमान असतात. ते पतंगाप्रमाणे दिव्यावर झडप घालतात. रेशमाच्या किड्याप्रमाणे आपल्या भोवती रेशीम गुंडाळून घेत नाहीत !

त्यांची प्रिया (देव) त्यांच्या मिठीतच असून देखील तिला ते शोधत असतात. ते नदीच्या काठी उभे असले तरी त्यांचे ओठ तहानेने कोरडेच असतात.

त्यांना पाण्याचा बाऊ वाटतो असे नाही; पण ते नीलनदीपाशी उभे असून पाण्याच्या शोधात असतात.

**प्रणयापासून परमभक्ती कशी साधावी ?**

तू जेव्हा तुझ्यासारख्या मानवाच्या प्रेमात दंग असतोस तेव्हा ते प्रेम तुझी सहनशक्ती आणि मन:शांती हरण करते. तुझ्या जागेपणी प्रियेचा चेहरा तुला मोहून

टाकतो. स्वप्नात पुन्हा तेच घडते. तू अत्यंत निष्ठेने तिच्या पावलावर मस्तक टेकतोस. प्रियेशिवाय तुला जग शून्य वाटते.

तू तिला अर्पण केलेले धन तिला कस्पटासारखे वाटले तर तुला सोने आणि माती ही दोन्ही सारख्याच मोलाची वाटतात. तिच्या भेटीनंतर तुला दुसऱ्या कोणाचीही कदर वाटत नाही. तिच्या बरोबरीने कोणासही स्थान मिळत नाही.

तू म्हणतोस की तुझ्या डोळ्यात प्रिया वास करते पण डोळे मिटल्यावरही तुझ्या हृदयात ती असतेच ना! तुझे नाव बद्‌दू होत असल्याची तुला खंत नसते आणि तुझ्या मनात सहन करण्याची ताकदही नसते. तिने तुझा प्राण मागितला तर तू तो तिच्या हातावर ठेवतोस.

तिने तलवार उपसली तर तू आपले मस्तक पुढे करतोस.

वासनामूलक प्रेम असे असते. ते नानाप्रकारचे चाळे करते आणि तुझ्यावर हुकूमत गाजवते.

मग सूफी संत आत्मरंगी रंगून जातात त्याचे तुला नवल का वाटावे ? ते त्याच्या (देवाच्या) प्रमात प्राणाचीसुद्धा परवा करीत नाहीत. प्रेमिकाच्या ध्यानात दंग झाल्यामुळे ते जगाकडे पाठ फिरवितात. ईश्वराच्या आसक्तीमुळे ते लोकांपासून दूर राहतात. मधुबालेवर[६०] इतके मोहित होतात की हातातील मदिरापात्र देखील त्याला सावरता येत नाही.

त्यांच्या दुखण्याला औषध नाही, कारण त्यांचे दुखणे कोणाला कळावयाचे नाही. " मी तुमचा देव नाही का, " हे वाक्य त्याच्या कानात घुमत असते.[६१] " होय तू आमचा देव आहेस. " ह्या वचनाचा घोषही त्यांच्या श्रोत्रात निनादत असतो

कुतुब अब्दाली गौस यासारखे काही संत समाधिस्थ आहेत. त्यांचे पाय मातीचे असले (ते जरी मानवच असले) तरी त्यांच्या श्वासाची आग (भक्ती) प्रचंड असते.

आपल्या एका आरोळीनीशी ते डोंगरसुद्धा हलवू शकतात. त्यांच्या आक्रोशाने देशालाच हादरा बसतो. ते वायूप्रमाणे अदृश्य पण द्रुतगती असतात, कस्तुरीप्रमाणे संथ पण प्रभावी असतात. ते " सुभानअल्ला " चा जप करत असतात.

सकाळी उठल्याबरोबर त्यांनी विव्हळ होऊन केलेल्या शोकामुळे त्यांच्या डोळ्यातील स्वप्नाचे काजळ आसवांनी धुऊन निघते. ध्यानस्थित मनाचा अश्व इतका थकून क्षीण झालेला असतो, तरी देखील सकाळी उठल्याबरोबर आपण काही काम केले नाही याची त्यांना खंत वाटते.[६२] त्यांच्या मनातील भक्तीची तळमळ इतकी तीव्र असते की ते भाव-समुद्रात बुडून जातात. अनन्य आसक्तीमुळे दिवस कोठे संपतो आणि रात्र कोठे सुरू होते हेही त्यांना कळत नाही.

या दुनियेच्या चित्रकारावर ते इतके मोहित झालेले असतात की सुंदर वदनाकडे त्यांचे लक्षच नसते.

सत्पुरुष कधी बाह्य सौंदर्यावर जीव टाकत नाही.

जो बेवकूफ प्राणी चेहऱ्यावर लुब्ध होतो, त्याच्या डोक्यात मेंदूच नसतो.

प्रीतिसंगमाच्या मदिरेचा आस्वाद घेणारा इहलोक आणि परलोक यांच्या-विषयी बेभान असतो.

## शाहजाद्यावर लोभ जडलेला फकीरपुत्र

एका फकिराचा मुलगा एका शाहजाद्यावर मोहित झाला होता. तो सदा त्याचाच विचार करी आणि दिवा-स्वप्नात दंग होई. आपण यशस्वी होऊ असे त्याला सारखे वाटावयाचे. मैदानातून धूळ कधी नाहीशी होत नाही; तसा तो शाहजाद्याच्या स्वारीचा पाठलाग सोडत नसे. तो शेवटी थकला आणि चिंताक्रांत झाला. त्याची व्यथा त्याच्या मनातच राहिली. प्रेमाने विव्हळ होऊन तो शोक करू लागला. तो अगदी अशक्त झाला.

त्याच्या प्रतिस्पर्ध्यांना त्याचे गुपित समजले. त्यांनी त्यास तेथे न येण्याची सक्त ताकीद दिली. थोडा वेळ तो तेथून निघून गेला. पण लगेच त्याला आपला प्यारा आठवला. पुन्हा तो आपल्या याराच्या गल्लीच्या तोंडाशी आला. एका गुला-माने त्याच्या डोक्यावर आणि हातापायावर प्रहार करून त्यास जखमी केले आणि दटावले, " येथे पुन्हा येऊ नकोस असे सांगितले होते ना ? "

पुन्हा तो निघून गेला पण त्याला चैन पडत नव्हते. प्रियदर्शनाला पाहण्यासाठी तो आतुर झाला. गुळावरून माशीला हाकलून लावले तरी ती जशी हालत नाही, तसा तो पुन्हा पुन्हा येऊन उभा राहात असे.

कोणा एकाने त्यास म्हटले, " असा काय मैलाच्या दगडासारखा येथे रुतून बसला आहेस ? तुला बडग्याने मारले आणि दगडाने ठेचले तरी तू जुमानत नाहीस याचे मला नवल वाटते. " तो म्हणाला, " बाबा, या यातना मला माझ्या प्रियकराच्या पायी भोगाव्या लागतात. तेव्हा त्याच्या जुलमीपणाची तक्रार करत बसणे हे काही योग्य नव्हे. मी माझ्या प्रेमाची तीव्रता अशीच व्यक्त करीन. मग तो मला दोस्त म्हणो किंवा दुष्मन म्हणो. त्याला भेटल्याशिवाय मला चैन पडेल अशी तू आशा करू नकोस.

खरे म्हणजे तो मला लाभला तरी माझे समाधान होईल की नाही कोणास ठाऊक ! मला सहन करण्याची ताकद नाही. आणि हा काही भांडण करण्याचा मोका नव्हे. मला तर धड उभे राहता येत नाही आणि पळून जाताही येत नाही. माझ्या प्रियतमाच्या उंबरठ्यापासून दूर व्हावयाला मला सांगू नका. आपल्या प्रिय ज्योतीवर जीव देणारा पतंग कोपऱ्यात बसून राहणाऱ्या पतंगापेक्षा श्रेष्ठ नव्हे काय ?

त्याला विचारले, "त्याने तुला जर आपल्या दांडयाने[53] हाणले तर काय करशील ?"

तो उत्तरला, "मी त्याच्या पायापाशी विटीसारखा पडून राहीन."

त्याला विचारले, "त्याने आपल्या तलवारीने तुझं डोके उडविले तर ?"

तो म्हणाला, "त्याला माझी काही हरकत नाही."

"ज्याला प्रीतिपात्र एकच असेल तो असल्या किरकोळ गोष्टींची काळजी करत नाही. माझ्या ललाटात काय भविष्य आहे ते मलाच माहीत नाही. त्याच्यावर मुकुट तरी बसेल किंवा तलवारीचे पाते तरी ! मी सहनशील नाही म्हणून रागावू नकोस.

जो प्रेमात पडला असेल त्याला धीर धरताच येत नाही. पैगंबर याकूब आपल्या प्रिय पुत्र युसुफला पाहण्यासाठी शोक करत होते. रडून रडून ते आंधळे झाले पण त्यांनी युसुफला पाहण्याची आस सोडली नाही, तितकाच मीही अधीर आहे."

नंतर एके दिवशी घोडयावर स्वार झालेल्या शाहजाद्याच्या रिकिबीस त्या तरुणाने आपले ओठ लावले व हसून म्हटले, "हे शाहजाद्या ! लगाम वळवू नकोस कारण बादशाहा कधी आपले तोंड फिरवत नाही. मी तुझ्यावर स्वतःला ओवाळून टाकले आहे. तुझ्या स्मरणाने मी स्वतःला विसरून गेलो आहे. तुझी रिकीब पकडण्याची माझी हिंमत कशी झाली सांगू ? मी व तू अशी दोन वेगळी अस्तित्वे मी मानीत नाही.

मी माझे नाव आणि खूण केव्हाच नाहीशी केली आहे. माझे म्हणून जे काही होते ते पण समर्पण केले आहे. मला तुझ्या मत्त चक्षूंच्या बाणाने घायाळ केले आहे मग माझ्यावर फुकट समशेर कशाला चालवतोस ? तू गवताच्या रानात आग लाव आणि बाजूला हो. जंगलातील सुक्याबरोबर ओले ही जळून खाक होईल."

## प्रेम करणारे आत्माहुती देतात.

एका गाणाऱ्याच्या तालावर एकजण नाचत होता. त्याच्याभोवती जमलेल्यांची मने प्रेमाने पेटली; तर नाचणाऱ्याचे कपडे त्याच्या बेभानपणामळे मैफलीतील ज्योतीने पेटले. तो फार अस्वस्थ झाला आणि रागाने संतापला. तेव्हा एकाने त्यास म्हटले, "आशिक लोकांबद्दल भिती का बाळगतोस ?"

"मित्रा, मैफलीच्या ज्योतीने तुझे कपडेच काय ते पेटले. पण प्रेमाने माझे सर्वस्वच होरपळले आहे. तू प्रेमी असशील तर त्याबद्दल वाता मारू नकोस कारण प्रेमाने पछाडले तर आशिक माशुकांचें द्वैतच कुफ्र म्हणजे अधर्म होऊन जाते.

## धुंद प्रेमिकांचे चाळे.

मला एका म्हाताऱ्याने ही गोष्ट सांगितली. एका प्रेमवेडयाने रानाचा रस्ता

धरला. त्यामुळे त्याच्या बापाने तर जेवणच टाकले. हितचिंतकांनी त्याला नावे ठेवली. पण तो म्हणाला, "माझ्या प्रियतमाने मला स्वीकारल्यानंतर या जगात कोणाशीच माझे नाते आणि संबंध राहिले नाहीत."

परमेश्वराने मला आपले दर्शन दिल्यानंतर मी पूर्वी जे पाहिले ते सर्वच कपोलकल्पित वाटू लागले.

प्रपंचाकडे पाठ फिरविणारा हरवला असे होत नाही. त्या उलट त्यानेच जे हरवले होते ते त्याला परत मिळाले असा त्याचा अर्थ होतो.]

या जगात संत्रस्त स्थितीत वावरणाऱ्यांना कोणी पशू म्हणतो, कोणी देवदूत म्हणतो. ते देवदूतांप्रमाणे देवाच्या ध्यानी मग्न असतात आणि जनावरांप्रमाणे ते माणसांना पाहून पळत सुटतात. ते थोराड असतात, किरकोळ असतात, हुषार असतात, हुच्च असतात आणि उन्मत्तही असतात.

ते कधी शांतपणे एका कोपऱ्यात कंथा शिवत बसलेले असतात. तर कधी कधी भरल्या मैफलीत तल्लीन होऊन आपली कंथाच जळू देतात. ते कधी आपला नफा-तोटा पाहात नाहीत, की कोणाची तमाही बाळगत नाहीत. ते आत्मरंगात रंगले म्हणजे दुसऱ्यांना तेथे शिरकाव नसतो. त्यांची विचारशक्ती क्षीण झालेली असते. त्यांना कशाचीही जाणीव नसते. जर कोणी त्यांना काही शहाणपण शिकविण्यास गेला तर, त्यांनी लगेच आपले तोंड फिरविलेच म्हणून समजा. बदक कधी सागरात बुडून मरते काय?

अग्निकीटकाला भाजल्याचे दुःख कसे समजणार? प्रेमाने पिसाट झालेला कफल्लक असूनही कधी दैन्य भाकत नाही. रानोमाळ भटकताना त्यांना काफिल्याची सोबत लागत नाही. त्यांना कधी लोकप्रिय होण्याची हाव नसते. कारण देवाला आपण प्रिय असलो म्हणजे बस असे त्यांना वाटते. आपले आगळे अस्तित्व जन-सामान्यांपासून लपवून ठेवण्यासाठी ते चारचौघांसारखाच पोशाख करतात. ते इमानदारांचा आव आणणारे काफर नसतात. ते द्राक्षाच्या वेलीप्रमाणे फळ आणि सावली देणारे असतात. ते कधी आम्हा पाप्यांप्रमाणे नीलांबरधारी सूफी म्हणून मिरवित नाहीत. ते शिंपल्याप्रमाणे सतेज अंतःकरणाचे असतात. समुद्राप्रमाणे ते फेस फेकणारे (ढोंगी) नसतात. चामडीमध्ये गुंडाळलेल्या हाडाला कोणी मनुष्य म्हणत नाही. त्याचप्रमाणे बाहेरून साजिरे गोजिरे दिसणारे सत्त्वसंपन्न असतेच असे नाही.

सुलतान असला म्हणून काय झाले? तो सर्व गुलामांना विकत घेऊ शकेल काय? गोधडीत गुरफटलेला प्रत्येक जण संतशिरोमणी नसतो. जर प्रत्येक गारेचा मोती बनेल तर बाजारात कवड्यांच्या राशीप्रमाणेच मोत्यांची रास लागेल. परमेश्वराचे अनन्य भक्त डोंबाऱ्याप्रमाणे आपल्या पायाला लाकूड बांधून घेत

नाहीत. कारण लाकडी पाय वर उचलणे कठीण असते. घोडाच लाकडी असल्यास मात्र लाकडी पाय दोरीने बांधावे लागतात.

अनंताच्या गाभाऱ्यातील ही दोस्त मंडळी प्रेमसुधेचा एकच घोट घेऊन कल्पांताची घंटा[६५] वाजेपर्यंत मस्तीत राहतात. त्यांचा निर्धार नंगी तलवार पाहून बदलत नाही.

प्रेमात मस्त असणे आणि स्वतःच्या बचावाची फिकीर करणे, ह्या दोन्ही गोष्टी काच आणि दगड याप्रमाणे एकमेकांला मारक होत.

**आत्मरंगी रंगणे आणि प्रेमाचे साम्राज्य.**

समरकंद शहरात एका मनुष्याचा प्रियतम राहात असे. तो बोलत असताना ते बोलणे आहे असे भासत नसे; तर तो खडीसाखर उधळत आहे असे वाटे. रुपात तो सूर्याला मागे टाकणारा होता. त्याच्या प्रेमाच्या चाळ्यामुळे संयमी लोक अस्वस्थ होत असत. त्याचे अप्रतिम सौंदर्य पाहून तुम्हांस वाटावे की ही देवाच्या कृपेचीच ग्वाही असावी. तो रस्त्याने चालला की लोकांच्या नजरा त्याच्यामागून धावत असत. प्रेमी लोक त्याच्या घामाच्या एकेका थेंबावर देखील आपला प्राण कुरबान करण्यास उत्सुक असत.

ह्या आशिकाने देखील चोरट्या नजरेने माशुकाला पाहून घेतले. तेव्हा माशुक रागावून बोलला, " बेशरम प्राण्या, माझ्यामागे लागून तू किती दिवस फिरणार ? मी काही तुझ्या जाळ्यात सापडणारे पाखरू नव्हे. मी पुन्हा तुला माझ्या मागोमाग येताना पाहिले तर माझा शत्रू समजून तलवारीने तुझे मस्तक धडावेगळे करीन. "

एका तिऱ्हाईताने त्या आशिकास म्हटले, " पुरे झाले. जा आता रस्ता धर आणि यापेक्षा थोडे कमी जोखमीचे काम कर. तुला ही हौस पुरी करता येणार नाही, असे मला वाटते. उलट तुला आपल्या प्राणाला सुद्धा मुकावे लागेल ! "

त्या सच्चा आशिकाने आपली निर्भर्त्सना ऐकली. त्याची प्रेमविव्हलता अनावर झाली होती. तो म्हणाला, " मला नावे ठेवण्याचे बंद करा. माशुकाच्या तलवारीने माझा अंत झाला तर माझा देह रक्तबंबाळ होऊन धुळीत मिसळल्याचा मला आनंदच होईल. माझ्या माशुकाच्या गल्लीतून पळ काढणे मला पसंत नाही. त्या निर्दयाला माझी अब्रू काढू नकोस असे सांगा. तुम्ही मला पश्चात्ताप करण्यास सांगत आहात. खरे पाहिले तर तुम्हालाच असा रिकामटेकडा उपदेश केल्याचा पश्चात्ताप वाटावा. मला काही सांगण्याच्या भरीस पडू नका. माझ्या माशुकाला जे करावयाचे आहे ते खुशाल करू द्या. माझा खून करण्याचा त्याचा उद्देश असेल तर तो स्तुत्य आहे. तसा प्रत्येक रात्री त्याच्या प्रेमानलाने माझा दाह होतो व सकाळी त्याच्या दिशेकडून येणाऱ्या सुगंधित समीराने मी पुन्हा जिवंत होतो. आज मी माशुकाच्या गल्लीत प्राण दिला तर कल्पांत झाल्यावर त्याच्या शेजारीच माझा तंबू राहील. "

प्रणयाच्या समरांगणात शक्य तो आपली पाठ दाखवू नकोस. 'सअदी' सुद्धा जिवंत आहे याचे कारण म्हणजे प्रेमाने त्याला ठार केले होते.

## प्रेमी लोकांचे आत्मार्पण आणि त्याबद्दल त्यांना वाटणारी धन्यता

एकजण तृषार्त होऊन मरणास टेकला होता. त्याला वाटे की पाण्यात बुडून मरणारे किती भाग्यवान! एका मंदबुद्धी इसमाने त्याला विचारले, "तू तर मरणार! मग जगात पाणीच पाणी झाले काय किंवा अवर्षण झाले काय, दोन्ही तुला सारखीच." त्याने उत्तर दिले, "साहेब! माझे ओठ ओले व्हावेत असे जे मला वाटते ते काही त्यापासून मला आराम वाटेल यासाठी नव्हे. पण माझी इच्छा एवढीच आहे की माझे प्रिय प्राण तहानेने तडफडत जाण्यापेक्षा त्यांचे सुखासमाधानाने उत्क्रमण व्हावे. तहानेने व्याकुळ झालेला तृप्त होऊन मरण यावे या इच्छेने पाण्यात बुडतो."

तू जर खरा प्रेमी असशील तर प्रियेचा पदर घट्ट पकड. तिने तुझे प्राण मागितले तरी तू खुशाल देऊन टाक.

आत्यंतिक हालअपेष्टांना तोंड दिल्याशिवाय स्वर्गाची गोडी कळणार नाही जो जमीन कसतो त्याला कोणत्याच कष्टाची क्षिती वाटत नाही. पण जेव्हा खळघात पीक येऊन पडते, तेव्हा तो सुखाने झोपतो. इष्काच्या सामन्यात प्राणपणाने लढणाराच विजयी वीर होय.

## प्रेमपंथीयांची सहनशीलता आणि स्थैर्य

इष्कबाज लोकांनी म्हटले आहे की प्रेमी हे स्नेहधनाने समृद्ध पण लौकिक ऐश्वर्याच्या दृष्टीने कफल्लक असतात. एके दिवशी सकाळी एक वृद्ध भिक्षेकरी एका मशिदीसमोर जाऊन उभा ठाकला. मशीद उघडी होती, म्हणून त्याने याचना केली. तेव्हा तेथील एकाने त्यास म्हटले, "पुढे चालू लाग. येथे सगळे बेवारशीच राहतात. तुला पै-पैसा देणारा कोणी भेटणार नाही. उगाच ताटकळू नकोस." फकिराने विचारले, "कोणास काहीही न देणारा असा घरचा मालक आहे तरी कोण?',

एकजण त्याला दटावून म्हणाला, "खामोश? ह्या घरचा मालक खुदा आहे हे तुला ठाऊक नाही काय?"

त्या भिकाऱ्याने वर मान करून कंदील आणि महिरप पाहिली. अत्यंत विव्हळ होऊन उसासा टाकत तो म्हणाला, "या घरापासून पुढे चालणे शोचनीय आहे. येथून रिकाम्या हाताने परत जाणे म्हणजे मोठे संकटच. मला कोणत्याही दारापासून रिक्त हस्ताने परतावे लागत नाही. मग खुदातालाच्या घरापासून मी हात हालवीत कसा जाऊ? जेथे मला काही तरी मिळण्यासारखे असते तेथेच मी हात पसरतो."

मला असे कळले की तो तेथे एक वर्षभर बसला आणि हात पसरून त्याने प्रार्थना केली. एका रात्री त्याची प्राणज्योत मंद होऊ लागली. अशक्ततेमुळे तो

तडफडू लागला. पहाटेच्या वेळी एक जण कंदील घेऊन त्याच्यापाशी आला. प्रभात-कालीन प्रदीपाप्रमाणे त्याची प्राणज्योत निस्तेज झाली होती. तो आनंदाने आक्रंदत होता, "दयाघनाचा दरवाजा सदैव उघडा असतो."

खरा प्रेमी सोशीक असला पाहिजे. ज्याला किमया करता येते तो मलूल झाल्याचे माझ्या ऐकिवात नाही. ज्या किमयागाराला तांब्यापासून सोने बनविण्याची हाव असते तो प्रयोगशाळेत ढीगभर सोने मातीमोल करत असतो. वाटेल ते विकत घेण्यासाठी सोने उपयोगी आहे; पण त्याने प्रियेचा नखरा आणि रंगढंग एवढेच विकत घेता येतात.

एका माशुकाने तुला धक्का दिला तर दुसरा कोणी तरी तुला आराम देण्यास पुढे येईल. एका माशुकाने दगा दिल्याची चिंता करू नकोस. दुसऱ्या एका माशुकाला हाताशी धरून पहिल्याचा पाणउतारा कर.

जर प्रिया अप्रतिम सुंदर असेल तर मनोव्यथेपायी तिच्याशी असलेला संबंध तोडू नकोस. ज्याच्यापासून तुझे काही अडणार नाही असे तुला वाटते त्याला आपल्या मनातून घालवून देता येते.

## खरा प्रेमी प्रियेच्या बेइमानीने खिन्न होत नाही

एका परम देवभक्ताने रात्रभर उपासना केली, आणि सकाळी वरदानासाठी हात वर केले. त्या वृद्धाच्या कानात अज्ञात आवाज (हातिफ गैबी) घुमला, "तुझी प्रार्थना फुकट गेली, ऊठ! चालू लाग. या दारी तुझी हाक कोणी मानत नाही. अपमान करून घेऊन पुढे हो किंवा रडत येथेच उभा राहा."

दुसऱ्याही रात्री त्याने जागून प्रार्थना केली. एका भाविकाला त्याची हकीकत कळली व त्याने विचारले, "तुझे इष्ट साध्य होत नाही हे कळून देखील तू आपला वेळ या कामात व्यर्थ का घालवतोस?" कष्टाने विव्हळ होऊन त्याने म्हटले "माझ्या प्रियतमाने माझी उपेक्षा केली म्हणून मी हताश का व्हावे? मी निराश झालो असतो तर यापेक्षा दुसरा एखादा चांगला मार्ग खचित पत्करला असता. याचकाला काय वेचावे लागते? एका दारी काही लाभले नाही तर दुसरे दार गाठावे. या गल्लीतून मला जाता येणार नाही असे कळते. पण करणार काय, मला दुसरा रस्ता तरी कोठे आहे?"

तो असे बोलत असतानाच त्याचे शीर भूमीवर कुरबान होण्यासाठी झुकले. अज्ञातातून दैवी आवाज त्याच्या क्षीण प्राणास चेतवीत होता.

"ह्याची निष्ठा तितकीशी उच्च कोटीची नसली, तरी ती आम्हांस पसंत आहे. कारण, शेवटी माझ्याशिवाय ह्याला शरण जाण्याला ठिकाण नाही."

### गोष्ट

इराकमधील निशापूर शहरातील एका माणसाचा मुलगा रात्रीचा नमाज न पढता झोपला. तेव्हा तो माणूस काय म्हणाला ते तुला माहीत आहे? बेटा! खटपट केल्याशिवाय तुला सर्व काही मिळेल, अशी समजूत करून घेऊ नकोस. जवाच्या शेतात कापणी झाल्यावर उगवणारी फालतू रोपटी हिरवीगार असतात पण फलदायी नसतात.

ती उगवली काय अन् न उगवली काय? तू फायदा करून घेण्याची इच्छा बाळग आणि तोटा टाळ. पण कसलाच तोटा होऊ न देणारे शेवटी कमनशिबीच ठरतात.

### असह्य प्रेमव्यथा कशी सोसावी?

एका नव्या नवरीने आपल्या नाठाळ नवऱ्याबद्दल आपल्या बापाजवळ तक्रार केली; "मी ह्या आडमुठ्या पोराशी माझी हयात घालवावी, अशी इच्छा करू नका. आमच्या गल्लीत राहणाऱ्यांपैकी कोणीही माझ्याप्रमाणे जिणे कंठत असेल असे वाटत नाही. प्रत्येक जोडपे एकाच शेंगेतील दोन दाण्याप्रमाणे एकत्र नांदते. मी माझा नवरा माझ्यासमोर हसत खिदळत असलेला कधीच पाहिला नाही."

त्या भाग्यवान पित्याने आपल्या पोरीची कहाणी ऐकली. वयस्कर लोक चतुर असतात हेच खरे! त्या वृद्धाने आपल्या वयाला अनुसरून काय छान सल्ला दिला!

"तो देखणा आहे ना. झाले तर मग! पोरी तू त्याचा छळ सोस! असल्या तरुणाशी बेबनाव होणे अयोग्य आहे. असला दुसरा कोणी लाभणे दुरापास्त आहे. तो फटकून वागला म्हणून तू का तोंड फिरवितेस? आपले सर्वस्व त्याच्यावर ओवाळून टाक. ईश्वरी आदेशाचे निष्ठेने पालन कर. ह्याच्यासारखा धनी तुला दुसरा कोणी मिळणार नाही.

### औषधापेक्षा आजारच बरा

इराणातील मरव या शहरी एक देखणा वैद्य होता. त्याची सुडौल देहयष्टी म्हणजे जणुकाही मानस उपवनातील सुरूचे झाडच! आपल्यावर मोहित होणाऱ्यांच्या मनाची यातना त्याला कळत नसे. तसेच आपल्या चेहऱ्याला विलक्षण शोभा देणाऱ्या आपल्या नेत्रांचीही त्याला जाणीव नव्हती.

एका परदेशी प्रेमातुराने म्हटले, "ह्या गोड वैद्याच्या सहवासात वेळ छान गेला खरा! पण मला आपले दुखणे बरे व्हावे असे कधीच वाटले नाही, कारण समजा मी बरा झालो! तर मग मला असल्या गुलछबू वैद्याचा सहवास कसा लाभणार?"

शहाणे सुरते असलेल्या शेकडो लोकांवर प्रेमाचे पिसे मात करते. एकदा जर प्रणयाने प्रज्ञेवर मात केली की सारे काहीच आटोपले! ती अक्कल पुन्हा कधीही डोके वर काढूच शकत नाही.

## प्रेमाचा प्रज्ञेवर विजय

एका इसमाने दंड-बैठका काढून शरीर कमावले होते आणि त्याला वाघाशी टक्कर देण्याची हौस होती. पण जेव्हा रानात एकदा प्रत्यक्ष वाघाने त्याच्यावर झडप घातली तेव्हा मात्र त्याला वाटू लागले की आपल्या मनगटात पुरेसा जोर नाही !

एकाने त्यास म्हटले, "असा काय बाईसारखा पडून आहेस ! आपल्या वज्र-मुठीने दे त्याला दणका ! "

वाघाच्या तावडीत सापडलेल्याने खालच्या मानेने उत्तर दिले, "बाबा ! वाघाशी झुंज द्यावयाला ही माझी मूठ पुरेशी नाही."

प्रेमाच्या तावडीत सापडलेल्या प्रज्ञेची गत देखील वाघाच्या मिठीत सापडलेल्या मल्लासारखीच होते.

तू जर प्रणयाच्या पाशात बंदिस्त असशील तर वेदांताचे कोणतेच अस्त्र तुला सोडवू शकणार नाही. प्रेमाच्या प्रांगणात पाय ठेवताच अकलेचा निरोप घ्यावा, कारण प्रेमाच्या कह्यात आलेल्या अकलेची चेंडूसारखी दैना होते."

## माशुकाबद्दल आशिकाला वाटणारा आदर

एकदा एका चुलत भाऊबहिणीचे लग्न झाले. जोडपे फार कुलीन होते. नवरी मनाजोगता पती लाभल्याच्या खुषीत होती. पण नवऱ्याला आपली बायको आवडली नाही. मुलगी फार देखणी आणि सुस्वभावी होती. तर नवरा सदान्‌कदा घुमा आणि हिरमुसलेला असावयाचा ! गावातील वडिलधाऱ्या मंडळींनी त्या मुलाला बोलावून बायको नावडती असेल तर तिचे स्त्रीधन (दहेज) परत करण्यास सांगितले. तो हसून म्हणाला, "शंभर मेंढ्या देऊन लग्नाच्या बेडीतून सुटका करून घेणे तसे काही अडचणीचे नाही."

मुलीने त्रागा करून आपले तोंड ओरबाडून घेतले आणि म्हणाली, "पण एवढ्याने मला माझ्या लाडक्याचा विरह सोसवणार नाही. तो जरी नाखूष होऊन फटकून वागला तरी मला चालेल. मी तर त्याच्यावर भाळलेली आहे. त्याने माझी पर्वा केली नाही तरी माझे काही बिघडत नाही. आम्ही दोघे असेच मिळून राहू. माझा छळ झाला तरी मी प्रेमच करीन. शंभर मेंढ्या काय आणि तीन लाख मेंढ्या काय ? त्यांच्या मोबदल्यात मी प्रियदर्शनाला पारखी होऊ म्हणता ! छे ! छे ! ते अशक्य आहे."

प्रियाचा जो गुण तुला मुग्ध करतो त्याच्यापासूनच खरे पाहता तुला विरंगुळा मिळतो. एकाने एका दुःखी माणसाला विचारले, "तुला स्वर्ग हवा की नरक ?" तेव्हा त्याने उत्तर दिले, "मला हा प्रश्न विचारू नका. ईश्वराने माझ्यासाठी जे काही ठरवून ठेवले असेल तेच मला पसंत आहे."

### लैलावर मजनूचे खरे प्रेम

एकाने मजनूला म्हटले, " भाग्यवंता ! तुला झाले आहे तरी काय ? तू आताशा " ह्या " कुळाकडे फिरकत का नाहीस ? कदाचित आताशा लैला तुझ्या मनातून उतरली असेल, म्हणूनच तुझी वृत्ती बदलली आहे. तू तिची उपेक्षा करतोस असे वाटते. "

हे ऐकून बिचारा मजनू रडू लागला आणि म्हणाला, " अहो सरदार ! आता माझा पिच्छा पुरवू नका. माझेच दु:ख मला पुरेसे आहे. त्यात माझ्या जखमेवर तुम्ही मीठ चोळू नका. दूर राहणे म्हणजे मन विटल्यासारखे लक्षण नव्हे, कारण कित्येकदा थोडे दूर राहणेच अगत्याचे असते. "

तो इसम पुन्हा म्हणाला, " जर तुला लैलाला काही निरोप पाठवावयाचा असेल तर सांग ! "

मजनू म्हणाला, " तिच्यासमोर माझे नाव उच्चारू नका कारण ती ज्या ठिकाणी राहते त्या समाजात माझे नाव काढल्याने प्रक्षोभ होईल. "

### सुलतान महमूदाचे गुलाम अयाजवरील उत्कट प्रेम आणि अयाजचा सुशील स्वभाव

कोणा एकाने गजनीच्या महमूद सुलतानाची टिंगल करून म्हटले की त्याचे अयाजसारख्या आपल्या कुरूप गुलामावरील प्रेम आचरटपणाचे आहे. ज्या फुलाला रंग किंवा सुवास नसतो त्या फुलावर बुलबुलाने मोहित होणे विचित्रच म्हटले पाहिजे.

एकजण सुलतानाच्या कानी लागला आणि ही हकीकत त्याने त्यास सांगितली. आपली टीका ऐकून तो बेचैन झाला. तो म्हणाला, " माझे प्रेम त्याच्या स्वभावावर जडलेले आहे. त्याच्या सडसडीत सुंदर देहयष्टीवर मुळीच नाही."

मला कोणीतरी सांगितले की बादशहाचा उंट अरुंद बोळात खाली पडला आणि त्याच्या पाठीवरील मोत्यांची पेटी फुटली. बादशहाने दासांना ती संपत्ती वेचून घेण्याची आज्ञा दिली, आणि स्वत: स्वार होऊन निघून गेला. इतर दास मनसोक्त मोती वेचू लागले. बादशहा दूर गेला होता आणि गुलाम मोती वेचण्यात दंग झाले होते. महमूदाच्या गुलामांपैकी अयाजखेरीज कोणीच त्याच्याबरोबर गेला नव्हता. तेव्हा महमूद अयाजला म्हणाला, " कुरळे केस असलेल्या माझ्या लाडक्या ! तू लुटीतून आपल्याबरोबर काय आणले आहेस ? " महमूद म्हणाला , " मी काहीच आणले नाही. मी आपल्यामागून आलो आहे. मला आपल्या सेवेपेक्षा दुसऱ्या कोणत्याच बाबतीत गोडी वाटत नाही. "

तुम्हांस जर सुलतानाचे सान्निध्य लाभले असेल तर आपली चंगळ करून घेण्याच्या नादात बादशहाबद्दल गाफील राहू नका.

कोणी साधुसंत, वली, देव प्रसन्न झाल्यावर देवाच्या भेटीशिवाय इतर काही मागणे हे भक्तिपंथाच्या तत्त्वाला सोडून आहे. आपला मित्र आपल्याला मदत करील म्हणून तुम्ही स्नेह संपादन कराल तर तुम्हांस आपला मतलब साधता येईल. जोपर्यंत स्वार्थाने प्रेरित होऊन तोंड उघडे ठेवतोस तोपर्यंत तुला पारमार्थिक मर्म कळणार नाही.

सत्य हा एक सुशोभित प्रासाद होय, आणि स्वार्थ आणि लोभ ही त्याच्या भोवती उडणारी धूळ होय.

धुळीने व्यापलेल्या जागी तुझी नजर तीक्ष्ण असली तरी तुला काही दिसणार नाही. हे तुला ठाऊक नाही काय ?

**'धोपटमार्गा सोडू नको.'**

एकदा योगायोगाने मी आणि फारयावचा[६८] वयस्कर मनुष्य असे दोघेही पश्चिमेच्या समुद्रकिनाऱ्याला पोहोचलो. माझ्यापाशी एक दिरमाचे नाणे होते. नावाड्याने मला नावेत घेतले. पण त्या बुढ्ढ्या फकिराला घेतले नाही. तांडेलांनी नाव भरधाव चालविली. नावाडी देवभोळा मनुष्य नव्हता. मला माझ्या साथीदाराबद्दल वाईट वाटले, पण तो वृद्ध माझा शोक पाहून हसला, आणि म्हणाला, "अरे शहाण्या यात काय वाईट वाटून घेण्यासारखे आहे ? ज्याच्यामुळे नाव पैलतीरी जाऊ शकते, तोच मलासुद्धा नेईल." त्याने पाण्यावर आपले नमाजाचे आसन (जानमाज) पसरले, आणि नदी पार केली. ते सत्य होते की स्वप्न होते कोणास ठाऊक ?

माझे भान हरपल्यामुळे मला रात्री झोप लागली नाही. सकाळी त्याने मला पाहून म्हटले, "भल्या माणसा ! बुचकळ्यात का पडलास ? तू होडीतून आलास आणि मला देवाने आणले.

चक्षुर्वैसत्यं म्हणणाऱ्याचा मी सांगतो त्यावर विश्वास बसणार नाही, पण साधुसंत पीर वली हे पाणी आणि अग्नी या दोन्हीवरून चालू शकतात.

मुलाला आगीपासून होणारा धोका कळत नसला तरी त्याची आई त्याचे संरक्षण करतेच की नाही ? आत्मरंगी रंगणारे लोक देवाला आवडतात, म्हणूनच तो त्यांना वाचवितो.

त्यानेच आपला मित्र इब्राहिम खलीलुल्ला यांस आगीपासून वाचविले. पैगंबर मूसाला ज्या पेटीत बंद करून नील नदीत सोडले होते ती पेटी त्यानेच सुरक्षित पैलतीरी नेली.

जो मुलगा पोहणाऱ्याचा हात पकडतो त्याला समुद्र कितीही खोल असला तरी त्याची चिंता नसते.

जमिनीवर चालतानाच जर तुझी फटफजिती होते तर तू वली पीर याप्रमाणे पाण्यावरून कसा चालून जाशील ?"

## नश्वर सृष्टी आणि ईश-लीला

सन्मार्ग म्हणजे काय ? न उलगडणाऱ्या कोडयांशी सतत संबंध !

अनमोल वस्तू कोणती ? ज्ञानी लोकांच्या मते देवाचे रूप.

ज्यांना सत्याची जाणीव आहे त्यांना पटविणे सोपे आहे. पण तत्त्ववेत्ते व बुद्धिप्रामाण्यवादी याला नावे ठेवतात. ते विचारतात,

"आकाश म्हणजे काय ? पृथ्वी म्हणजे काय ? मानव, पशू, श्वापद हे कोण आहेत ? "

शाबास ! छान प्रश्न विचारलेस ! तुला हवे असेल तर मी त्याची उत्तरे देतो.

जे काही अस्तित्वात आहे ते सर्व देवासमोर काडीमोलाचे आहे.

तो आहे म्हणूनच त्यांनाही अस्तित्वाची संज्ञा प्राप्त होते. तुमच्या छोटेखानी देहापुढे समुद्र अफाट वाटतो. आकाश आपल्या अतर्क्य उंचीमुळे अनंत वाटते.

लौकिक दृष्टी असलेल्यांना ज्ञानी लोक वेगळयाच विश्वात वावरत असतात हे कसे समजेल ?

सूर्याला एक तेजाचा कण या पलीकडे ते काहीच किंमत देत नाहीत.

त्यांना सात समुद्र हे पाण्याच्या थेंबाएवढेही वाटत नसतात.

परमेश्वराने आपली सार्वभौमत्वाची पताका फडकावताच सारे जग आपले मस्तक विलयाच्या पडद्यामागे लपविते. मर्त्यांची कुवत कितपत असते याची जाणीव देवाच्या भक्तांनाच असते. संसारी माणसांना ती नसते.

## बादशहाचे लष्कर आणि पाटीलबुवा

एक लष्कर कूच करीत होते. त्या वाटेने पाटीलबुवा आणि त्यांचा मुलगा हेही निघाले होते. मुलाने भाले, बरच्या व तलवारी पाहिल्या, जरीपटक्यांचा आणि कंबरबंदाचा झोक पाहिला.

तिरकमठे घेऊन गुलाम चालले होते. धनुष्य घेऊन धनुर्धारी चालले होते. मुलाने त्यांना पाहिल्यानंतर त्याला आपला बाप म्हणजे काही तरीच सोंग आहे असे वाटू लागले. तो घाबरला. त्याचा चेहरा फिक्का पडला. जीव मुठीत धरून तो लपण्यासाठी पळू लागला. मुलाने बापास म्हटले, "बाबा ! तुम्ही गावचे पाटील. तसे म्हटले तर पाटलात तुम्हीच श्रेष्ठ खरे ! पण तुम्हांला झाले आहे तरी काय ? बादशहाला पाहून तुम्हांस कापरे का भरले आहे ? पाटील बोलले, "होय बेटा मी सरदार आहे खरा पण माझा मान आपल्या गावाच्या हद्दीतच काय तो आहे. बादशहाच्या दरबारात जाताना मोठमोठया सरदारांचे देखील पाय लटपटतात."

प्राण्या तू असाच अज्ञानी आहेस व आपल्याला सरदार समजतोस. ज्यावर सादीची मल्लिनाथी सापडत नाही असे कोणतेच साहित्य नाही !

## एका काजव्याची गोष्ट

तुम्हांला ठाऊक असेलच की रात्रीच्यावेळी रानावनात काजवा मोठया दिमाखाने चमकत असतो. त्याला एकाने विचारले, " रात्री तू एवढया डौलाने मिरवतोस, पण दिवसा दृष्टीससुद्धा का पडत नाहीस ? " त्या क्षुल्लक कीटकाने किती शहाणपणाचे उत्तर दिले ते पाहा.

" मी दिवसा, रात्री सतत जंगलात उडत असतो, पण सूर्यामुळे मी कोणास दिसतच नसतो. "

## सुलतान अताबक साद बिन जंगी आणि एक हुशार मनुष्य

कोणा एकाने साद जंगीची ( त्याच्या कबरीवर खुदाची कृपा असो ) तारीफ केली. त्याने आपल्या ऐश्वर्यास साजेल अशा रीतीने त्यास पोषाख आणि द्रव्य देऊन त्याचा गौरव केला. भाटाने नाण्यांवर " अल्ला हो बस "[६१] असे लिहिलेले पाहिले आणि त्याने आक्रोश करून पोषाख काढून फेकला. त्याला ईश्वराची ऊब इतकी जाणवली की त्याने पळून जाऊन रान गाठले. जंगलातील सोबत्यांपैकी एकाने त्यास विचारले, " काय बुवा ! तुझी वृत्तीच बदलून जावी असे तू काय पाहिलेस ? प्रथम तूच सुलतानाच्या दरबारात कुर्निसात करून तीन वेळा जमिनीस ओठ लावलेस मग तुला पाठ फिरवून सुटण्याचे काही एक कारण नव्हते. " तो हसून म्हणाला, "अगोदर आशा आणि भीती यामुळे मी वेताप्रमाणे थरथर कापत होतो. पण जेव्हा मी नाण्यांवर " अल्लाहो बस " असे लिहिलेले पाहिले तेव्हा कोणत्याही गोष्टीची किंवा व्यक्तीची भीती नाहीशी झाली. "

## एका आत्मज्ञान्याची गोष्ट

इराकमधील एका शहरात अफवा उठली होती की कोणा एका कुलीन गृहस्थाला वहिमावरून पकडले आहे. त्याच्या हातांपायांत बेडया पडल्या असताना तो जे बोलला ते अजून माझ्या कानात घुमत आहे. तो म्हणाला की, " जर बादशहाने हुकूम दिला नसता तर मला पकडण्याची कोणाची बिशाद होती ? जर माझा दोस्त माझ्यावर पाळत ठेवण्यासाठी एखादा मारेकरी नेमत असेल तर मी त्याच्याशी मैत्रीच करीन. माझ्या हातात व पायात बेडया पडल्या काय किंवा कोणी मला तक्तावर बसविले काय, मी दोन्ही खुदाचीच करणी समजेन. कारण, तसे करणे हे येरा गबाळयाचे काम नव्हे ! " वैद्याने तुला कडू औषध पाठविले तर आपल्याला काय झाले आहे अशी काळजी करू नकोस. " प्रियदर्शन " जे काही देईल ते खा ! कारण आजारी माणसाला वैद्यापेक्षा अधिक काही कळत नसते.

## एक साधू दरवेश

जशी एकदा माझी गत झाली होती तशीच एकाचे मन कोणा एका प्रियपात्रावर जडले असताना त्याचीही झाली ! प्रथम त्याला शहाणा व विद्वान म्हणणाऱ्यांनीच

त्याला वेडयात काढले होते. त्याची त्याच्या मित्रांनीही नाचक्की केली. बिचारा समोरच्या लोखंडी खिळ्यावर मस्तक आपटून घेण्यास तयार झाला. त्याच्या कामुक विचारांनी त्याच्या बुद्धीचे वाटोळे केले होते. तो आपल्या प्रियपात्रासाठी शत्रूंचा छळ सोशीत होता. त्याला वाटे की आपल्या लाडक्याने दिलेले विषही आपले तारण करील! बुडणाऱ्याला पावसाची दिक्कत वाटत नाही, त्याप्रमाणे तो मित्रांच्या हेटाळणीला जुमानत नव्हनता.

ज्याचे मन कोणावर जडलेले असते त्याला आपल्या इभ्रतीचा कलश फुटल्याची पर्वा नसते. एका रात्री सैतानच अप्सरेचे रूप धारण करून त्याच्या कुशीत शिरला आणि त्याचे पाणी पाणी झाले.[७०]

सकाळी त्याला उठून नमाज पढता येईना! त्याच्या मित्रांपैकी कोणालाही त्याचे बिंग कळले नव्हते. हातपाय धुण्यासाठी तो हौदापाशी गेला, पण थंडीमुळे पाणी गोठून बर्फ झाले होते. एका शिष्टाने त्याची कानउघाडणी सुरू केली, "या कडाक्याच्या थंडीत हे तू काय करतोस? तुला मरावयाचे आहे काय?"

तो गुणी युवक ओरडून म्हणाला, "बस करा! असले अभद्र काही बोलू नका. काही दिवसांमागे या धाकटया पोराने माझे चित्त हरण केले. त्यामुळे मी उतावीळ झालो आहे. तो एकदाही माझ्याशी बरा वागला नाही. पण पाहा! मी त्याच्यासाठी किती यातना सोसतो आहे! ज्याने मला मृत्तिकेपासून बनविले आणि अपारशक्तीने माझ्यात जिवंतपणा उत्पन्न केला त्याच्याबद्दल मी कृतज्ञता दाखवितो, तर तुला त्यात कोणता तऱ्हेवाईकपणा आढळला?"

## भक्तिगीताचे अभिश्रवण[७१] योग्य की अयोग्य?

तू प्रेमी असशील तर आपल्याला कस्पटाप्रमाणे समज. तुला ते जमत नसेल तर शहाण्यासुरत्याप्रमाणे वाग. म्हणजेच प्रेमाच्या फंदात पडू नकोस. प्रेम तुला पार बुडवील अशी भीती बाळगू नकोस. तू जरी मेलास तरी तू अमरच ठरशील. चांगल्या बीजापासून अंकुर फुटावयाचे असतील तर ते प्रथम मातीत पुरले पाहिजेत. प्रेमानेच तुला सत्याचा बोध होतो व त्यामुळे प्रेमाच्याच कचाटयातून तुझी सुटका होते.

तू जोपर्यंत शुद्धीवर असतोस तोपर्यंत तुला आपल्याबद्दलचे खरे ज्ञान होणार नाही. हे मर्म आत्मरंगात बेभान झालेल्या माणसाशिवाय इतर कोणासही कळणार नाही. गायकांच्या सुरानेच नव्हे, तर जनावरांच्या पावलांच्या आवाजाने देखील प्रेमी माणसाचे भान नाहीसे होते.

माशी जरी कानाशी भिणभिणत असली तरी त्यामुळे प्रेमवीराची शुद्ध लुप्त होते.

प्रेमाने पछाडलेल्याला धाकदपटशाची पर्वा नसते, पण एक पक्षी ओरडल्याने देखील त्याचे डोळे पाणावतात.

गाणारा कधी आपण होऊन आपले गाणे संपवीत नाही, पण लोक सदा लक्ष-पूर्वक गाणे ऐकतात असे होत नाही.

ईश्वरभक्तीच्या मदिरेने मस्त होणारे लोक रहाटगाडग्याचा आवाज ऐकूनसुद्धा देहभान विसरतात. ते भक्तीच्या आवेशाने गाऊ-नाचू लागतात. रहाट-गाडग्यातील मडकी जसे आपले पाणी ओतून टाकतात, त्याप्रमाणे प्रेमवश आत्मे आपल्या माशुकाच्या आठवणीने अश्रू ढाळतात. ते अनन्यभावाने शरण जाऊन मान खाली घालून बसतात आणि जर भक्तीचा आवेश अनावर झाला, तर अंगावरील कपड्यांच्या चिंध्या चिंध्या करतात.

भजन-कव्वालीची सगळी हकीकत मी सांगेन पण ऐकणारा कोण हे तर मला कळू दे.

कव्वालीचा आत्मा जर सत्याच्या बुरुजात वास करत असेल तर त्याची योग्यता देवदूतापेक्षा श्रेष्ठ समज.

प्रभातकाळी मंद मारुताने कळी देखील खुलते पण बुंध्याला कुऱ्हाडीशिवाय कसलाच स्पर्श जाणवत नाही.

तो जर पाचकळ विनोद करणारा किंवा गमत्या असेल तर अधिकच मिस्किल बनतो. कामवासनेनें गुरफटलेल्याला भजनाची गोडी कळत नाही.

गायनाने पेंगणारा माणूस जागा होईल; पण शौकीन माणूस कीर्तन, भजन, कव्वाली यांच्या गोंगाटात सुद्धा बेभान होतो.

ज्याला डोळेच नाहीत त्याला शोभा म्हणजे काय हे कसे कळणार? कोणा पसाळ पिराला पाहून त्याची टर उडवू नकोस, कारण तो भक्तिसागरात पोहत असतो.

तू पाहिले असशील की, जेव्हा काफिल्यातील अरब "हुदी" [७२] म्हण लागतात तेव्हा उंटदेखील रंगात येऊन नाचू लागतो.

उंटासारख्या जनावराच्या हृदयात जो भक्तिभाव आहे, तो माणूस म्हणवून घेणाऱ्या प्राण्यात नसेल तर त्याला गाढवच म्हटले पाहिजे.

एका मधुरोष्ठ पोराने बासरी वाजविण्याचा रियाज चालविला होता. पण आशिकांची मने जळत होती. त्याचा बाप त्याला पुष्कळदा दमदाटी करी आणि रागाने त्याची बासरी जाळून टाकी. पण एका रात्री मुलाचे सूर त्याच्या कानी पडले आणि तो एकदम व्याकुळ आणि बेभान झाला. त्याचे तोंड घामेजले व तो म्हणू लागला, "या वेळी मात्र बासरीने माझे अंतःकरण पेटवून दिले."

प्रेममदाने भारलेले मस्त होऊन नाचतात आणि हातवारे करतात हे तू पाहिले नाहीस का? खरे म्हणजे त्यांच्यासाठी प्रेमाच्या ऐश्वर्याच्या महालाचे दरवाजे उघडलेले असतात

आणि ते लौकिक विचारांना थारा देत नाहीत. माशुकाच्या आठवणीने ज्याच्या दंडात त्यागाचे बळ निर्माण होते त्यालाच बेहोश होऊन नाचणे शोभते.

तुम्ही पोहण्यात पटाईत आहात हे कबूल. पण विवस्त्र होऊन पोहणे अधिक सोइस्कर असते. नाव, रूप असली चिरगुटे फाडून फेकून द्या कारण पोहणाऱ्याला पोशाख म्हणजे एक व्याद असते. लौकिक संबंध म्हणजे परमेश्वराला अडविणारे पडदे आहेत आणि त्यात काही राम नसतो. संसारी संबंध संपुष्टात आले म्हणजेच परमार्थ साधता येतो.

एकाने पतंगाला म्हटले, "काय मूर्ख आहेस! (दिव्याशी काय दोस्ती करतोस!) जा आपला अनुरूप जोडीदार शोध! ज्यापासून काही मिळण्याची आशा असते तो मार्ग पत्करावा. तुझ्या सारख्याने ज्योतीशी मैत्री करावी हा भलताच प्रकार आहे. तू आग पचविणारा "समिंदर" अग्निकीटक नाहीस. सामना द्यावयाचा झाला तर अगोदर बळ हवेच. आंधळा उंदीर सूर्यापासून लपून राहतो. वज्रबाहूशी झटापट करणे मूर्खपणाचे होय. जो तुमचा शत्रू असल्याचे तुम्हास माहीत आहे त्याच्या नादी लागणे याला शहाणपणा म्हणत नाहीत.

"समईशी लगट करून व्यर्थ प्राणास मुकण्याचे हे तुझे काम कोणासही पसंत पडणार नाही. शाहजादीवर जीव टाकणारा फकीर धक्केखाऊ असतो. शाहजादीच्या कच्छपी लागणारे अमीर उमराव असतात. तिच्या मैफलीत तुझे स्वागत होईल अशी समजूत करून घेऊ नकोस. सर्वांशी ती गोडीने वागली तरी तू दरिद्री आहेस म्हणून तुझी ती कठोरपणे हेटाळणी करील."

आता संगमोत्सुक पतंग जळत असताना काय बोलला ते ऐका, "अहो हे काय भलतेच चऱ्हाट चालविले आहे तुम्ही! मी मेलो म्हणून बिघडले कोठे? माझ्या हृदयात पैगंबर इब्राहीम खलीलुल्लासारखी प्रेमज्वाला पेटली आहे. त्यांना जसे आगीचे काही वाटले नाही, त्याप्रमाणे मला देखील ही समई म्हणजे एक फूलच वाटते आहे.

"प्रियेचा पदर माझे मन ओढीत नसून तिचे प्रेम माझा गळपट्टा धरून खेचते आहे. आगीत उडी मारण्याची मला मुळीच हौस नाही. पण माझ्या मानेवर आत्मार्पणाच्या उत्साहाचा फास पडला आहे.

मला ज्योतीचे सान्निध्यही लाभले नव्हते, तेव्हाच माझे हृदय दग्ध झाले. माझ्या शरीराला आग लागल्याने काही मी जळालो नाही.

प्रियेच्या नटण्यामुरडण्याचा थाट पाहिल्यावर कोणताही साधु-संत संयमाच्या गप्पा मारू शकत नाही.

मी प्रियेवर प्रेम केल्याने मला कोण नावे ठेवणार आहे?

मी तर तिच्या पायापाशी प्राण देणे पसंत करतो. मला जीव देण्याची हौस का आहे?

मला वाटते मी मेलो तरी बेहत्तर, प्रिया मात्र जगली पाहिजे.

मी जळून मरतो त्याचे कारण माझ्या अग्निदिव्याचा तिच्या मनावर परिणाम झाल्यावाचून राहणार नाही. मला अनुरूप असलेल्या जोडीदाराची मैत्री करण्यास तू का सांगतोस ?

त्यापेक्षा माझ्याबद्दल कळकळ वाटणारा आणि माझ्यासारखीच वृत्ती असलेला कोणी भिडू माझ्यासाठी शोधून आण ! अनुरागाने विव्हल झालेल्याला उपदेशामृत पाजणे म्हणजे विंचू चावलेल्याला रडू नकोस म्हणून दटावण्यासारखे आहे !

ज्याच्यावर उपदेश ठसण्यासारखा नसेल अशा माणसास उपदेश करण्याची हाव धरू नको.

ज्या परस्वाधीन स्वाराच्या हातून लगाम सुटलेला असतो त्याला जरा सावकाश जा असे सांगण्यात काय हशील आहे ? "

"सिंदबादच्या सफरी" या ग्रंथात एक छान युक्ती आढळते.

"बाळा, प्रेम म्हणजे ज्वाळा आणि उपदेश म्हणजे वारा."

वाऱ्याने आग अधिकच फोफावते. चित्त्याला जखमी केले तर तो अधिकच चेकाळतो. मी तुझ्या उपदेशाबद्दल विचार करू लागलो तेव्हा माझी खात्री पटली की तू हीन कृत्य करतोस, कारण मला तू आपल्यासारखा (भ्याड) समजतोस. तू आपला तुझ्यापेक्षा श्रेष्ठ असलेल्याची संगत शोध. आपल्याशी साधर्म्य असलेल्या-बरोबर तुझा वेळ गेल्याची सार्थकता तरी तुला लाभेल !

सुखवस्तू लोक इतर ऐषआरामी लोकांच्या पावलावर पाऊल ठेवून चालतात. पण प्रेमाने पिसाटलेले सुळावरील पोळीचा ध्यास घेतात !

मी हा मार्ग पत्करला त्या दिवशीच माझ्या प्राणांवर तुळशीपत्र ठेवले. प्रेम-पंथात प्राण गमावणारेच खरे आशिक.

कारण ज्याच्या अंगी निर्धार नसतो त्याचे आपल्या प्राणांवरच प्रेम असते.

जर मृत्यूने अचानक माझ्यावर स्वारी केली तर मी म्हणेन की, मला प्रियेच्या हातूनच मरण येऊ दे.

मरण तर भाळी लिहिलेलेच आहे आणि ते प्रियाराधनेपायीच प्राप्त होणे श्रेयस्कर होय. तुलाही ठाऊक आहे की कधी ना कधी तरी आपण मरणारच, तेव्हा प्रियेच्या चरणी प्राण वाहिलेलेच चांगले !

### गोष्ट

### समई आणि शलभाचा संवाद

मला आठवते की एका रात्री मला झोप लागली नव्हती. मी एक पतंग ज्योतीला उद्देशून बोलत असताना ऐकले.

मी तर आशिक आहे आणि मी जळून मेलो तर ते योग्यच आहे. पण तूसुद्धा का जळत (तेवत) आहेस, आणि अश्रू (तेलाचे थेंब) गाळत आहेस ?

समई म्हणाली, "माझ्या गरीब मित्रा! माझा तू मधासारखा गोड मित्र नाहीसा झालास म्हणून.

माझ्यातून शिरीन[53] (गोडी) च निघून गेल्यावर फरहादसारखी माझी स्थिती झाली आहे आणि म्हणून माझ्यातून धूरच निघतो आहे."

समई मोठ्या कष्टाने बोलत होती व तिच्या निस्तेज गालावरून अश्रू गळत होते.

प्रेमाच्या गप्पा मारणाऱ्यांनो, प्रेम करणे तुम्हांस जमणार नाही. तुमच्यात ना निर्धार ना सोशीकपणा! जुलमाचे प्रेम करणारा नुसती आग पाहूनच पोबारा करतो!

माझ्याकडे पाहा. पुरता जळून खाक होण्यासाठी आपल्या जागीच टिकून राहिलो आहे.

प्रेमाच्या ज्वाळा तुझ्या पंखांना लागताच तू इतका बिथरलास. पण माझ्याकडे पाहा. माझे सर्वांग पेटले आहे.

त्यानंतर एक प्रहर रात्र उलटल्यानंतर कोणा गुलछबूने येऊन दिवा मालवून टाकला. समईवरून धूर निघत होता व ती म्हणत होती, "बाळा! प्रेमाच्या कपाळी शेवटी एवढेच लिहिलेले असते. तुला प्रेमकला शिकावयाची असेल तर ध्यानात ठेव, की प्रेममार्गात प्राण ठेवण्यानेच शांती लाभते. जो प्रियाराधनात कामी आलेला असतो, त्याच्या समाधीपाशी अश्रू ढाळू नकोस. त्यापेक्षा तो प्रियेचा लाडका बनला याचे समाधान मान.

"तू खरा प्रेमी असशील तर प्रीतीच्या दुखण्याची खंत बाळगू नकोस. त्या-उलट "सादी" प्रमाणे स्वार्थावर पाणी सोड. खरा आशिक माशुकावरील आपला हात मागे कधीच घेत नाही. त्यापायी आपल्यावर दगडविटांचा वर्षाव झाला तरी तो त्याची पर्वा करत नाही.

मी तुला सांगत आलो आहे की समुद्रापाशी जाऊ नकोस!

गेलासच तर मात्र आपले प्राण झंझावाताच्या हवाली कर."

□ □ □

## अध्याय ४

# विनम्रता

पवित्र परमात्म्याने तुला मातीतून निर्मिले. मग हे भक्ता, तू मातीप्रमाणेच लीन राहा. लोभी, कठोर आणि बेमुर्वत होऊ नकोस. मातीतून जन्मलेल्याने आगीचे सोंग कां आणावे ? आगीने आपल्या ज्वाळा दिमाखाने मिरविल्या तर मृत्तिकेने नम्र भावाने आपल्याला दीन म्हणवून घेतले.

आगीने असा टेंभा मिरविला म्हणूनच निसर्गाने तिच्यापासून सैतान जन्मास घातला; आणि मातीचा लीनपणा पाहून तिच्यापासून मानव निर्माण केला.

### यासंबंधी एक चुटका

ढगातून पावसाचा एक थेंब गळून पडला. सागराचा अफाटपणा पाहिल्यावर तो खजील झाला. " हा समुद्र कोठे आणि मी कोठे ? त्याचे अस्तित्व विराट आहे. मला कसलाच आकार नाही. " लीन झालेला पाहून एका शिंपलीने आत्मीयतेने त्याला पोटात सामावून घेतले आणि त्याचे संगोपन केले. नशिबाने त्याला असा काही हात दिला की तो शाही मोती म्हणून नाणावला.

विनम्र असेल तोच सन्मान्य होतो. झिजून नाहीसा होणाराच चिरायू होतो.

### ईश्वरभक्त स्वतःस कवडीमोल मानतात

एका प्रख्यात देशाचा एक शहाणा तरुण मुलगा समुद्रमार्गे पॅलेस्टाईन देशाच्या किनाऱ्यावर पोहोचला. त्याचा तेजस्वीपणा, लीनता आणि विवेकीपणा पाहून लोकांनी आदराने त्याचे सामान लावण्यास मदत केली. त्याला एके दिवशी एका मशिदीच्या कारभाऱ्याने मशिदीतील केर काढण्यास सांगितले. ते ऐकून तो प्रवासी तरुण ताडकन तेथून निघून गेला. त्यानंतर कोणाच्याही दृष्टीस पडला नाही. त्यावरून लहान-मोठ्यांनी असा तर्क केला की कदाचित त्याला हलके काम करावयाचे नव्हते.

दुसऱ्या दिवशी मशिदीच्या चाकराने त्याला रस्त्यात गाठले व म्हटले, " तू अविचाराने वागलास हे बरे नव्हे, पोरा ! प्रार्थना केल्यानेच मनुष्य मोठा होतो हे तुला कळत नाही काय ? "

तो मुलगा मनापासून वाईट वाटून रडू लागला व म्हणाला, " अरे माझ्या जिवलगा ! मला त्या मशिदीत केर वा धूळ काहीच आढळले नाही. मीच काय तो अडगळीसारखा होतो असे मला वाटले. मशिदीत अडगळ वा केरकचरा असू नये म्हणून मग मला तेथून पाय काढणेच योग्य वाटले. "

दरवेशाला साजेलसा सूफी मार्ग हाच की, त्याने आपल्याला लीनदीन याहून दुसरे काही समजू नये.

तुला मोठेपण हवे असेल तर अगोदर कमीपणा पत्कर. कारण महान योग्यता प्राप्त होण्यासाठी दीनपणाशिवाय अन्य सोपान नाही.

### गोष्ट

## सुलतान बायजीद बुस्तामी * यांची शालीनता

सूफी संत बायजीद बुस्तामी रमजान ईदच्या दिवशी सकाळी स्नानगृहातून बाहेर येत असताना कोणा एकाने अनवधानाने आपल्या गच्चीवरून तस्तातील राख फेकून दिली. पगडीवर आणि केसावर राख पडली, तेव्हा ती तोंडावर चोळत आणि आभार मानत ते म्हणाले, "आगीत जळून राख होण्याएवढीच माझी लायकी असताना राख पडली म्हणून मी का वाईट वाटून घ्यावे ?" थोर महात्मे आपल्या जिवाची काळजी कधीच करीत नाहीत आणि ज्याला स्वत:शिवाय दुसरे काही दिसत नाही तो भाविक असण्याची शक्यता नसते. मोठेपण हे आदरसत्कार किंवा बोल-घेवडेपणामुळे सिद्ध होत नाही. त्याचप्रमाणे अहंकार आणि शेखी मिरविण्यानेही श्रेष्ठत्व प्राप्त होत नाही.

जो तथ्य तेवढेच घेतो आणि बाकीचे भारूड बाजूला सारतो तो तुम्हांस स्वर्गात नक्कीच दृष्टीस पडेल.

विनम्रपणाने तुझा गर्व ताळ्यावर येईल आणि अहंकार तुला अधोगतीच्या गर्तेत टाकील.

अहंकारी माणसे नम्र होतात. तुला सन्मान मिळवावयाचा असेल तर तू शालीनता शीक.

## अहंकारापासून होणारी हानी आणि शालीनतेचा श्रेष्ठपणा

आसक्त आणि अहंकारी माणसापासून धर्मजिज्ञासा करू नकोस आणि गर्विष्ठ माणसापासून देवभोळेपणाची अपेक्षा करू नकोस. तुला श्रेष्ठ व्हावयाचे असल्यास हलक्यांचे अनुकरण करू नकोस. तुच्छतेने कोणाकडेही पाहू नकोस, अहंकार आणि गर्व यांमुळे श्रेष्ठ पदवी प्राप्त होते असे कोणताही बुद्धिमान समजत नाही. तुला लोकांनी सदाचारी समजावे यापेक्षा अधिक श्रेष्ठपणाची हाव तू धरता कामा नये. अरे! तुझ्याच पातळीचा मनुष्य तुझ्याहून श्रेष्ठ होऊन मिरवायला लागला, तर तू ते कसे कबूल करशील ? आता तूही जर अहंकारी बनलास तर तुझी प्रतिमादेखील इतर अहंकारी लोकांसारखीच राहील. तू जर उच्च पदावर पोहचला असशील तर तू तुझ्याहून कमी योग्यता असणाऱ्यांची टिंगल करू नयेस हे चांगले. मोठे म्हणविणारे अनेक लोक रसातळाला पोहोचतात, आणि हीनदीन असलेले त्यांची जागा घेतात.

तू निष्कलंक असशील हे मला मान्य आहे, पण माझ्यासारख्या अपराध्याला टोमणे मारू नकोस.

कोणी एक नमाजासाठी काब्याकडे तोंड करून बसला आहे, आणि दुसरा कोणी दारूच्या गुत्यात झिंगून पडला आहे. त्यांपैकी एकाला जवळ केले तर अडविणार कोण आणि दुसऱ्याला हाकलले तर त्याला कोण परत आणणार आहे ?

प्रार्थना केल्याने काही कोणाला प्रचंड बळ प्राप्त होत नाही किंवा गुन्हेगाराला कोणी पश्चात्तापाची वाट बंद करू शकत नाही.

## येशू ख्रिस्त आणि कुकर्मी देवभक्त

मला एकाने अशी गोष्ट सांगितली की येशू ख्रिस्ताच्या काळी कोणी एक अज्ञानी आणि पुंड मनुष्य होऊन गेला. तो इतका धाडसी आणि क्रूर होता की त्याच्यापुढे सैतान देखील फिक्का पडत असे. त्याचे जिणे व्यर्थ झाले होते व त्याने जन्मल्यापासून कोणासही चैन पडू दिले नव्हते. त्याच्या मेंदूत सद्‌बुद्धीचा ठणठणाट होता आणि हरामाचे अन्न खाऊन तो ढेरपोटचा झाला होता. ठकबाजी आणि खोटारडेपणा यांमुळे त्याचे नाव बद्दू झाले होते आणि अखंडपणे कुकर्मे केल्यामुळे त्याने आपल्या कुळाला बट्टा लावला होता. त्याचे चालणे डोळस माणसासारखे नव्हते आणि उपदेश ऐकून घेणाऱ्यांचे कानही त्याच्यापाशी नव्हते. लोक तर त्याला दुष्काळाप्रमाणे टाळत असत आणि अमावास्येचा चंद्र समजत असत. अत्यंत लोभी आणि लंपट असल्याने त्याच्याजवळची माणुसकीची मायाच नाहीशी झाली होती. लोक त्याला अधमपणाच समजत होते. त्याच्या दुष्कर्मांच्या नोंदवहीत आणखी काही नोंद करण्यास जागाच राहिली नव्हती. तो गुन्हेगार, गर्विष्ठ आणि दुर्व्यसनी मनुष्य दिवसरात्र दारू पिऊन झिंगलेला असे.

एकदा येशू ख्रिस्त जंगलातून आले आणि एका धार्मिक प्रवृत्तीच्या माणसाच्या घरी मुक्कामास राहिले. तो एकांतप्रिय धार्मिक माणूस बाहेर आला आणि त्याने येशूच्या पायावर मस्तक ठेवले. तो दुष्कर्माने बरबटलेला हतभागी येशूच्या दर्शनानेच पतंगासारखा उतावीळ झाला. श्रीमंतापुढे दरिद्री माणसे जशी ओशाळतात, तसा तो आपल्या अधमपणाबद्दल ओशाळला. त्याने लाजेने मान खाली घातली आणि आपण दिवसरात्र करीत असलेल्या पापांबद्दल तो क्षमायाचना करू लागला. ढगातून वर्षाबिंदू पडावेत तशी त्याच्या डोळयातून आसवांची धार लागली होती, आणि सर्व आयुष्य आज्ञानात घालविण्याबद्दल तो हळहळत होता. " मी माझ्या आयुष्याची दौलत फुकट उधळली आणि कोणतेच पुण्य साधले नाही. माझ्यासारख्याला देव जिवंत न ठेवो. असल्या जिण्यापेक्षा मरणच चांगले असते. म्हातारपणी पापांचे ओझे वाहणारा जन्मतःच मेला तर चांगले. हे परमेश्वरा माझ्या पापांची क्षमा कर. ती जर न्यायदानाच्या दिवशी माझे सोबती म्हणून आली तर माझी गत काय होईल ? "

तो म्हातारा गुन्हेगार आपली पापे पोटात घालण्याबद्दल परोपरीने प्रार्थना करत होता. त्याची मान लज्जेने लवलेली होती आणि शोकाने त्याच्या अंगाचे पाणी पाणी झाले होते.

दुसरीकडे तो गर्विष्ठ माणूस धार्मिक गुन्हेगाराबद्दल चिडला होता आणि ओरडत होता, " हा बदमाश आमचा पिच्छा का पुरवितो आहे ? या हतभाग्याला आमची संगत कशास हवी? त्याने आपले मस्तक आगीत टाकले आहे आणि विषया-सक्तीत हयात घालविली आहे. त्याच्या पापी प्रवृत्तीमुळे कोणत्याही सत्कर्माची त्यास आशा बाळगता येत नाही आणि तारक येशू आणि मी यांचा सोबती होण्याची याची मुळीच लायकी नाही. हा पापांचे गाठोडे फुगवून नरकात जाण्याची खटपट का करतो हे कळत नाही. मला त्याचे कर्मदरिद्री तोंड पाहावयाचे नाही, कारण त्याच्या संपर्काने माझा नाश होईल. देवा ! अंतिम न्यायदानाच्या दिवशी तुझ्या अंगणात जेव्हा मोठी सभा भरेल तीत माझे आणि याचे सारखेच पारडे करू नकोस."

तो अशी प्रार्थना करत असतानाच देवाचा देवदूतामार्फत येशू ख्रिस्ताना निरोप आला.

" कोणी अजाण असेल किंवा कोणी सुजाण असेल, पण मला दोघांची प्रार्थना सारखीच आहे. या पाप्याने हयात दुष्कर्मात घालविली आणि शेवटी पश्चात्तापाने माझी करुणा भाकली. "

कोणी दीन होऊन माझे वरदान मागावयाला माझ्या दारी आला तर मी माझे दार लावून घेऊ शकत नाही.

मी याचे गुन्हे माफ केले आहेत; आणि त्याला माझ्या दैवी सामर्थ्याने स्वर्गात स्थान देईन.

" जर अहंकारी धार्मिकाला त्याच्या पापांची लाज वाटून त्याला आपल्या बरोबरीने स्वर्गात स्थान मिळू नये असे वाटत असेल तर त्याला सांगा, खबरदार ! न्यायदानाची चिंता तू करू नकोस. याला मी तर स्वर्गात बसवीन व तुला मात्र नरकात ! याचे कारण असे की ह्याचे हृदय पश्चात्तापाने पोळले आहे. पण तुझ्या मनात आपल्या प्रार्थनेची घमेंड ठासून भरली आहे. तुला हे कळत नाही की देवाच्या दरबारात दीनपणाला अहंकारापेक्षा अधिक मान दिला जातो. ज्याचे बाह्यांडबर झगझगीत पण हृदय काळेकुट्ट त्याला नरकाच्या दरवाजाची चावी शोधावी लागत नाही. देवापुढे केलेली अजिजी ही प्रार्थना आणि आत्मप्रौढी यांपेक्षा फायदेशीर असते. तू स्वतःला चांगल्या लोकांपैकी समजतोस हेच तुझे चुकले. देवाच्या पोटात तुझ्या अहंकाराला थारा मिळणार नाही. तू जरी शूर असलास तरी स्वतःबद्दलच्या वल्गना कशासाठी करतोस ? बादशहाचा प्रत्येक स्वार हा विजयी होणारा नसतो. अहंकारी मनुष्य खरोखरी मूर्ख असतो. तो असतो कांद्यासारखा. पण पिस्त्याप्रमाणे आपल्या

पोटातही बी असलीच पाहिजे असे त्याला वाटते. बरे, नुसते देव देव केल्याने काही कार्यभाग होणार नाही. जा ! धार्मिकतेचा टेंभा मिरविल्याबद्दल हळहळ व्यक्त कर !"

जो मनुष्य देवाशी गोडीने वागतो आणि जनतेशी फटकून वागतो त्याला प्रार्थनेचे सत्फळ मिळणार नाही.

शहाणे लोक जे बोलतात ते मनात ठसणारे असते म्हणून 'सादी' म्हणतो ते ऐक —

देवाला शरण जाणारा गुन्हेगार देखील धार्मिकपणाचा टेंभा मिरविणाऱ्या कर्मठापेक्षा श्रेष्ठ होय.

## बुद्धिमान दरवेशी आणि मगरूर काझी

एक निष्कांचन पंडित काझीच्या दरबारात फाटके कपडे घालून पहिल्या रांकेत बसला होता. काझीने त्याच्याकडे डोळे वटारून पाहिले. चोपदाराने त्याच्या बगलेत हात घालून त्याला उठावयास सांगितले, "थोरामोठ्यांमध्ये वावरताना वाईट दिसेल असे वागू नये. तुझी ऐपत नसेल तर उगाच का मोठेपणाचा आव आणतोस ? प्रत्येकाची योग्यता मसनदीवर बसण्याची नसते. तुझा दर्जा तुझ्या लायकीप्रमाणे राहील आणि तुझी लायकी तुझ्या गुणवत्तेवर अवलंबून राहील. दुसऱ्यांदा तुला तंबी देण्याची पाळी येऊ नये. झाला तेवढा पाणउतारा पुरे झाला असे समज. ज्याची योग्यता मोठी असूनही जो खाली बसतो त्याला धक्के खाऊन खाली यावे लागत नाही."

दरवेशाला अतिशय दुःख झाले. तो सुस्कारे टाकत खालच्या रांकेत बसला.

धर्मशास्त्र्यांचे विचारमंथन चालू झाले. कोणी "होय" तर कोणी "नव्हे" म्हणे. त्यांचा वादविवाद विकोपास जाऊन ते मुद्द्यावरून गुद्द्यावर आले. माना उंचावून होय – नाही – होय – नाही असा ओरडा करू लागले.

कोंबडी जशी नखांनी आणि चोचींनी लढते तसे ते हमरीतुमरीवर येऊन भांडू लागले. कोणी रागाने बेहोश होत होते, तर कोणी जमिनीवर तावातावाने हातपाय आपटीत होते. एक मोठी समस्या सोडविण्यात ते गुंतले होते. पण कोणालाही योग्य तोडगा सुचत नव्हता.

फार मागे जाऊन बसलेला विद्वान वाघासारखे गरजून म्हणाला, "युक्तिवादच इतका बिनतोड असावा की त्यासाठी मानेच्या शिरा फुगवाव्या लागू नयेत."

"मला पण या विषयात गम्य आहे." लोकांनी त्यास म्हटले, "तुला या प्रश्नावर काही सांगावयाचे असेल तर बोल."

त्या दरवेशाची वाणी अतिशय प्रभावी होती. त्याने जे सांगितले ते सर्वांना पटण्यासारखे होते. त्याने आपले बाह्यात्कारी ओंगळ रूप झाकून टाकले आणि विद्वत्तेच्या गप्पांवरही बोळा फिरविला. लोकांनी त्याची मनापासून वाहवा केली. "शाबास ! काय ही बुद्धिमत्ता आणि गोड स्वभाव !" या विद्वानाच्या बहुश्रुत-

पणाचा घोडा प्रचंड वेगाने धावू लागताच खुद्द काझी न्यायाधीशच चिखलात रुतलेल्या गाढवाप्रमाणे हतबुद्ध झाला. त्याच्या बुद्धिमत्तेने चकित होऊन त्याने आपली जागा सोडली, पगडी उतरवली आणि तो अत्यादराने त्या विद्वानाच्या पुढ्यात गेला आणि म्हणाला, "मला माफ करा ! मला तुमची योग्यता माहीत नव्हती. आपण आल्या- बद्दल मी आभारही मानले नाहीत. आपल्यासारखा श्रेष्ठ मनुष्य या अवस्थेत असावा याचा मला खेद वाटतो."

लगेच चोपदारही काझीचे पागोटे फकिराच्या डोक्यावर ठेवण्यासाठी धावत आला. खुणा करून त्याला लांब राहाण्यास सांगून तो म्हणाला, "ह्या पगडीमुळे मस्तवालपणा अंगी येतो. ती माझ्या डोक्यावर ठेवू नकोस ! काल परवापर्यंत तर मी गोधडी पांघरत असे. ह्या पन्नास हाती पागोट्यामुळे माणसांना मस्ती येते. जे माझा मानसन्मान करतात ते मला कमी दर्जाचे वाटतात. पिण्याचे पाणी गोड ते गोडच. सोन्याच्या पेल्यात असले काय किंवा मडक्यात असले काय ? माणसाच्या मस्तिष्कात विचार हवेत, तुझ्याप्रमाणे डोक्यावर डौलदार आणि किमती पगडी नको. पगडीच्या उंचीनुसार कोणाचीही योग्यता वाढत नसते.

"भोपळा भला मोठा असला की त्याच्या पोटात काही नसतेच. भले मोठे पागोटे बांधून आणि दाढी ठेवून मान उंचावू नकोस, कारण पागोटे कापसाचे असते आणि दाढी ही गवतासारखी उगवणारी असते.

जे दिसण्यात माणसासारखे असतात त्यांनी चित्रातील आकृतीसारखे अबोल असावे. आपल्या मगदुराप्रमाणेच पद पत्करावे.

शनिग्रहाप्रमाणे उंचावर असून सुद्धा अमंगल म्हणवू नये. उसाला अंगचीच गोडी असते म्हणून तो श्रेष्ठ. पण बांबू दिसण्यात उसासारखा दिसला तरी त्याची कदर केली जाते काय ?

तुझ्या पदरी शेकडो गुलाम असले तरी तुझा निर्बुद्धपणा आणि मनाचा दुबळेपणा पाहता तुला माणूस म्हणावयास मी तयार नाही. कोणी मातीतून कवडी उचलून घेत असताना ती त्यास म्हणाली, "बाबा मला काहीच किंमत नाही. तू मला खुळचटपणाने रेशमी रुमालात बांधून घेऊ नकोस. कोणापाशी ढीग पैसा असूनही तो श्रेष्ठ असतोच असे नाही. गाढवावर जरतारी झूल टाकल्यावर देखील ते गाढवच म्हणवते." त्या हुषार फकिराने असे परखड विचार व्यक्त करून त्या काझीला नामोहरम करून टाकले.

ज्याचे मन दुखावलेले असते त्याच्या तोंडातून कडवट भाषा येणारच. तुझा दुष्मन नरम झाला की तू क्षणाचाही विलंब करू नकोस.

तुझी सत्ता प्रस्थापित होताच वैऱ्याची मस्ती जिरवली पाहिजे. कारण त्या प्रसंगाने तुझ्या मनातील मळमळ निघून जाते.

त्या काझीवर त्याचा असा काही आघात झाला की तो त्याचा दासानुदास बनला. आणि तो दिवस स्वतःला वाईट असल्याबद्दल त्याची खात्री पटली. तो फार गोंधळून गेला आणि आपले दोन्ही हात त्याने आपल्या दातांनी चावले. लोक जसे आकाशातील वसिष्ठ-अरुंधती[७४] हे तारे निरखून पाहात असतात तसा हा काझी त्या फकिराच्या तोंडाकडे टक लावून बघत राहिला. तो तेजस्वी तरुण अभिमानाने तेथून बाहेर पडला व त्यानंतर त्याला कोणीच पाहिले नाही.

सभेतील लोकांनी एकच गोंधळ माजवला की, "तो उद्धट माणूस कोठून आला हे सांगा." लगेच त्याच्या शोधार्थ जासूद निघाला आणि आजूबाजूच्या लोकां-जवळ 'एवंगुणविशिष्ट व्यक्ती पाहिली काय,' अशी चौकशी करू लागला.

लोकांनी त्यास सांगितले, "बाबा! आम्हाला माहीत असलेल्यांपैकी तू सांगतोस असा चाणाक्ष आणि गोडबोल्या फक्त "सादी" च आहे.

अत्यंत कडू सत्य तितक्याच गोडव्याने जो व्यक्त करू शकतो त्याला लाखो सलाम!

## साधू आणि गंजाचा शहाजादा

गंजागावचा शहाजादा नालायक, अवखळ आणि छळवादी होता. तो एकदा दारूच्या धुंदीत मशिदीत येऊन गाणे म्हणू लागला. त्याच्या हातात मदिरेचा प्याला होता आणि डोक्यात दारूची मस्ती होती. मशिदीच्या बैठकीत एक देवभक्त बसला होता; त्याची वाणी मधुर होती; त्याचे वर्तन निष्कलंक होते. त्याच्या प्रवच-नाला बरेच लोक जमत असत. होय! आपल्यापाशी विद्वत्ता नसली तरी निदान सदुपदेश तरी ऐकावा! उलट त्या शहाजाद्याने आपली पुंडाई चालू ठेवली म्हणून तेथील लोक खवळले. जर बादशहाच अधर्मी असेल तर सदाचाराची आज्ञा पाळण्याचे धैर्य कोणापाशी असेल? लसणेच्या दर्पाने फुलाचा सुगंध झाकून जातो आणि ढोलक्याच्या गोंगाटात बासरी फिक्की पडते. अधर्मीपणाचा नायनाट करणे तुझ्या अखत्यारात असेल तर लुळ्या पांगळ्या माणसाप्रमाणे निष्क्रिय बनू नकोस.

जर तुझ्या हातात बळ नसेल तर तोंडाने उपदेश कर. उपदेशाने देखील स्वभाव बदलता येतो.

हातांपायांत आणि तोंडातही बळ नसले म्हणजे देवभक्त प्रार्थनेच्या रूपाने आपले सामर्थ्य प्रगट करतात.

एक मनुष्य त्या देवभक्ताजवळ आला आणि शोकाकुल होऊन त्याने जमिनीवर मस्तक ठेवले आणि तो म्हणाला, "या दारुड्यासाठी प्रार्थना करा. आम्ही सर्व दुबळे आणि मुखदुर्बळ आहोत. मनोधैर्य असलेल्या मनुष्याचा विश्वास सत्तर कुऱ्हाडी व तलवारींपेक्षा देखील धारदार असतो."

त्या धैर्यशील देवभक्ताने प्रार्थना करून देवाला विनविले, "देवा ! ऐश्वर्य आणि दैन्य या दोहोंचाही स्वामी तूच आहेस ! हा मुलगा सद्गुणी आहे आणि त्याचे भाग्यही बऱ्यापैकी आहे. त्याला तू सुखी राख."

एकजण त्याच्यापाशी येऊन म्हणाला, "आपण मूर्तिमंत सच्छील आहात ! पण या पाप्याचे कल्याण व्हावे अशी प्रार्थना का करता ? त्याचे भले होण्यासाठी कोण बरे हा खटाटोप ? त्यामुळे या शहरातील लोकांना त्रास व्हावा असे तर आपल्याला वाटत नाही ना ?"

त्या बुद्धिमान साधूने त्याला दटावून म्हटले, "तुला त्यात काय कळते ? उगाच बडबड करू नकोस ! मी प्रार्थना केली ती चांगली परिस्थिती निर्माण व्हावी यासाठी. या पोराला पश्चात्ताप करण्याची बुद्धी यावी म्हणून मी देवापाशी प्रार्थना केली आहे. जो मनुष्य दुर्व्यसनातून मुक्त होतो, त्याला स्वर्गातील सुख प्राप्त होते. दारूने थोडा वेळपर्यंत तरतरी येते. पण ती सोडल्याने शाश्वत सुख प्राप्त होते.[७५]

त्या फकिराचे बोलणे एकाने ऐकले व ते बादशहाच्या कानावर घातले.

ते ऐकल्यावर शहाजाद्याच्या डोळ्यांतून अश्रूची धार वाहू लागली. प्रेमाच्या अग्नीने त्याचे मन पोळले, लज्जेमुळे त्याने मान खाली घातली, त्या सत्पुरुषास बोलावून आणण्यासाठी निरोप धाडला.

"मला पश्चात्ताप होतो आहे. माझी विनंती ऐका.आपण यावे आणि माझी सेवा घ्यावी. त्याने माझा कलंक धुऊन निघेल. आणि अज्ञान आणि अनिष्ट नष्ट होतील."

दोहोबाजूला उभ्या असलेल्या पहारेकऱ्यांमधून त्या मधूरवचनी साधूने बादशहाच्या महालात प्रवेश केला. तेथे साखर, अनावेशाही, मोठा दीप आणि मदिरा त्याच्या दृष्टीस पडली. सर्व प्रकारचे ऐश्वर्य तेथे होते आणि लोकही धुंद झाले होते. कोणाची शुद्ध हरपली होती, कोणी बेभान झाला होता, कोणी शायरी गात होता तर कोणाच्या हाती मदिरेची सुरई होती. एकीकडे गायनवादनाची मैफल रंगात आली होती आणि दुसरीकडे लोकांना मदिरा पिण्याचा आग्रह चालला होता. मदिरामंडळाचे सदस्य दारू पिऊन झिंगले होते. सारंगियाचे मस्तक तोल जाऊन सारंगीवरच आपटत होते. तेथील मंडळीपैकी कोणाचेच डोळे उघडे नव्हते. फुलदाणीतील नरगीस[७६] फुलाचेच तेवढे डोळे स्पष्ट दिसत होते. तबलासारंगीची जुगलबंदी चालू होती आणि गोड गळ्याची गायिका जोगीया[७७] च्या ताना घेत होती.

त्या साधूने मदिरेची सर्व पिंपे फोडण्याचा हुकूम सोडला. त्यामुळे तेथील विलासास एकदम अवकळा आली.

तबला-सारंगी मोडून टाकण्यात आली. तंबोऱ्याच्या तारा तुटल्या. वादकाने सरोद फेकून दिला. मदिरेच्या कुंभांवर दगड मारण्यात आला. जमिनीवर मदिरा-

पात्रांचा खच पडला. वाहून चाललेल्या लाल मदिरेच्या थारोळ्यात उपडा पडलेला तंबोरा कापलेल्या बदकासारखा भासत होता. मदिरेच्या हंडीचे नऊ महिने भरले होते. तिला कन्या झाली, पण वाहून गेली. दारूच्या पखालीचे पोट फाटले, तेव्हा पेल्याने आपले लोहित अश्रू ढाळले.

त्याने राजमहालाची लादी खणून काढून नवी बसविण्याची आज्ञा दिली. कारण माणिकाप्रमाणे दिसणाऱ्या लाल दारूचे संगमरवरी लादीवरील डाग धुऊन काढणे शक्य नव्हते. त्या दिवशी शहाजादा खूप प्यायला होता म्हणून तो बेशुद्ध होऊन पडला होता.

त्यानंतर मात्र ज्याचा हात मदिरापात्राला स्पर्श करी त्याच्या डोक्यावर तबल्याची थाप बसे.

ज्याच्या हातात वीणा जाई त्याचे कान खुंट्यांप्रमाणे पिरगळले जात !

दारू पिऊन झिंगणारा आणि मस्तीने वागणारा शहाजादा निमूटपणे कोपऱ्यात बसून नमाज पढू लागला. बापाने त्याला वाईट सवयी टाकून चांगली वागणूक पत्करण्यासाठी पुष्कळदा बजावले होते. बापाची ताकीद आणि दमदाटी निरुपयोगी ठरली होती. पण साधूची मात्रा मात्र लागू पडली. त्या साधूऐवजी दुसऱ्या कोणी मवाळ फकिराने त्याला पुंडाई आणि मस्ती सोडून देण्याचा आग्रह केला असता, तर तो जिवंत राहिला नसता. वाघसुद्धा चवताळला म्हणजे कधी शेपूट घालणार नाही; पण सुस्वराच्या तलवारीने मात्र तो हवालदिल होतो. मृदु वागणुकीने दुष्मनालाही कह्यात आणता येते; पण मित्रावर केलेल्या जुलमामुळे तो शत्रू बनतो. हातोडा पडतो तेव्हा ऐरणीशिवाय तो दुसरा कोणीही मुकाट्याने सहन करणार नाही. कोणत्याही श्रीमंत माणसाशी फटकून वागू नकोस. त्याने उद्धटपणा केला तरी तू सरळपणा सोडू नकोस. सद्‌गुणाने वागेल त्या गरीब किंवा श्रीमंत माणसास जिंकावे. तुझ्या गोड बोलण्याने श्रीमंत आपला उद्धटपणा सोडून देईल आणि गरीब मनुष्य तुझ्या मृदु वाणीपुढे मस्तक नमवील ! ज्याच्या जिव्हेवर मध असतो त्याची कामे पटापट उरकतात आणि ज्याची भाषा रांगडी असते तो अपेशीच ठरतो.

तुम्हाला गोड कसे बोलावे असा प्रश्न पडतो, तेव्हा 'सादी' चा सल्ला घ्या आणि अभद्र बोलणाऱ्याला म्हणा, "मर लेका !"

## मधाचा व्यापारी

एक गोडबोल्या माणूस मध विकत असे. लोकांची मने त्याच्या मधुरवाणीने खुलत असत. तो कृशकटी आणि मोहक होता, म्हणून त्याच्यासमोर गिऱ्हाइकांची माशांपेक्षाही जास्त गर्दी होत असे. त्याने मध म्हणून विष विकले असते तरी देखील त्याच्या हातून ते घेऊन त्यांनी मध समजूनच गट्ट केले असते.

एका चांडाळाने त्याचे हे कर्तृत्व पाहिले. मधाचा चाललेला भरभराटीचा

व्यापार त्याला पाहवला नाही. दुसऱ्या दिवसापासून तोही फेऱ्या मारू लागला. त्याच्या डोक्यावर जरी मधाचे भांडे होते तरी त्याचा चेहरा आंबट दिसायचा. त्यानेही मधाचे भांडे घेऊन खूप पायपीट केली आणि ओरडून ओरडून मधाची तारीफ केली. गिऱ्हाईक त्याच्याकडे फिरकले नाही. संध्याकाळी जेव्हा त्याच्या पदरात एक पैसादेखील पडला नाही, तेव्हा मात्र तो एका कोपऱ्यात जाऊन स्वस्थ बसला. गुन्हेगाराला आपल्या अपराधांचा पाढा ऐकल्यावर जसे होते किंवा ईदीच्या दिवशी तुरुंगातील कैद्याला जसे होते तसे त्याचे मन खट्टू झाले. त्याच्या बायकोने त्याला मिस्किलपणाने म्हटले, "आंबट तोंडाच्या माणसाचा मध देखील कडू असतो!"

जो मनुष्य दस्तरख्वा[३८] गुंडाळल्याप्रमाणे आपल्या भुवया चढवितो, त्याच्या हातचे अन्न खाणे हराम होय.

भल्या माणसा! तू अविचाराने आपले काम कठीण करून घेऊ नकोस. ज्याला रीत नसते त्याचे नशीबही आंधळेच बनते. तुझ्याजवळ सोने, चांदी नसेल हे कबूल! पण 'सादी' प्रमाणे मधुरवाणी सुद्धा तुझ्याजवळ नसावी काय?

### सज्जनांची शालीनता

एक देवभोळा बुद्धिमान मनुष्य होता. एका दारुड्याने त्याची गळपट्टी खेचली. त्या दुर्जनाने त्या सद्गृहस्थाला मानेवर आघात केला तरी त्या नेक माणसाने मान वर करून पाहिले देखील नाही. एकाने त्यास विचारले, "तुम्ही काय हातात बांगड्या भरल्या आहेत काय? त्या बदमाशाचे चाळे तुम्ही निमूटपणे का सहन करता?" त्या सौजन्यमूर्तीने ते बोलणे ऐकून त्यास म्हटले, "बाबा! असे बोलू नकोस! एखाद्या दारुड्याने वाघाशी लढू शकणाऱ्या मर्दाची गळपट्टी धरून ओढणे त्याला शोभत नाही. बुद्धिवंताचे जीवन असेच! तो छळ सोसतो आणि लोभ ठेवतो."

### थोर व्यक्तींचा स्वाभिमान

एका कुत्र्याने एका आदीवासीच्या पायाचा असा कडाडून चावा घेतला की त्याच्या पायातून रक्त गळू लागले. त्या बिचाऱ्याला दुखापतीमुळे रात्री झोप आली नाही. त्याची एक लहान मुलगी होती. तिला बापाचा राग आला आणि तिने त्याला विचारले, "बाबा! तुम्ही गप्प कसे बसलात? त्या कुत्र्याला चावावयाला तुम्हास दात नाहीत का?" वडिलांनी मुलीला समजावून सांगितले, "बेटा, त्या कुत्र्यापेक्षा अमाप शक्ती माझ्याजवळ आहे, पण त्या कुत्र्याला चावून माझे दात कुत्र्याच्या शरीराला लागू नयेत. नालायक माणसाशी अधमपणाने वागता येईल पण काही झाले तरी माणसाला कुत्र्यासारखे वागताच येणार नाही."

### सच्छील सावकार आणि उद्धट गुलाम

एक साधुवाणी फार प्रसिद्धीस आला होता. पण त्याचा गुलाम मात्र फार शेफारलेला होता. त्या कुरळ्या केसाच्या पोराच्या मालकाला फार त्रास होत

असे. अजगरासारखे विषारी दात होते त्याचे ! वागणुकीत गावच्या सगळ्या बदमाशांपेक्षा तो वरचढ होता. त्याचे डोळे नेहमी लाल असत. आणि त्यातून पाणी गळत असे. काखेतून तर कांद्यासारखा दर्प येत होता ! तो स्वयंपाक करताना फार त्रागा करावयाचा आणि स्वयंपाक झाल्यावर मालकाबरोबर बसून जेवायचा ! जेवणात तो मालकाशी बरोबरी करीत असे, पण तो इतका बेफिकीर होता की, मरणाच्या पंथाला लागलेल्या माणसाला त्याने पाणीसुद्धा दिले नसते. दमदाटी किंवा छडीच्या माराला तो जुमानत नसे. त्याच्या रात्रंदिवस चालणाऱ्या धिंगाण्यामुळे घराला अवकळा आली होती. तो कधी वाटेत केरकचरा टाकावयाचा तर कधी विहिरीत कोंबडी टाकायचा. त्याच्या (तंग) कपाळावरून त्याच्या नीचपणाची प्रतीती येत असे. तो काही कामासाठी बाहेर गेला तर घरी कधी परतेल याचा नेम नसे. कोणा एकाने त्यास विचारले, "या बदमाश गुलामात तुला काय चांगले दिसले ? त्याला काही काम येत नाही. रीतभात नाही आणि रूप तर नाहीच. हे पात्र अगदीच कुचकामी आहे. त्याचे तू लाड करावेस अशी त्याची मुळीच लायकी नाही. त्याला गुलामाच्या जत्रेत विकून टाक ! मी तुझ्यासाठी दुसरा एक गुणी आणि गोंडस गुलाम आणून देतो. जर कोणी त्याच्या बदली एक पैसा देण्यास तयार झाला नाही तरी नकार देऊ नकोस. खरे म्हणजे त्याला एका पैशात घेणेसुद्धा महागच पडेल."

त्या सज्जनाने मित्राचे बोलणे ऐकून म्हटले, "माझ्या कुलीन मित्रा ! तू म्हणतोस ते खरे आहे पण त्याच्या संगतीत मी सुस्वभावी झालो आहे. त्याचा छळ सतत सोसला असल्यामुळे मला कोणाचाही उद्धटपणा सहन करता येतो. त्याला विकून दुसरा आणावयाचा आणि त्याला हा कसा वाईट होता हे सांगत बसावयाचे ! हा काय उद्योग झाला ?. मी याचा जुलूम सहन करतो, कारण कोणा दुसऱ्यावर तशी पाळी येऊ नये."

आपल्याला जे हवे असते तसे दुसऱ्यानांही लाभावे. तुला जर कोणत्या एका गोष्टीचा त्रास होत असेल तर तसला त्रास दुसऱ्यांना होऊ नये, यासाठी काळजी घे.

क्षमा आणि शांती हे सुरुवातीचे कडू घोट असतात. पण सरावल्यावर तुम्हांला सहिष्णुता मधासारखी गोड वाटू लागते.

## हजरत कुरखी आणि दुखणाईत मुसाफिर

आपल्या डोक्यातून अहंकार आणि उमटपणा काढून टाकल्याशिवाय कोणाचीही हजरत मारुफ कुरखी धर्मशास्त्र्याकडे वरणी लागत नसे. मला असे कळले की कोणी आजारी मनुष्य त्यांचेकडे पाहुणा म्हणून आला. त्याचे केस गळून टक्कल पडले होते. तोंड विद्रूप झाले होते. तो कसाबसा जीव धरून जगत होता. तो रात्री मुक्कामाला राहिला आणि लोडाला टेकून बसला. त्याने जोरात आक्रोश करण्यास सुरुवात केली. रात्रभर त्याचा डोळ्याला डोळा लागला नाही. तो अत्यंत कष्टी आणि त्रासिक स्वभावाचा

झाला. तो धड मरतही नव्हता पण लोकांवर तोंडसुख घ्यायचा ! त्याची आरडा-ओरड, रडणे, कुंथणे, झोपणे, जागणे याला कंटाळून लोक त्याला टाळू लागले. त्या घरातील लोकांपैकी हजरत मारुफ कुरखीशिवाय कोणाचा पाय घरात टिकत नसे. मला कळले की ते दोन दोन रात्री त्याच्या उपचारासाठी जागून काढत असत. आणि तो सांगेल ते करीत असत. एका रात्री मात्र त्यांचा डोळा लागला होता ! नाही तरी मनुष्य जागरण तरी किती करणार ? त्याना झोप लागत होती तेवढ्यात त्या मनुष्याने बरळण्यास सुरुवात केली, "अहंकारी उर्मट, निर्लज्ज आणि कपटी लोकांचा धिक्कार असो. उंची कपडे घालून मोठमोठी तत्त्वे सांगत मिरवणारे हे लोक ठक आहेत आणि त्यांनी साधुपणाचा बाजार मांडला आहे ! ह्या दारावूर झोपणाऱ्या लोकांना ज्याची पापणी लवत नाही अशा परदेशी इसमाचे दुःख कसे कळणार ? " त्याने कुरखीलाही आपल्याकडे दुर्लक्ष करून झोपण्यास सुनावलेच !

कुरखीने मन मोठे करून हे सर्व त्याचे बोलणे सहन केले. पण घरातील लोकांनी ते सारे ऐकले. त्याच्या बायकोने जवळ येऊन विचारले, " या रडघा दरवेशाने काय म्हटले ते ऐकलेत का ? त्याला म्हणावे आता तुझे चंबुगवाळे आवर आणि चालता हो. आपली ब्याद एकदाची घेऊन जा आणि दुसऱ्या कोठल्या तरी ठिकाणी जाऊन मर ! अहो चांगुलपणा आणि दया योग्य ठिकाणीच शोभते !

नादानांशी चांगले वागून उपयोगी नाही ! या नीच माणसाला तक्क्याशी टेकायला का देता ? लोकांना त्रास देणाऱ्याचे डोके दगडानेच ठेचावे ! तुम्ही सज्जन आहात ! वाईट लोकांशी चांगले वागू नये. नाहीतर हे शहाणे खाऱ्या जमिनीतदेखील झाडे लावतील ! विचारीपणाने वागू नये असे मी म्हणत नाही. पण आपली बुद्धी नालायक लोकांसाठी खर्ची घालू नका ! बदमाशाशी शिष्टाचाराने आणि सौजन्याने वागू नये. मांजराप्रमाणे कुत्र्याला कोणी गोंजारत नाही. खरे सांगावयाचे तर कुत्रा-देखील आपल्या प्रामाणिकपणामुळे कृतघ्न माणसांपेक्षा श्रेष्ठ होय ! गार पाणी प्यावयाला देऊन कोणाही दुर्जनाचे आदरातिथ्य करू नये. केल्यास त्याच्याकडून समंजसपणाची अपेक्षा करू नये. या माणसासारखा गलिच्छ प्राणी मी पाहिलेला नाही. याची गय मुळीच करू नका ! "

कुरखी किंचित स्मित करून म्हणाला, " लाडके ! याची बडबड एवढी काय मनावर घेतेस ! तो माझ्यावर चिडून बोलला. पण मला ते त्याचे रागावणे आवडले. ज्याला दुःखामुळे मुळीच आराम मिळालेला नसतो त्याचा चिडखोरपणा सहन करावा. "

जर तुला आरोग्य आणि सुख लाभले असेल तर तू त्याबद्दल देवाचे आभार मानून हतभाग्यांसाठी झीज सोसावीस.

तू स्वतः जर असाच असशील तर चित्राप्रमाणे पुसला जाशील आणि तुझे

नाव देखील तुझ्या देहाप्रमाणे नाहीसे होईल. सौहार्दाचे रोप वाढीस लावलेस तर तुला कीर्तीचे गोड फळ चाखावयाला मिळाल्याशिवाय राहणार नाही.

या करख गावात तशा कबरी पुष्कळ आहेत. पण मारुफ करखीच्या कबरी-प्रमाणे नावाजलेली कबर दुसरी कोणतीही नाही ! अहंकाराची पगडी खाली काढून ठेवणाऱ्यालाच या जगात भाग्य हात देते. ज्याला श्रेष्ठता लाभते तो शेफारून जातो. कदाचित तुला माहीत नसेल की मोठेपणा पत्करणे म्हणजे एका प्रकारची हमालीच आहे.

## नालायकांचा नीचपणा आणि सज्जनांची सहिष्णुता

एका उपटसुंभाने एका दरवेशाजवळ याचना केली. त्याच्या कनवटीस काही नव्हते आणि हातात तर ठणठणाटच होता म्हणून बरे झाले. नाहीतर तो हातात येईल ते बिनदिक्कतपणे देऊन टाकत असे. तो धटिंगण हिरमुसला होऊन चालता झाला आणि गल्लीबोळात फिरताना त्याच्या नावे शंख करत सुटला. "देव छुप्या विंचवापासून आमचे रक्षण करो ! हे नरपशू दरवेशांसारखे कंथा पांघरून हिंडत असतात. हे लोक गरीब मांजराप्रमाणे वाटतात, पण सावज पुढ्यात आले की कुत्र्याप्रमाणे त्याच्यावर तुटून पडतात. ह्या लोकांनी आपले ठकबाजीचे दुकान मशिदीत मांडले आहे, कारण त्यांना घरी बसून शिकार कशी साधता येईल ?

बहाद्दर चोर–दरोडेखोर काफिल्यावर हल्ला चढवितात, पण हे ढोंगी चांगल्या लोकांचे कपडे काढून घेतात. याच्या अंगावर पाहा ! कंथा काळ्या पांढऱ्या ठिगळांनी भरली आहे. पण त्याच्या आत केवढी माया जोडली आहे म्हणता ! या भामट्यांना काय म्हणावे ? जगात हे मोकाट सुटले आहेत. रात्री दुसऱ्यांसाठी प्रार्थना करतात, पण सकाळी दक्षिणा मागतात. आणि सज्जनांच्या खळ्यातून दाणे मागून नेतात. ह्यांची लुच्चेगिरी पाहा ! दाखवतात गहू पण विकतात जव ! ते नमाज पढण्यात गुंतले असताना पाहून यांना अशक्त किंवा सुस्त मुळीच समजू नका ! जरा मोका मिळताच तरुणापेक्षा ते जादा उत्साहाने नाचतील बागडतील. हे लोक पैगंबर मुसाच्या काठीप्रमाणे[७९] खादाड आहेत. पण दिसण्यात मात्र फार संयमी आणि निःस्पृह वाटतात. ह्यांना उपासतापास माहीत नाहीत, आणि अक्कल तर कवडीचीही नाही. ह्यांचा उद्योग काय, तर म्हणे फक्त धर्माच्या नावाखाली पैसा कमावणे. परमभक्त बलाला[८०] प्रमाणे ते साधा कंथा वापरीत नाहीत तर बायकांप्रमाणे छान-छोकीचा पोशाख बनवून घेतात. पैगंबर मुहम्मदांच्या चारित्र्याची यांना कल्पना नाही. पण फक्त त्यांचे ते अनुकरण करतात. ते दुपारी पहुडतात आणि रमजानांत उपवास सोडतात. त्यांच्या पोटात गळ्यापासून बेंबीपर्यंत खाल्लेले अन्न ठासून भरलेले असते आणि त्यात फकिरांच्या पडशीतील पदार्थाप्रमाणे नाना रंगाचे पदार्थ असतात.

मी यापेक्षा अधिक काही बोलत नाही. कारण जातभाईंच्या लीला वर्णन

करणे म्हणजे निंदा ठरते." त्या अविचारी माणसाने आपल्याला जे जे वाटले ते सर्व सांगितले. कारण निंदकाला सद्गुणांची पारख असते कोठे ? ज्यांनी शेकडो निर्लज्ज-पणाची कामे केली असतील त्याला दुसऱ्यांच्या अब्रूची काय पर्वा !

साधूच्या शिष्याने ही हकीकत त्याच्या कानावर घातली. खरे म्हणजे हे त्याने काही चांगले काम केले नव्हते. त्या साधूच्या मनात आले, "ज्याने माझी निंदा केली व नंतर जो झोपी गेला तो माणूस माझ्यापर्यंत येऊन ती मला ऐकायला लावणाऱ्या दोस्तापेक्षा चांगला ! एकाने माझ्यावर बाण मारला आणि तेथेच थांबला. मला त्यापासून काही इजा झाली नाही, तू मात्र तो बाण आणून माझ्या बरगडीत टोचतो आहेस."

तो सज्जन साधू हसला आणि शिष्याला म्हणाला, "हात्तीच्या ! एवढेच ! त्याला म्हणावे यापेक्षा माझी आणखी नालस्ती केलीस तरी हरकत नाही ! त्याने जे काही सांगितले ते माझ्या अधमपणातील एक अंश आहे. मला माहीत असलेल्या माझ्या दोषांपैकी हे एक टक्काही भरणार नाहीत. त्याने हे सर्व दोष कल्पनेनेच रंगविले आहेत. पण मी ठासून सांगतो की हे सर्व अवगुण माझ्यात नक्कीच आहेत. हा तर याच वर्षी मला भेटला ! माझ्या सत्तर वर्षांच्या हयातीतील बिंगे ह्याला कशी कळणार ? माझे दोष माझ्याशिवाय फक्त अल्लाहलाच कळतात. माझे फक्त इतके थोडे अवगुण जाणणाऱ्या सज्जनाला मी अजून पाहिलाच नाही. अंतिम न्यायदानाच्या दिवशी त्याने माझ्या पापांबद्दल साक्ष दिली तर मी नरकाला मुळीच भिणार नाही. माझा कोणी शत्रू माझ्या पापांचा पाढा वाचत असेल तर त्याला सांगा की अजून अधिक माहिती हवी असेल तर माझी वही घेऊन जा ! जे आपल्या निंदानालस्तीला तोंड देतात तेच देवाच्या मार्गातील शूर पाईक होत. लोकांनी तुमची परवड चाल-विली असेल तर निमूटपणे सहन करा. कारण साधुसंत धटिंगणाचे अपशब्द ऐकून घेत असतात."

निंदकांचा त्वेष पाहून घ्या ! जर कोणी मेला आणि त्याच्या पापांचे मडके बनविले तर ते मडकेदेखील हे निंदक आपल्या टीकास्त्राने फोडून टाकतील.

### उद्धट गोसावी आणि मर्यादशील राजा

सिरिया देशातील सालेहचा बादशहा (१४ वे शतक) प्रजेचा योगक्षेम पाह-ण्यासाठी एके दिवशी सकाळी गुलामास बरोबर घेऊन बाहेर पडला. तो गल्ल्यातून आणि बाजारातून फिरला. अरबी पद्धतींप्रमाणे त्याचे तोंड अर्धे झाकलेले होते. त्याला माणसांची पारख होती आणि गरिबांचा कळवळा होता. ज्याला हे दोन गुण लाभले आहेत तोच खरा बादशहा !

त्याने एका मशिदीत दोघे दरवेशी एका भिंतीला टेकून बसलेले पाहिले. ते अत्यंत कष्टी आणि दयनीय स्थितीत होते. रात्रीच्या वेळी गारठ्यामुळे त्यांना

झोप लागली नव्हती. सकाळी उठून सरड्याप्रमाणे सूर्यकिरणांची वाट पाहात ते बसले होते. त्यांपैकी एकजण म्हणत होता, " आम्ही मेल्यावर जो अंतिम न्याय-दानाचा दिवस येईल तेव्हातरी आमची कोणी विचारपूस करणारा अधिकारी आम्हाला भेटेलच की ! हे राजे लोक मगरूर आणि बेदरकार असतात. त्यांना खेळ, मौज आणि चैनबाजी एवढे मिळाले म्हणजे बस ! तेवढ्याने सुद्धा हे लोक यशस्वी होतात. आम्हा गरिबांची स्वर्गात असल्या लोकांशी संगत घडावयाची असल्यास मी माझ्या कबरीतून कधी वर डोके काढणार नाही. आम्ही आज तापत्रयांच्या कचाट्यात सापडून हवालदील झालो आहोत, म्हणून स्वर्गावर आमचा वारसा हक्क आहे. उभ्या आयुष्यात त्या बादशहा लोकांकडून कोणतीच मेहेरबानी घडली नाही. मग मरणोत्तर पुन्हा त्याच्या संगतीत राहण्याची शिक्षा का भोगावी ? 'सालेह' चा बादशहा जर या बागेच्या भिंतीपाशी आला तर मी माझे जोडे काढून त्याचे डोके ठिकाणावर आणीन. "

त्या फकिराचे बोलणे बादशहाने ऐकले आणि तेथे फार वेळ उभे राहू नये असे त्याला वाटले.

थोड्या वेळाने उजाडले आणि सूर्यकिरणांनी झोपाळू लोकांचे डोळे उघडले. बादशहाने एक मनुष्य पाठवून त्या दोघांना बोलावून घेतले आणि मर्यादेने त्यांना सामोरे जाऊन त्यांना आसन दिले. त्यांचे आदरातिथ्य उत्तम प्रकारे केले, आणि त्यांचा ओंगळ अवतार पार धुवून काढला. थंडी, वारा, ऊन यांची सवय असणारे फकीर आता मोठमोठ्या सरदारांशी मांडीला मांडी लावून बसले होते. ज्यांनी अंथरुणापांघरुणाशिवाय रात्रीच्या रात्री काढल्या होत्या, ते आता आपले कपडे धुपाने सुवासित करीत होते. त्यांपैकी एकाने हळूच बादशहास म्हटले, " जहाँपनाह ! आपली सत्ता साऱ्या जगावर चालते. राजाची मेहेरबानी झाल्यास त्याचा मोठा मानसन्मान होतो. पण आम्ही कोणाचे घोडे मारले आहे ? "

बादशहा खुषीत आला. त्याचे मन फुलासारखे सुकुमार झाले. तो स्मित करून फकिरास म्हणाला, " मी श्रीमंतीने हुरळून जाणारा बादशहा नव्हे. मी गरिबांकडे कधीच पाठ फिरविलेली नाही. तुम्हीसुद्धा माझ्याशी आढ्यतेने वागू नये. स्वर्गात माझ्याबद्दल अढी बाळगून वागू नका. मी जगातील लोकांसाठी सुलह[<1] चे दरवाजे मोकळे ठेवले आहेत. तुम्ही मात्र उद्या (मेल्यावर) मला पाहून स्वर्गाचे दार बंद करू नका ! तुम्हास भाग्य हवे असेल तर तुम्ही हा पंथ अनुसरावा. तुम्हास कीर्ती हवी असेल तर साधुसत्पुरुषांची काळजी घ्या. तूबाचे (कल्पवृक्षाचे) फळ हवे असेल तर सद्भाग्याचे बीजारोपण करावे लागते. तुला साधुसंतांचा त्रास वाटत असेल तर सार्थकतेची हाव धरू नकोस. आपली वागणूक चांगली असेल तर भरघोस यश पदरात पडते. कंदिलात पाणी भरले तर तो प्रकाश कसा देईल ? तुझ्या हृदयात अहंकार

भरलेला असल्यामुळे तुझ्यात भक्तीरूपी ज्योत कशी उजळेल ? समईचे हृदय दीप्तीने भरले आहे म्हणूनच तिच्यामुळे दुसऱ्यांना प्रकाश लाभतो. "

## अहंकारी लोक अपेशी ठरतात

एका गृहस्थाला ज्योतिषाचे थोडेबहुत ज्ञान होते, पण गर्वाने तो आपल्याला मोठा विद्वान समजत होता. फार मोठा प्रवास करून तो हकीम कोषयारकडे[२] आला. तो आत्मप्रौढीने भारला होता आणि त्याच्या डोक्यात मस्ती चढली होती. हकीम कोषयारने मुळी त्याच्याकडे लक्षच दिले नाही. आणि ज्योतिर्विद्येचे एक अक्षरही शिकविले नाही. पण झाले असे की तो पदरी काही न पडताच तेथून निघणार होता, त्या मानी हकिमाने त्यास म्हटले, " तुम्ही आपल्याला विद्वत्तेने परिपूर्ण समजत आहात. भरलेली घागर कशी भरावयाची हो ? "

तुम्ही पोकळ दंभ सोडला तरच तुम्हांला ज्ञान साठविता येईल. पण तुमचे डोके अहंकाराने भरलेले असेल तर तुम्हांला रिकामेच जावे लागेल. तुझा स्वभाव ' शेख सादी ' सारखा असेल तर रिकाम्या डोक्याने ये आणि ते ज्ञानाने भरून घेऊन परत जा.

## खरे देशभक्त आणि त्यांचे यथार्थ ज्ञान

एक गुलाम आपल्या मालकावर रागावून निघून गेला. त्याने त्याला शोधून आणण्याचा हुकूम सोडला. पण तो कोणाला सापडला नाही. त्याचा राग शांत झाल्यावर तो जेव्हा घरी परतला तेव्हा मालकाने मारेकऱ्याला त्याची मुंडी उडविण्यास सांगितले. त्या पाषाणहृदयी मांगाने रक्त पिण्यासाठी हावरटपणाने जीभ बाहेर काढावी तशी तलवार म्यानातून काढली. तो गुलाम जिवाची सारी आशा सोडून परमेश्वराची प्रार्थना करत म्हणाला, " देवा ! माझ्या मालकाला माझ्या खुनामुळे मी मुळीच दोषी समजत नाही. कारण मला त्याचा कनवाळूपणा आणि आश्रय लाभला आहे आणि मी मजेत आयुष्य घालविले आहे. अंतिम न्यायदानाच्या दिवशी माझ्या खुनापायी याला अटक करून याच्या शत्रूंना आनंद देऊ नकोस. "

मालकाच्या कानावर हे त्याचे बोल पडल्याबरोबर त्याच्या रागाला पुन: उधाण आलेच नाही. मालकाने त्या पोराला जवळ बोलावून गोंजारले. मालकाची कृपा झाल्यावर वाजंत्री वाजवून मिरवत न्यावे तसा सन्मान मिळाला. बादशहाच्या कनवाळूपणामुळे त्या गुलामाला मोठ्या भयंकर आपत्तीतून पार पडून मोठ्या योग्यतेस पोहोचता आले. या गोष्टीचे तात्पर्य एवढेच की तुम्हाला चतुराईने बोलता येत असेल तर अग्नीला देखील गार करून टाकाल ! रणांगणावर बाणांचा, तलवारींचा मारा सहन करण्यासाठी देखील शंभरपदरी रेशमी चिलखतच वापरतात हे तुला ठाऊक नाही काय ?

## सज्जनांची शालीनता आणि निरहंकारी वृत्ती

एका पासोडीपंताच्या झोपडीतून कुत्र्याच्या भुंकण्यासारखा आवाज येत होता. एक जण तो ऐकून म्हणाला, "या झोपडीत कुत्र्याचे काय काम! जरा बघू या तरी काय प्रकार आहे तो!"

तो झोपडीजवळ गेला, पण त्याला कुत्रा काही दिसला नाही. झोपडीत एका गोसाव्याव्यतिरिक्त कोणी नव्हते. तो बुचकळ्यात पडला. आपल्याला कोणती शंका आली तिचा उच्चार करण्याचाही त्याला संकोच वाटला. तो परत निघाला. इतक्यात आतील पासोडी पांघरणाऱ्या दरवेशाने त्याला उद्देशून म्हटले, "असे बाहेरच का उभे! प्यारे दोस्त! तुम्ही आताच कुत्र्याचा आवाज ऐकला नाही का? मला वाटते की परमेश्वराला दैन्यच फार आवडते. मी सर्व अहंकारबुद्धी आणि शिष्टपणा सोडून दिला आणि ईश्वराच्या दाराशी कुत्र्याप्रमाणे वाईट गळ्याने दैन्य भाकणे सुरू केले. कारण कुत्र्यापेक्षा हीनदीन प्राणी दुसरा कोणी असल्याचे मला माहीत नाही."

तुम्हाला श्रेष्ठपदी पोहोचावयाचे असेल तर त्यासाठी अगोदर कमीपणा पत्करावा लागतो. ईश्वराच्या दरबारात स्वतःला कस्पटासमान मानणारेच उच्चपदी अधिष्ठित होतात.

नद्यांना पूर येतो तो पर्वताच्या उंचवट्यावरून. पण त्याला मान खाली घालून वाहात जावे लागते आणि खाचखळगेच त्याच्या वाट्याला येतात. मात्र दवबिंदूचे तसे होत नाही. ते दीनपणाने जमिनीवर येतात पण सूर्याने हात देताच ध्रुवताऱ्या[८३] इतक्या उंच ठिकाणी जाऊन पोहोचतात.

## बहिऱ्या हातिम साधूचा[८४] सालसपणा

काही इतिहासकारांना 'हातिम बिन उन्वान' हा साधू खरोखरीच बहिरा होता याबद्दल शंका वाटते. एके दिवशी सकाळी एक माशी भिरभिरत असल्याचे त्याच्या कानी आले. ती माशी एका कोळ्याच्या जाळ्यात अडकून पडली होती. कोळ्याने आपल्या शांतपणाचे आणि गरीबपणाचे सोंग भिरकावून दिले. जाळ्यातील माशी म्हणजे त्याची मिठाईच झाली. मध, मिठाई हे सर्वत्र आढळतात असे समजू नका! कधी कधी काही मोक्याच्या कोपऱ्या मागे पारधी देखील दडून बसलेला असतो.

हातिमच्या बैठकीतील एकाने म्हटले, "नवल आहे साधू महाराज! आम्हांला देखील जो ऐकू आला नाही तो माशीचा तडफडाट तुमच्या कसा काय कानी आला? तुम्हाला माशीचा शब्द देखील समजतो, त्याअर्थी तुम्हास बहिरे म्हणणे गैर आहे." हातिमने स्मित करून म्हटले, "बाबा! पोकळ स्तुती ऐकण्यापेक्षा बहिरेपणा पत्करला. माझ्या बैठकीतील लोक माझ्या अवगुणांकडे कानाडोळा करून माझी स्तुती करणारेच आहेत. माझ्या उणिवांची मला कल्पना येत नसल्यामुळे मी

आपल्याबद्दल भलतीच कल्पना करून घेतो आणि माझ्या अंगी अहंकार उद्भवतो. म्हणून मी बहिरेपणाचे सोंग घेतो. कारण त्यामुळे लोकांना औपचारिकपणा दाखविण्याचा त्रास पडत नाही. लोक मला बहिरा आणि बावळट समजून माझ्या गुणावगुणांची मनमोकळेपणाने चर्चा करतात. माझ्याबद्दलच्या वाईट गोष्टी माझ्या कानी पडतात तेव्हा मला खेद होतो आणि मी दुष्कर्म टाळतो."

खुषामतीची हाव धरून खड्डयात पडू नका! गुणी हातिमाप्रमाणे आपले अवगुण समजून घेऊन जो "सादी"चा उपदेश मानणार नाही त्याला उत्कर्ष लाभणार नाही.

तुम्हांला सादीपेक्षाही चांगला उपदेशक हवा असेल तर मात्र माफ करा! त्याच्यानंतर तुमची गत काय होईल ते मला सांगता येणार नाही.

## साधू आणि चोर

तबरेज[*] शहराशेजारी एक साधू राहात असे. एका चोराला दोरीचा फास सज्जावर फेकताना पाहून तो मोठ्याने ओरडला आणि लोकांना वर्दी दिली. सर्व बाजूंनी लोक काठ्या घेऊन धावत आले. त्या भित्र्या चोराने लोकांचा गोंगाट ऐकला. तेथे राहणे त्याला दुरापास्त झाले. लोकांच्या आरोळ्या ऐकून तेथून त्याने पाय काढला.

त्या चोराच्या पदरी काहीच पडले नाही. या जाणिवेने त्या कोमल हृदयाच्या साधूला फार वाईट वाटले. त्या काळोख्या रात्री तोही त्याच्यापुढे धावला आणि एका दुसऱ्या वाटेने येऊन त्याच्यापुढे उभा राहिला. त्याने त्यास म्हटले, "दोस्त! पळून जाऊ नकोस, मी तुझा मित्र आहे. तुझी हिंमत पाहून मी तुझा दास बनलो असे म्हटले तरी चालेल. तुझ्यासारख्या अचाट धैर्याचा मनुष्य मी पाहिला नाही. लढाईत सुद्धा दोन प्रकारे धैर्य दाखविता येते. एक म्हणजे धैर्याने शत्रूला सामोरे जाणे आणि दुसरे म्हणजे जीव वाचवून रणभूमीतून पळ काढणे. या दोन्ही गुणांत मी तुझा चेला समज. तुझे नाव काय? मी तुझ्याच नावाचा गुलाम. तुला पसंत पडल्यास मला माहीत असलेल्या वाटेने मी तुला घेऊन जाईन. तेथे एक लहानसे घर असून त्याचे दारही घट्ट लावलेले आहे. शिवाय घरधनीही नसेलच. आपण दोघे तेथे जाऊ, दगड रचून एकमेकांच्या खांद्यावर चढून वर जाऊ. अशा रीतीने जे हाती लागेल तेवढेच घेऊन तू निघून जा. रिकाम्या हाताने जाण्यापेक्षा हे बरे."

असे बोलून त्याने लडिवाळपणाने गोड गोड बोलून त्यास आपल्याच घरी नेले. त्या शूर चोराने त्याला आपल्या खांद्यावर घेताच तो वर गेला. आणि त्याने आपला अंगरखा, फेटा यांसह सर्व माल वरूनच त्याच्याकडे फेकला. त्याचवेळी त्याने "चोर आला चोर! मित्रांनो त्यास मदत करणे पुण्यकर्म आहे." असे ओरडण्यास सुरुवात केली, तेव्हा तो खरा चोर खाली उडी मारून मालासह पळून

गेला. ते पाहून त्या देवभक्ताला त्या खुळचट चोराच्या पदरात काही तरी पडले म्हणून मनोमनी आनंद झाला.

जो कधी कोणावर दया करत नाही त्याच्याबद्दल देखील करुणार्द्राला दया येते. दुर्जनावर देखील कृपा करण्याची सज्जनांची वृत्ती आश्चर्य करण्याजोगी नाही. कारण अशा सज्जनांच्या पुण्याईचे दुर्जनही वाटेकरी होतात. ते दुर्जन उपकार करण्याच्या लायकीचे नसतात हा भाग निराळा.

## प्रिय पात्रासाठी शत्रूचा छळ सोसावा

एक मनुष्य 'सादी' सारखा साधाभोळा होता आणि एक सुरेख पोरावर आषक झाला होता. तो आपल्या प्रतिस्पर्धी दुश्मनाचे टोमणे सहन करी. पण दांडूने मारलेली विटी जशी उडते तसा तो दूर गेला नाही. त्याने कोणावर रागावून कपाळाला कधी आठया घातल्या नाहीत. तो कोणाशी भांडणतंटाही करत नसे. एकाने त्यास विचारले, "तुला लाजलज्जा काही आहे की नाही? तू किती लाथाबुक्क्या खातोस? जें मोहात गुरफटलेले असतात तेच मूर्खपणाने आणि हवालदिल होऊन शत्रूचा छळ सोसतात. मूर्खांचे चाळे चालू देता कामा नये, कारण लोक म्हणतील की याच्यात काही पौरुष नाही."

त्या आषकाने जे उत्तर दिले ते सोनेरी अक्षराने लिहून ठेवण्यासारखे आहे. "माझे हृदय माझ्या प्रिय पात्राच्या प्रेमाचे ठिकाण आहे. तेथे कोणाहीवरच्या रागाला वाव नाही!"

सदाचारी बहलोलची एका भांडकुदळ विद्वानाशी गाठ पडली असता तो जे बोलला ते लक्षात ठेवण्यासारखे आहे. "या वावदुकाला प्रिय पात्र ओळखता आले असते तर तो शत्रूशी लढत बसला नसता. ह्याला ईश्वराच्या अस्तित्वाची जाणीव असती तर सारे जग त्याला आभास वाटले असते."[८६]

## तत्त्ववेत्ता लुकमान[८७] आणि बगदादचा माणूस

महान तत्त्वज्ञानी लुकमान सोवळा होता. तो चैनी गडी नव्हता. आणि नाजूकही नव्हता. एकाने त्यास वेठीस धरले आणि बगदादमध्ये माती खणण्याच्या कामी लावले. त्याने त्याला एक वर्षभर घर बांधण्यात गुंतविले पण कोणीही त्यास त्या सरदाराचा गुलाम समजत नव्हता. त्या सरदाराचा एक गुलाम पळून गेला होता. तो एके दिवशी परत आला. त्याने लुकामानला पाहिले आणि ओळख पटल्यावर तो घाबरला. त्याच्या पायावर त्याने डोके ठेविले आणि माफी मागितली. लुकमान हसून म्हणाला, "त्यात माफ करण्यासारखे काय आहे? मी एक वर्षभर तुझा छळ सोसला. आता एका घटकेत तो मनातून कसा काढून टाकता येईल? तरी देखील तुला माफ करतो. कारण तुझे बरे झाले तरी त्यात आमचे काही नुकसान नाही. तू आपली शय्या सजविलीस. मी पारमार्थिक ज्ञान मिळविले. भाग्यवंता! माझ्या पदरी एक गुलाम आहे. त्याच्या-

कडून मी बरेच काम करवून घेतो. मी त्याच्याशी कठोरपणाने वागणार नाही. कारण मला मातीत काम करताना झालेल्या कष्टाची आठवण येत असते."

ज्याने मोठ्यांचा छळ सोसला नाही त्याला दयामाया नसते. चक्रवर्ती बहरामने आपल्या वजिराला 'प्रजेला छळू नकोस,' असे सांगितले. तुला वरिष्ठांची बोलणी सहन करावी लागली तरी त्याबद्दलचा राग प्रजेवर काढू नकोस.

### जुनैद" बगदादींची नम्रता

हजरत अबुल कासिम जुनैद यांनी सनआच्या जंगलात एक सुळधाचे दात नसलेला कुत्रा पाहिला. वाघाचा चावा घेणारा कुत्रा त्यामुळे म्हाताऱ्या कोल्ह्या-सारखा दुबळा बनला होता. आता त्याला हरणावर झडप घालता येत नव्हती. एखाद्या शेळीने देखील खुशाल लाथ मारावी एवढा तो गलितगात्र झाला होता.

जुनैद यांनी त्या कुत्र्याची दैन्यावस्था पाहिली, आपण आणि तो दीन कुत्रा यात कोण श्रेष्ठ असा त्यांना प्रश्न पडला, आणि त्यामुळे ते अतिशय खिन्न झाले. "आज मला श्रेष्ठ समजतात; पण देवाघरच्या न्यायाने माझ्याकरिता काय वाढून ठेवले आहे कोणास ठाऊक? माझी श्रद्धा अविचल राहिली तर ईश्वरी अनुग्रहाचे किरीट माझ्या मस्तकावर चढेल. आणि परमार्थ ज्ञानाचा सदरा माझ्या अंगावर राहणार नसेल तर मात्र माझी दशा या कुत्र्यापेक्षा वाईट होईल. कुत्रा जर या दैन्यावस्थेत मेला तर त्याला नरकात घेऊन जाणार नाहीत. 'सादी!' तुला हे माहीत आहे काय की जे सन्मार्गी वाटचाल करतात त्यांना आपले अस्तित्व जाणवत नाही. महात्मे देवदूतांपेक्षा श्रेष्ठ असतात. याचे कारण म्हणजे ते स्वतःला कुत्र्यापेक्षा हीन दीन समजतात हे होय."

### साधू आणि पुंगीवाला

एक मनुष्य मस्त पिऊन पुंगी बगलेत मारून निघाला होता. रात्रीच्या वेळी त्याने एका साधूच्या डोक्यावर पुंगी हाणली. दिवस उजाडल्यावर त्या संयमी साधूने त्या निष्ठुर माणसाला मूठभर चांदीचे तुकडे दिले आणि तो म्हणाला, "काल रात्री आपण मगरूर आणि बेहोश दशेत होतात. त्यामुळे तुमची पुंगी फुटली आणि माझे डोके फुटले. माझी जखम बरी झाली आणि वेदना थांबल्या. पण तुमची पुंगी चांदीचे तुकडे चिकटविल्याशिवाय दुरूस्त होणार नाही."

'संत भगवंताला आवडतात याचे कारण असे की ते लोकांसाठी हालअपेष्टा सहन करतात.'

### श्रेष्ठ पुरुष नालायकांचा छळ सोसतात

वखष या गावात एक मनुष्य निवांत स्थळी राहात असे. तो संन्यस्तवृत्तीने राहात असे, पण गोधडीवाल्या दरवेशाप्रमाणे भिक्षा मागत हिंडत नव्हता. एकदा त्याच्यावर नशिबाने कृपा केली आणि त्याच्या वाटेला कोणी जाईनासा झाला. एका धटिंगणाने

मोठ्या धिटाईने त्याला डिवचण्याचा प्रयत्न केला आणि तो त्याला शिवीगाळ करू लागला. "काय महाराज! हा काय तमाशा आरंभला आहे तुम्ही! न्यायाधीश सुलेमानाच्या जागी विराजमान होणारे ढोंगी सैतान आहात झाले! मांजरासारखे मौनी आणि गल्लीतील उंदरांचे कर्दनकाळ! हे लोक जपतप करतात ते आपले नाव गाजविण्यासाठी. पोकळ ढोलकेच दूरवर ऐकू जाते ना!"

तो असा बरळत असताना बघे लोक भोवताली जमले. बायका आणि पुरुष ती गंमत पाहण्यासाठी उत्कंठीत झाले होते. वखषचा विद्वान कष्टी झाला आणि त्या मनुष्याला पश्चात्ताप करण्याची सद्‌बुद्धी दे असे देवाला विनवू लागला. "जर याचेच म्हणणे खरे असेल तर मलाच वाईट मार्गाने जाऊन विनाश ओढवून घेण्यापासून वाचव. मला याची छिन्द्रान्वेषी वृत्ती आवडली. कारण तीमुळे माझे अवगुण माझ्या लक्षात आले."

जर शत्रूने म्हटल्याप्रमाणे तुझ्यापाशी दुर्गुण असतील तर तू चिडू नकोस. जर त्याचे म्हणणे खोटे असेल तर त्याला 'वटवट न करता चालता हो', असे सांगा. जर कोणी बेवकूब 'कस्तुरीला घाण वास येतो' असे म्हणेल तर तो वेडा आहे याची तुला खात्री वाटली पाहिजे.[८१] जर कोणी कांद्याला दुर्गंधी येते असे म्हणाला तर त्याचे म्हणणे खोटे आहे असे भासविण्यासाठी तू अक्कल लढवू नकोस. जादुगारांच्या हिकमतीने भारावून जाणे हे काही बुद्धिमत्तेचे किंवा विचारवंताचे लक्षण नव्हे. आपल्याला देवाने जेवढी बुद्धी दिली असेल तिच्या आधारे आपले कर्तव्य करत राहाणाऱ्याला हितशत्रूंच्या निंदेचा उपसर्ग होणार नाही, तुझे वर्तन चांगले असू दे, म्हणजे तुला नावे ठेवण्याची हिंमत तुझ्या दुष्मनाला होणार नाही. तुझ्या शत्रूंच्या दुर्व्यसनांनी त्रासून जाऊन लोकांवर त्याचा वचपा काढू नकोस!

माझ्याबद्दल विचारशील तर माझे दोष दाखविणाऱ्याशिवाय मी कोणालाच माझा हितचिंतक समजत नाही.

## खलीफा हजरत अली यांचे सौजन्य

श्रद्धाळू लोकांचे सरदार हजरत अली–देव त्यांच्यावर कृपा करो–आपली विवंचना दूर करतील असे वाटून एक मनुष्य त्यांच्यापाशी आला. शत्रूंचा नाश करणारे, देश जिंकणारे अली यांनी त्याच्या प्रश्नाचा पूर्ण विचार करून उत्तर दिले. त्या बैठकीतील एकाने त्यांचे मत बरोबर नसल्याचे सांगितले, तेव्हा बुद्धिमान म्हणून नावाजलेले हैदर (अली) रागावले नाहीत. उलट तेच त्याला म्हणाले, "तुला जर या बाबतीत अधिक ज्ञान असेल तर तूच त्याचे उत्तर दे." त्या मनुष्याने आपल्या बुद्धीप्रमाणे योग्य उत्तर दिले, "सूर्याचे तेज मातीने झाकता येणार नाही."

मोठ्या मनाच्या अलीने म्हटले, "ह्याचे बरोबर आहे. माझीच चुकीची कल्पना झाली होती. त्याने माझ्यापेक्षा अधिक समंजस उत्तर दिले, पण खरी हकीकत

जाणणारा फक्त एक (देव)च. त्याच्यापेक्षा अधिक ज्ञान कोणालाच नाही." सध्याच्या दिवसांत कोणा बादशहास असा प्रश्न विचारला असता तर तो आपल्या घमेंडीत राहिला असता आणि त्याने लक्षच दिले नसते. उलट विचारणाऱ्याला दरवानाने दरबारातून हाकलून लावले असते. मरेपर्यंत त्याला चोपले असते आणि "पुन्हा कधी कोडगेपणा करू नकोस! थोरामोठ्यांसमोर अशी मुक्ताफळे उधळणे गैरवर्तन आहे," असे बजावले असते.

ज्याच्या मनात अहंकार भरला आहे त्याला सत्यवचनाची कदर असते असे समजू नकोस. त्याला अक्कल शिकविल्याने राग येतो आणि उपदेश केला तर त्याचे डोके दुखते. कोरड्या पाषाणावर पावसाची खैरात झाली तर त्यातून फुलझाडे उगवणार नाहीत. तीच माती पाहा! अदबीने पडून असते. तिच्यातून फुलझाडे उगवतात आणि वसंताचा बहरही येतो.

जो अहंकाराने आणि घमेंडीने बावचळला आहे त्याला उपदेश करण्याचा अट्टाहास करू नकोस. जो आत्मप्रौढीत गुंग झाला असेल त्याच्याकडे लोक लक्ष देत नाहीत. लोकांनी वाहवा म्हणावे या उद्देशाने तू कसलाही उपदेश करू नकोस.कारण तू वाटेल तितक्या युक्तीच्या गोष्टी सांगितल्यास तरी ते तुझा उदो उदो करतील अशी आशा बाळगू नकोस.

## निष्ठावंताचे सरदार खलीफा उमर बिन अल खताब[१०]

खलिफा उमर एकदा असेच जात असताना त्यांचा पाय एका भिक्षेकऱ्याच्या पायावर पडला. त्या बिचाऱ्याला ते कोण आहेत हे माहीत नव्हते. कारण ज्याला ठेच लागते त्याला चोर कोण आणि साव कोण याचा विवेक राहात नाही. तो चवताळून त्यांना " काय आंधळा आहेस काय ? " असे बोलला. हजरत उमर फारुक म्हणाले, "मी आंधळा नाही, पण माझ्या हातून चूक झाली खरी. मला दिसले नाही, पण मला माफ करा."

ते महान धर्मात्मे होते. पण प्रजेशी अशाच सौजन्याने वागत असत. बुद्धिमान मनुष्य फळाने भरलेल्या डहाळीप्रमाणे अधोवदन होऊन जमिनीकडे झुकलेले असतात. उद्या जेव्हा कयामत–अंतिम न्यायदान—होईल तेव्हा नम्र लोक आनंदात असतील आणि घमेंडखोर लज्जेने खाली माना घातलेले दिसतील. तुला जर कयामतीची भीती वाटत असेल तर ज्याला तुझा दरारा वाटतो त्याच्या चुका पोटात घाल आपल्याहून जे हीनदीन असतील त्यांच्यापुढे दर्पोक्ती करू नकोस. 'कारण तुझ्यापेक्षा अधिक शक्तिशाली असेलच की नाही ?

## सुटका

एक होता सच्छील माणूस. तो दुष्टांना देखील चांगलेच म्हणायचा. तो मेल्यावर एकाने त्याला आपल्या स्वप्नात पाहिले आणि त्याचे कसे काय चालले आहे,

अशी चौकशी केली. त्याने कळीप्रमाणे आपला चेहरा खुलवून बुलबुलाच्या कंठ-रवाने सांगितले, " मी येथे मजेत आहे. मी कोणावरही दबाव दाखविला नव्हता, म्हणून सर्वच माझ्याबरोबर सौजन्याने वागतात. "

## जुन्नून मिसरीचे हाल

मला आठवते की, एकदा वरुण राजाने अवकृपा केली आणि इजिप्त देशाची नील नदी पावसावाचून कोरडी पडली. काही लोक डोंगरी भागाकडे वळले आणि काही पर्जन्याची प्रार्थना करू लागले. त्यांना इतके दु:ख झाले की त्यांच्या आसवांतूनच एखादी नदी वाहिली असती. ते पाहूनसुद्धा आकाशाचे अश्रू जमिनीवर टपकले असते. जुन्नून मिसरीला एकाने बातमी दिली, " लोक फार चिंतातूर आणि कष्टी झाले आहेत. आम्हा दीनांसाठी प्रार्थना कर. आपल्या प्रिय भक्ताच्या प्रार्थनेचा देव अव्हेर करत नाही. "

हे ऐकताच मिसरी मक्कामदीना यांच्या दिशेने पळत सुटले आणि थोड्याच वेळात पाऊस पडू लागला. जुन्नून यांना नंतर कळले की काळ्या काळजाच्या मेघांनी रडून आसवे गाळली. हे कळताच त्यांनी मक्कामदीना येथून परतण्याचा निश्चय केला. कारण सर्वत्र पाणीच पाणी झाले होते. आणि नदी-नाले तुडूंब भरले होते. एका समंजस माणसाने, 'तुम्ही निघून का गेला होतात' असे विचारताच त्यांनी सांगितले, " दुष्ट लोकांच्या कर्मामुळे पशु, पक्षी, कृमी, कीटक हे सारेच अन्नास मोताद होतात. मी विचार केला की, या देशात असा दुरात्मा कोण असेल बरे ! विचारांती मला वाटू लागले की माझ्याशिवाय अन्य कोणीही इतका अपराधी असू शकणार नाही. मी येथून पळ काढला तो एवढ्यासाठीच, की माझ्यामुळे जनतेसाठी देवाच्या दयेचे महाद्वार बंद केले जाऊ नये. "

तुला जर लोकात प्रतिष्ठा मिळवावयाची असेल तर स्वत:ला मोठा समजू नकोस. जो श्रेष्ठ पुरुष स्वत:ला सामान्य समजतो, त्याला ऐहिक आणि पारमार्थिक वरदान लाभते. ह्या कुळातील जो दास सामान्य माणसाची सेवा करील, तो पवित्र झाला असे समजा. या भूमीवर चालणाऱ्यांनो, आपले मित्र दीन मातीचेच बनले आहेत, हे तुम्हास माहीत असले पाहिजे.

'सादी' मेल्यावर मातीचे ढेकूळ बनला तर त्यात काय बिघडले ? त्याने आपल्या हयातीत मातीचाच मवाळपणा अंगीकारला होता. त्याने अत्यंत दैन्याने आपल्याला मातीच्या स्वाधीन केले आणि वाऱ्यासंगे त्याची धूळ जगात सर्वत्र पसरली. माती त्याला थोड्याच दिवसांत गिळून टाकील. पण तरीही हवेच्या योगाने जगात तो सर्वत्र पसरेल. सत्यज्ञानाची बाग फुलल्यानंतर बुलबुलाने यापेक्षा अधिक सुंदर गाणे म्हटले नाही — " बुलबुल मेल्यावर त्याच्या मृत्तिकेतून फूल न उगवले तरच नवल ! "

□ □ □

अध्याय ५

# परमेश्वराचा अनुग्रह

एका रात्री मी विचारमग्न झालो होतो. मी प्रतिभेची ज्योत पेटविली. एक प्रासपरायण कवीही माझी कविता ऐकत होता. फक्त माझी तारीफ करण्यापलीकडे त्यास दुसरे काही सुचले नाही. त्याच्या पोटात मत्सराचा गोळा उठला होता. म्हणून तो टोमणे मारून बोलू लागला. मनात मळमळ असली म्हणजे साहजिकच कोणीही कुरकूर करतोच. तो म्हणाला, "सादीचे विचार चांगले आहेत. आणि त्याची झेप दांडगी आहे. पण त्याचे विषय मात्र संयम, साधुत्व, उपदेश असे असतात. त्याचे काव्य वीररसविरहित आहे. भाले, तलवारी, मर्दुमकी असले विषय दुसऱ्यांनीच हाताळावे." सादी म्हणाला, "या बिचाऱ्याला ठाऊक नाही की मला लढाई रुचत नाही. वीर-रसाबद्दल म्हणाल तर मी तसा काही कोणाला हार जाणार नाही. मी माझी तलवारी-सारखी तीक्ष्ण वाणी म्यानातून बाहेर काढल्याबरोबर साहित्याच्या जगातील कोळिष्टकांचा पार धुव्वा उडेल."

या! माझ्याशी सहकार्य करा. म्हणजे आमच्या शत्रूला टेकायला दगडा-शिवाय दुसरा कसलाच आधार राहाणार नाही.

## सहनशीलता, तृप्ती आणि देवाज्ञा मानणे

सद्भाग्य हे परमेश्वराने दिल्यासच लाभते. ते रणांगणात किंवा मनगटातील बळाने मिळत नसते. भाग्य निर्माण करणारे फिरते अस्मान जर तुला संपत्तिविणे कोरडे ठेवील, तर त्याला आपल्या दंडाच्या जोरावर वठणीवर आणणे तुला जमणार नाही.

मुंगी क्षुल्लक कीटक म्हणून तिच्यावर अत्याचारच होतील असे नाही. त्याच-प्रमाणे दंडात बळ असल्याने आपला चरितार्थ निर्विघ्न चालेल असेही म्हणता येणार नाही. नशिबावर आपली हुकूमत नसल्यामुळे त्याच्याच कलाने आपण वागावे हेच योग्य होय. दीर्घायुष्य तुझ्या कपाळी लिहिले असेल तर साप, शेर आणि समशेर यांची तुझ्यावर मात्रा चालणार नाही. उलटपक्षी तुमच्या आयुष्याची दोरी तोकडी असेल तर तुम्ही विषहारी 'तिरयाक' औषध घेतल्यामुळेसुद्धा मराल ![९२] रुस्तुमाचे[९३] आयुष्य संपले होते म्हणून त्याच्याच भावाने — शगाद याने त्याला विहिरीत लोटून ठार मारले हे तुला माहीत असेलच.

## इस्पहान शहरातील योद्धा

इराणमधील इस्पहान या शहरात माझा एक मित्र होता. तो मोठा भांडकुदळ, चाणाक्ष आणि अर्क होता. पाहावे तेव्हा त्याचा हात आणि कटचार रक्ताने माखलेली

दिसे. त्याच्याकडे पाहिल्यावर त्याच्या शत्रूचे मन कबाबासारखे भाजून निघे. धनुष्य आणि बाणाशिवाय स्वारी कधी चुकूनही दृष्टीस पडायची नाही. त्याच्या भाल्याचे टोक तर जणू ठिणग्याच ओकत असे. तो इतका पराक्रमी होता की त्याच्या भीतीमुळे मोठमोठ्या लढवय्यांनादेखील कापरे भरत असे. तो पैज लावून हुकमी नेमबाजीने मिथुन राशीतील दोन ताऱ्यांपैकी एकेकाला बाण मारीत असे. काटा-देखील फुलाला छेदू शकणार नाही अशा सहज रीतीने त्याचा बाण ढाल-आरपार चिरून निघून जाई. त्याने भाला फेकल्यावर कपाळ आणि तो भाला या दोहोंचाही मोक्ष होईल. त्याच्यासमोर माणूस आला काय आणि चिमणी आली काय सारखेच ! चिमणी जशी टोळांना टिपते तसा तो सर्वांना लोळवत असे. बलाढ्य राजा फरीदून[९४] जरी त्याच्यासमोर आला असता तरी त्याने म्यानातून तलवार काढण्याएवढी देखील फुरसत त्याला दिली नसती. चित्त्याला देखील त्याच्याएवढी झेप साधत नसे. तो वाघाच्या डोक्यावर देखील सहज मुष्टिप्रहार करीत असे. नाणावलेल्या मल्लांना तो हुडकून काढून चीत करीत असे. पर्वतप्राय योद्ध्यांना सहज उचलून फेकत असे. त्याचा परशू शत्रूचे चिलखत फोडून छातीत घुसत असे. पौरुष आणि मर्दुमकीमध्ये साऱ्या जगात त्याचा हात धरणारा कोणी नव्हता. माझ्यापासून तो थोडावेळसुद्धा दूर राहात नसे. कारण हार्दिक स्नेह असलेल्यांशी तो निष्ठेने वागायचा. असे असतानाच मला तेथून निघावे लागले; कारण तेथे फार दिवस वास्तव्य करणे माझ्या नशिबी नव्हते.

दैवगतीने मला इराकमधून सीरिया देशात नेले. मला तो पवित्र देश फार आवडला. सीरियामध्ये माझे मन रमले होते तरीसुद्धा मला मायदेशाची ओढ लागली होती.

परमेश्वराच्या इच्छेने मी इराकमार्गे परत चाललो होतो. सारी रात्र मी विचारमग्न स्थितीत घालविली. तेव्हा मला त्या हरहुन्नरी मित्राची आठवण झाली. त्या आठवणीने जुन्या मैत्रीच्या व्रणावर मीठ चोळले गेले. कारण त्या बहाद्दराचे मी मीठ खाल्ले होते. त्याला भेटायला म्हणून मी इस्पहानला गेलो. त्याच्यावरील प्रेमामुळे त्याच्या भेटीची मला फारच तळमळ लागली होती. मी त्याच्या घरी जाऊन त्या वीराला पाहिले. कालगतीने त्यास वृद्ध बनविले होते. त्याच्या देहयष्टीचे धनुष्य झाले होते आणि त्याचा लालबुंद चेहरा पिवळा पडला होता. त्याचे मस्तक आणि केस हिमाच्छादित शिखराप्रमाणे दिसत होते. वार्धक्याचा हिम विरघळून त्याच्या डोळ्यांवाटे वाहात होता. कालचक्राने त्याचे दांडगे दंड लुळे पाडले होते, आणि मजबूत मनगटे पिरगळून टाकली होती. त्याच्या मेंदूतील मस्ती पार नाहीशी झाली होती. त्याचे ताठ मस्तक वाकून गुडघ्याला आदळत होते. मी त्याला विचारले, "दोस्त ! अशी तुझी दशा कशामुळे झाली ?" त्याने किंचित् हसून म्हटले, "तार्तारांच्या[९५] स्वाऱ्या सुरू झाल्यावर मी शिपाईगिरी आणि मर्दुमकीला रामराम

ठोकला. त्यांच्या सैन्याचे काय वर्णन करावे ! त्यांच्या भाल्यांमुळे रणांगण वेतांच्या जंगलासारखे दिसत होते. त्यांचे झेंडे त्या जंगलात लागलेल्या आगीप्रमाणे वाटत होते. धुळीने आगीच्या धुराप्रमाणे आकाश व्यापले होते. दैवाचा हात नसेल तर नुसत्या मर्दुमकीला कोण विचारतो ? मी एकेकाळी लढवय्या होतो, तेव्हा भाल्याच्या टोकाने बोटातील आंगठी काढून घेत असे. पण दैवाचे छत्र गेल्यावर मला शत्रूंनी आंगठीप्रमाणे घेरले. मी पळ काढणेच श्रेयस्कर समजलो. कारण ईश्वरेच्छेला मूर्खाशिवाय कोणीही टक्कर देत नसतात. आपले भाग्य मावळल्यावर शिरस्त्राण आणि कवच आपले रक्षण थोडेच करू शकतात ? सुदैवाची किल्ली जवळ असल्या-शिवाय दंडाच्या जोरावर विजयदुर्गाचे कुलूप तोडता येत नसते. आपादमस्तक पोलादी चिलखताने मढलेले शूर शिपाई माझ्याशी सामना करण्याकरिता आले. रणधुळीचे दर्शन घडताच आम्ही अंगात चिलखत आणि डोक्यावर शिरस्त्राण चढविले. सौदामिनीसदृश अरबी अश्वावर मी आरूढ झालो. पावसाच्या पाण्याप्रमाणे माझी समशेर तळपू लागली. दोन्ही फौजा भिडल्या तेव्हा आकाशच गळून खाली पडल्या-सारखे भासले. बाण तर गारांप्रमाणे उसळत होते, आणि सर्वत्र मृत्यूचे तांडवनृत्य चालले होते. आसूड तर शूर वीरांना गिळण्यासाठी आलेल्या अजगराच्या आ वासलेल्या तोंडाप्रमाणे भासत होते. निळ्या धुळीमुळे जमिनीचे आकाश बनले होते. आणि चमकणारे भाले व तलवारी ताऱ्यांप्रमाणे लुकलुकत होत्या. शत्रुसैन्यातील स्वार धावून आल्यावर आम्ही घोड्यावरून उतरून ढालीने मुकाबला केला. ईश्वरी अनुग्रहाच्या दंडाचा आधार नाहीसा झाल्यावर माणसाच्या प्रयत्नाच्या पंजाचे काय चालणार ! दुष्मनाच्या सूडबुद्धीचे शस्त्र त्यांच्या तरवारींपेक्षा अधिक तीक्ष्ण होते. आमच्यापैकी कोणीही वीर रक्ताने माखलेल्या चिलखतीशिवाय रणांगणातून परतला नाही. त्यांचे बाण रेशमाच्या लडीसारख्या शत्रूला लागत नव्हते. उलटपक्षी ते ऐरणीसारख्या कठीण शत्रूवर धार लावण्यासाठी पडत. आमचे सैन्य पूर्वी एकाद्या कणसासारखे सुसंघटित आणि एकसंध होते. पण थोड्याच वेळात दाणे विखुरल्या-प्रमाणे सैनिक जिकडे तिकडे पडले. भ्याडपणामुळे आमचे धैर्य गळाले. आणि मासे जसे जाडजूड कवचासकट जाळ्यात सापडतात तशी आमची गत झाली. भाग्याने आमचा हात सोडल्यावर देवेच्छेच्या शरांचा ढालीने प्रतिकार करणे निष्फळ होते."

## शूर शिपायाची गोष्ट

अर्देबील शहरी एक शूर शिपाई राहात होता. त्याने मारलेला बाण फावड्या-तूनदेखील आरपार जात असे. एक पासोडीपंत त्याच्याशी दोन हात करण्यासाठी पुढे आला. तो तरुण भानगड्या आणि भांडखोर होता. तो बहराम गोर[९६] या वीर चक्रवर्तीसारखा खुनशी होता. त्याच्या खांद्यावर कच्च्या चामड्याचे आसूड असे अर्देबिलीने धनुष्यातून पन्नास बाण सोडले. पण त्यांपैकी एकही त्याच्या पासोडीच्या आत गेला नाही. रुस्तुमसारखा मल्ल असलेला तो पासोडीपंत अर्देबीलच्या त्या

शूर शिपायाला पकडून छावणीत घेऊन गेला आणि त्याने चोरासारखे त्याचे हात गळ्याशी बांधून ठेवले. त्या स्वाभिमानी शूराला आपल्या अपमानामुळे रात्री झोप आली नाही. सकाळी छावणीतील एका नोकराने त्यास विचारले, " तू बाणाने लोखंड फोडणारा गडी, पण त्या पासोडीपंताचा कैदी कसा बनलास ? " त्याने शोक करत उत्तर दिले. " मृत्यू कोणासही टाळता येत नाही. भाले, तलवारी चालविण्यात माझे नैपुण्य असे होते की, रुस्तुमलासुद्धा मी काही हात शिकवू शकलो असतो. माझे तकदीर शिकंदर होते तोपर्यंत मला फावड्याचे वजन पासोडीपेक्षा अधिक वाटत नव्हते. आता माझे दैव उलटले आहे, म्हणून मला पासोडीदेखील फावड्यासारखी होऊन बसली आहे. मरण उभे ठाकले तर बाण चिलखत भेदून छातीत शिरतो. पण ज्याच्या आयुष्याची दोरी बळकट आहे त्याचा तो सदरादेखील फाडू शकत नाही. दैवाने कहर केला आणि मरण आवासून आले तर मात्र तुझ्या अंगात चिलखत आणि डोक्यावर शिरस्त्राण असले तरी तू नागडा बोडका असल्यासारखाच. भाग्य अनुकूल असेल तर मात्र तुझ्या अंगावर वीतभर वस्त्र नसले तरी सुरीदेखील तुला कापणार नाही. "

शहाणीसुरती माणसे आपली शक्कल लढवून मरण टाळू शकणार नाहीत· तसेच मूर्ख अपथ्य केल्याने देखील मरणार नाहीत.

## हकीम आणि कुर्द

एका कुर्द[१७] इसमाच्या छातीत दुखत होते. त्यामुळे त्याला रात्री झोप लागली नाही. त्याच्या शेजारी एक हकीम होता. तो स्वतःशी म्हणाला, " हा इसम द्राक्षाची पाने खातो, त्यामुळे पहाटेपर्यंत जगला तरी नवलच! पचावयास जड असलेल्या पंचपक्वान्नांचा ताव मारण्याने होणारे नुकसान हे आडमुठ्या तातराच्या भाल्याचे टोक पोटात शिरण्यापेक्षा जबर असते. एखादा घास जरी पोटात शिरून आंतड्यांत अडकला तरी अडाणी माणूस उभे आयुष्य लाचारीमध्ये कंठतो. "

पण झाले भलतेच ! तो शहाणा हकीम त्या रात्रीच दगावला आणि तो पैलवान ? चाळीस वर्षे झाली त्या गोष्टीला, पण अजून गुटगुटीत आहे.

एका शेतकऱ्याचे गाढव मेले होते. त्याने त्याचे मुंडके कापून द्राक्षाच्या मळ्यात टांगले.

एक अनुभवी बुड्ढा तेथून जात होता. त्याने हसून बागाइतदाराला विचारले, " तुझ्या बापाचा तू लाडका मुलगा आहेस हे कबूल ! तू काठीने मार मार मारलेस म्हणून ते गाढव प्राणास मुकले. ते तुझे मेलेले गाढव तुझ्या मळ्याचे रक्षण कसे करील ? "

मृत्यूपुढे वैद्याचेही काही चालत नाही.

एकदा एका गरिबाचा एक रुपया हरवला. त्याने तो शोध शोध शोधला.

शेवटी तो कंटाळला आणि खिन्न झाला. पण तो रुपया दुसऱ्या एका मनुष्याला शोधल्याशिवायच मिळाला.

आम्ही मातेच्या पोटात असतो तेव्हाच दैवाची लेखणी आमच्या सद्भाग्याची किंवा दुर्भाग्याची नोंद करते.

मेहनत करण्याने चंगळ होईल असे समजू नकोस. कारण कष्टाळू वीरच अन्नाला मोताद झालेले दिसतात.

एका वयस्कर माणसाने आपल्या मुलाला छडीने मारले. मुलगा ओरडला, "बाबा ! उगाच का मला मारता ? लोकांचा छळ मी तुम्हास तरी निदान सांग शकतो, पण तुमचा छळ मी कुणाला सांगू ? "

बुद्धिमान मनुष्य सर्वसाक्षी ईश्वराला आपले गाऱ्हाणं सांगू शकतो. पण त्यानेच आपल्यासाठी ठरवून दिलेल्या कष्टाबद्दल तो कुरकुर करत नाही.

एक भाग्यवान मनुष्य होता. त्याचे नाव होते बख्तयार. म्हणजे दैवाचा मित्र. नावाला शोभेल असाच तो मोठा बलिष्ठ आणि श्रीमंत होता. फक्त त्याच्याचजवळ जमीनजुमला आणि संपत्ती होती, आणि इतर लोक दरिद्री आणि रंजलेगांजलेले होते एक मनुष्य एक पैसाही न कमावता घरी गेला. तेव्हा त्याची बायको त्याच्याशी भांडली, "तुझ्याइतका कंगाल दुसरा कोणी नसेल. गांधीलमाशीप्रमाणे डंख मारण्यापलीकडे तुला काही येत नाही. जा ! शेजारच्या लोकांकडून इमानेइतबारे काम करण्यास शीक. मी लग्नाची बायको आहे म्हटलं. तू हात हालवीत आलास तर मी काही तुझी बटीक नाही. सगळयांकडे सोन्याचांदीचे सामान आहे मग तुला काय धाड झाली आहे ? " ते ऐकून त्या पासोडी पांघरणाऱ्या दरवेशाने सुस्कारा टाकला. ढोलक्याच्या पोटात काही नसते म्हणून त्याचा आवाज मोठा होतो. तो म्हणाला, "मी काही कमावत नाही म्हणून मला टाकून बोलू नकोस. तू असशील मोठी जहांबाज, पण दैवापुढे काय चालते ! दैवाने मी स्वतःच मोठा होण्याइतके बळ दिलेले नाही."

इराणच्या आखातात कैश या नावाचे गाव आहे. तेथे एक दरवेश राहात होता. त्याची बायको कुरूप होती. तिला तो म्हणाला, "तुला देवानेच कुरूप बनविले आहे. तू उगाच तोंडाला उटणे लावू नकोस. आपल्या हिकमतीने भाग्यवान कोण होतो ? सुरमा लावल्याने आंधळयाला दृष्टी प्राप्त होते काय ? चुकीच्या पद्धतीने कोणतेही चांगले काम करता येत नाही. कुत्रा चावला तर ते इतर जखमांसारखे बरे करता येत नाही. ग्रीकरोमन तत्त्वज्ञांनादेखील कडू औषध गोड करता आले नाही. कोणताही नरपशू कधी साधा माणूस होऊ शकत नाही. त्याचा उद्धार करण्याचा प्रयत्न निष्फळ होतो. आरशावरून मळ नाहीसा करता येईल, पण दगडापासून आरसा बनविता येणार नाही."

जीवाचा आटापिटा केला तरी वेतातून गुलाब उगवणार नाही.

अभ्यंगस्नान घातल्याने हबशी कधी गोरा होणार नाही.

भाग्याने मारलेला बाण परत कधी येत नाही. दैवाने ठेवलेल्या स्थितीत आनंदाने राहाणे सोडून देऊन भाग्याने धाडलेल्या आपत्तींचा प्रतिकार करणे मानवाला शक्य नाही.

## घार आणि गिधाड

एका गिधाडाने घारीस म्हटले, " माझ्यापेक्षा दूरदृष्टीचा दुसरा कोणताही प्राणी नाही. " घार म्हणाली, " उगाच काय बाता मारतोस. चल आपण रानात धुंडाळून पाहू ! " त्या दोघांनी दिवसभर एकत्र उड्डाण केले. अगदी उंचावरून खाली डोकावून पाहिले. गिधाडाने म्हटले, " मला त्या दाट जंगलातूनदेखील एक गव्हाचा दाणा दिसतो आहे. तुला खरे वाटत नसेल तर तू देखील बघ. "

बिचाऱ्या घारीला आश्चर्य वाटण्यापलीकडे काही करता येत नव्हते. दोघांनी खाली उतरण्याची तयारी केली. गिधाड जाऊन गव्हाच्या दाण्याजवळ उतरले आणि जाळ्यात अडकून पडले. त्याला हे कळले नाही की एका दाण्याच्या लोभामुळे त्यास नशिबाच्या जाळ्यात अडकून पडावे लागेल.

प्रत्येक शिंपल्यात मोती असेलच असे म्हणता येत नाही.

प्रत्येक बाण लक्ष्यावर लागेलच असे नाही.

घार म्हणाली, " तुला शत्रूचे जाळे दिसले नाही, आणि दुरून दाणा दिसल्याची घमेंड मात्र करत होतास ! "

मान खाली घालून गिधाड म्हणाले, " नशिबात लिहिलेले चुकविण्याचा प्रयत्न करणे निष्फळ होय. " मृत्यूने गिधाडाला मारण्याचा बेत रचला होता, म्हणून त्याची तीक्ष्ण नजर मंद झाली.

ज्या नदीचे पैलतीर दिसत नसते ती पोहून पार जाण्याची घमेंड महागात पडते.

एका विणकऱ्याच्या मदतनिसाने कपड्यांसाठी हत्ती, शहामृग आणि जिराफाची चित्रे काढली होती. तो नम्र होता. तो म्हणे, " माझ्या गुरूने चित्रे आखून दिली नसती तर मी एकही चित्र काढू शकलो नसतो. "

जे चित्र सुंदर किंवा सुमार निघते ते म्हणजे ईश्वराचा प्रभाव दाखविणारे, लिखाण होय.

जर कोणी म्हणाला की अमक्याने मला मारले, तमक्याने छळले तर असे म्हणण्यात एका प्रकारची नास्तिकता व्यक्त होते. कारण कर्ता करविता ईश्वरच असतो. देवाने तुला जे डोळे दिले आहेत त्याचा खरा उपयोग म्हणजे सर्वात ईश्वरच दिसावा, दुसरा कोणी दृष्टीस पडू नये हा होय.

*                *                *

एका सांडणीला पिलाने उपदेश केला, "आई तू फार चालतेस ! तू पुन्हा चालण्यापूर्वी चांगली विश्रांती घे."

ती म्हणाली, "बाळा ! माझे जर काही चालले असते तर पाठीवर ओझे घेऊन उंटांच्या रांगेत मी तुला दृष्टीस पडले नसते. भाग्य स्वत:ला वाटेल त्या दिशेने तारू वळवून नेते ! मग नावाडी रडला तरी ते ऐकत नाही."

'सादी' तू कोणासमोर हात पसरू नकोस. कारण ईश्वराशिवाय दाता कोणीच नसतो. तू ईश्वरनिष्ठ असलास तर तुला त्याचे द्वार पुरे आहे. तोच जर तुला बाहेर घालवील तर तुला दुसरा कोण बोलावील ? दिले देवाने काही तर चैन कर, नाही तर दैन्य पत्करून आयुष्य घालव.

## बोधवचन

शुद्ध मनाने प्रार्थना करावी. गर नसलेल्या फोलपटाचा काय उपयोग ? लोकांना फसविण्यासाठीच जर ढोंग करणार असशील तर काफिराप्रमाणे जानवे घातलेस काय, किंवा सूफीप्रमाणे पासोडी पांघरलीस काय, दोन्ही सारखेच. मी तुला सांगतो की आपल्या ताकदीच्या बाता मारू नकोस ! एकदा तू बहादुरी दाखवलीस तर मात्र नंतर कधीही भेकडपणाचे प्रदर्शन करू नकोस ! आपली शक्ती जेवढी असेल तेवढीच वाच्यता करावी. "बोले तैसा चाले" असे ज्याचे ब्रीद असते, त्याला कधी नाचक्की होऊन मान खाली घालावी लागत नाही.

ढोंगी माणसाचा दिखाऊ पेहराव फाडला तर त्याचे खरे पितळ बाहेर पडते. तू जर ठेंगणा असशील तर त्यात काही दोष नाही. पण तो सावरण्यासाठी लाकडी पाय लावून चालू नकोस. कारण त्यामुळे केवळ गावढळ लोकांची करमणूक होईल. सूज्ञ लोक समजावयाचे तेच समजतील. तांब्यावर चांदीचा मुलामा केला तर ती सगळीच चांदी आहे, असा समज करून घेऊन केवळ मूर्खच फसतात. माझ्या राजा ! पैशाच्या नाण्याला सोन्याचा मुलामा चढवू नकोस ! कारण हुषार सराफ ते सोने आहे असे कधीच समजणार नाही. जे लांडीलबाडी करत असतात त्यांची अग्निदिव्यानेच परीक्षा केली जाते आणि चोर कोण आणि साव कोण हे कळून येते.

रात्रभर जागून ईश्वर-भक्तीची ऐट करणाऱ्या एका दरवेशाला बाबा कोही[१८] ने काय म्हटले ते आठवते का ?

"जा बाळा ! मनोभावे ईश्वराची प्रार्थना कर ! लटक्या प्रार्थनेने आणि भक्तीच्या सोंगाने तुझ्या पदरात काही पडणार नाही. जे लोक तुझी वाहवा करत आहेत, त्यांनी तुझा बाह्य झोक तेवढाच पाहिला आहे. चेहरा तरतरीत असला आणि कपडे काढताच कोड दृष्टीस पडले तर अशा माणसाचे कोण कौतुक करील ? छलकपट करून स्वर्ग प्राप्त करण्याची हाव धरू नकोस, कारण तुझ्या तोंडावरील खोटा मुखवटा काढून टाकल्यावर तुझे सगळे दुर्गुण उघडकीस येतील."

## बालक आणि रमजानचे उपोषण

एका लहान मुलाने रमजानचा रोजा पाळला होता. अत्यंत कष्ट सहन करून तो कसाबसा दुपारच्या प्रार्थनेच्या वेळेपर्यंत उपाशी राहिला. शाळेतून मास्तरांनी त्यास घरी नेले. कारण लहान मुलाचे धर्माचरण त्याला कौतुकास्पद वाटले. त्या मुलाच्या आईबापांनी त्या लेकराला गोंजारले. त्याच्यावर बदाम आणि रुपये ओवाळून टाकले. दुपारनंतर मात्र त्याच्या पोटात कावळे कोकलू लागले. त्याने मनात म्हटले, "मी थोडेसे खाल्ले तर आईवडिलांना काय कळणार आहे ?" त्या पोराला फक्त आपला बाप आणि इतर मोठी माणसेच दिसत होती. त्यामुळे त्याने गुपचुप खाऊन घेतले, आणि वर उपास केल्याचीही ऐट दाखविली.

जर तुझ्या मनात ईश्वराचा विचार नसेल तर तू नमाझ पढण्यासाठी वजू (प्रक्षालन) केले आहेस की नाही हे लोकांना कसे कळणार ?

पण जो वयस्कर माणूस दुसऱ्यांना दाखविण्यासाठी म्हणून प्रार्थना करतो तो या मुलापेक्षाही अज्ञानी होय. या प्रकारची लोकांवर छाप पाडण्यासाठी केलेली प्रार्थना म्हणजे नरकाच्या दरवाजाची किल्लीच होय. तुझी वाट जर देवाच्या विरुद्ध दिशेने असेल तर जळो तुझे प्रार्थनेचे आसन !

* * *

एक पापी माणूस एकदा शिडीवरून खाली पडला, आणि लगेच मेला. त्याचा मुलगा काही दिवस बाप मेल्याबद्दल कष्टी झाला होता. पण थोड्याच वेळात तो सारे विसरून मुलांमध्ये नाचू बागडू लागला. मुलाला एकदा स्वप्नात बाप दिसला. तेव्हा त्याने त्याच्या खुशालीची चौकशी केली आणि विचारले, "बाबा, कबरीत किती कष्ट सोसलेत आणि अधर्मापासून तुम्ही कसे बचावलात ?"

बापाने उत्तर दिले," बेटा, जुन्या गोष्टींचा उल्लेख करू नकोस. मी जो शिडीवरून पडलो तो सरळ नरकात येऊन पोहोचलो आहे. अंतर्यामी चांगला असून वरवर दळभद्री दिसतो तो मनुष्य मनात पाप असलेल्या साधूपेक्षा बरा. मला विचारशील तर मी असे म्हणेन की, अट्टल चोर, दरवडेखोर हा पासोडी पांघरून साधू म्हणवून घेणाऱ्या चोरापेक्षा कितीतरी चांगला. जो मनुष्य लोकांच्या दारोदार हिंडून प्रार्थना करत असतो, त्याला ईश्वर कयामतीच्या न्यायदानात कामाची मजूरी काय म्हणून देईल ! तू 'सोम्या'[९९]च्या घरी कामावर असलास तर तुला 'गोम्या' का पगार देईल ? जो देवाचा खरा भक्त आहे त्याच्याशिवाय खडतर मार्गाने दुसरा कोणी देवापर्यंत पोहोचू शकेल, असे मला वाटत नाही. तुम्हास आपले ठिकाण गाठावयाचे असल्यास तुम्ही सरळ मार्गाने जावे. जर तुमची वाटच चुकली असेल तर अर्थातच तुम्ही परत आपल्या जागेवर याल ! तेल्याने बैलाला डोळे बांधून घाण्याला जुंपलेले असते. तो दिवसभर चालूनदेखील आहे त्याच जागेत दिसतो. जर कोणी मशिदीत नमाज पढताना किब्ल्याकडे[१००] (पश्चिमेकडे) तोंड करणार नसेल तर त्याला सारेजण

काफर म्हणतील. त्याचप्रमाणे जर तुला ईश्वराबद्दल खरेखुरे प्रेम नसेल तर तू देखील किब्ल्याकडे पाठ करून नमाज पढतोस असे मी म्हणेन. मूळ मजबूत असलेले झाड पोसल्यास तुला कधीतरी फळे मिळतील. जर तुझ्या निष्ठेचे मूळ जमिनीत रुजलेले नसेल तर फळांना पारखा होणारा तुझ्याशिवाय अन्य कोणी असणार नाही. जो शहाणा खडकावर बी पेरेल त्याला कापणीच्या वेळी एक जवाचा दाणा तरी हाती लागेल काय ? कपट-कारस्थान करून मिळवलेली ख्याती ही खरी कीर्ती नव्हे. कारण चिखलावर साठलेल्या पाण्याचा पाणी म्हणून काही उपयोग होत नाही. अंतर्यामी दीन दरिद्री असलेल्या मनुष्याचा बाहेरून जरी सत्कार होत असला तरी त्याला त्यापासून फारसा उपयोग होत नाही. फसवेगिरीची पासोडी बनविणे सोपे आहे. फक्त ती देवालाच विकावी लागते.

लखलखीत पोशाखाच्या आतील मनुष्य कोणत्या दर्जाचा आहे हे लोकांना कसे कळणार ?

जो पत्र लिहितो त्यालाच फक्त पत्राचा मजकूर माहीत असतो.

जेथे न्यायाचा तराजू असतो आणि फिर्याद ऐकण्यासाठी न्यायालयही असते त्या ठिकाणी फसव्या प्रार्थनातंत्राचा काय उपयोग ?

जो फसवा संन्यासी संयमाचे सोंग करतो त्याच्या झोळीत काहीच पडत नाही. अंगात जर खरोखरीच गुण असतील तर ते आपोआप प्रकट होतील आणि त्यासाठी जाहिरातबाजी करावी लागणार नाही. तुझ्याजवळची कस्तुरी अस्सल नसेल तर तू बतावणी करू नकोस. कस्तुरी अस्सल असेल तर तिचा वासच सांगेल. तुझे सोने शंभर नंबरी आहे की नाही हे निकषावर घासल्याने कळणारच आहे. उंची कपड्याच्या आत साधे अस्तर असते. ते आत असल्यामुळे दिसत नाही. उंची कापड मात्र नजरेत भरते. मोठ्या लोकांना बाह्यात्कारी आडंबर आवडत नाही. म्हणूनच ते उंची रेशीम अस्तर म्हणून वापरतात. दुनियेत आपली ख्याती व्हावी असे वाटत असेल तर वर झगझगीत अंगरखा आणि आत मळकी बंडी असा पोशाख चालेल.

बायजीद बुसतामी[१०१] उगाच नाही म्हणाला की, "मी माझ्या धर्मद्वेष्ट्या शत्रूपासून माझ्या शिष्यापेक्षाही जास्त सुरक्षित आहे." मोठमोठे शाहनशाहदेखील देवाच्या दरबारात भिकारीच होत.

मोठे साधुसंत फकिरांकडून कसलीच अपेक्षा करत नसतात. कोण शहाणा पतितांचा आधार घेईल ?

तू जर खरोखरीच गुणवान असशील तर तू मोती असलेल्या शिंपल्याप्रमाणे तृप्त असावेस.

तू प्रार्थना करताना तुझे लक्ष ईश्वरावरच टिकून असेल तर त्याची बातमी जिब्राईलाला[१०२] लागली नाही तरी चालेल. बाळा ! तू 'सादी'चे वचन जरी बापाच्या उपदेशाप्रमाणे लक्षपूर्वक ऐकलेस तरी पुरे.

पण तू जर आज माझ्या बोलण्याचा अव्हेर करशील तर उद्या तुला पस्तावावे लागेल.

□ □ □

# अध्याय ६

# तृप्ती

जो स्वतःच्या ललाटलेखावर संतुष्ट नसतो, तो ईश्वराला ओळखत नाही आणि त्याची ताबेदारी करणे त्याला माहीत नसते. सहनशीलता मनुष्याला श्रीमंत बनविते; ही गोष्ट दारोदार हिंडणाऱ्या लोभी माणसाला सांग. चंचल प्राण्या ! तू स्थैर्य साध्य करण्याचा प्रयत्न कर. कारण घरंगळत जाणाऱ्या दगडावर शेवाळे देखील जमत नाही. विवेकी मानवा, तू जिवाचे चोचले करू नकोस ! तुला जेव्हा वाटते की आपण देहाचे संगोपन करतो तेव्हा नेमका तू त्याचा विनाश करीत असतोस. बुद्धिमान मनुष्य विद्येची हाव धरतो. जो सुखाच्या मागे लागतो त्याला विद्या कोठून येणार ?[१०३] इंद्रिय-संयम करण्याऱ्यालाच सदाचार शक्य असतो. खाणे, पिणे, झोपणे ही पशूंची कामे होत. यातच गुंतून राहणे मूर्खपणाचे लक्षण आहे. जो मनुष्य एकांतवास पत्करून परमतत्त्व जाणण्याची खटपट करतो, तोच खरा नशीबवान. ज्याला दिव्य ज्ञान प्राप्त होते, त्याला विषयेंद्रियांचा छळ सोसावा लागत नाही. ज्याला प्रकाश आणि काळोख यांमधील फरक कळत नाही त्याला अप्सरा व राक्षसी दोन्ही सारख्याच असतात. वाट कोणती आणि विहीर कोणती हे जर कळले नाही तर तू विहिरीतच पडशील. तुझ्या प्रज्ञापाखराला लोभाचे जोखड बांधलेस, तर ते चैतन्याच्या गगनात कशी भरारी मारील ?

जर तुझ्या आत्म्याला विषयवासनेच्या बंधनातून मुक्त केलेस तर तो परमार्थाच्या[१०४] राजधानीपर्यंत पोहोचेल. जर तू मिताहारी होशील, तर देवदूतांचे गुण प्राप्त करून घेणे तुला शक्य होईल. जंगली आचारविचारांच्या माणसाला सात्त्विकता कशी बरे साधेल ? त्याला आपल्या खालच्या श्रेणीवरून आकाशाची उंची गाठता येणार नाही. सर्वप्रथम माणसाप्रमाणे वागावयाला शिकावे. त्यानंतर देवदूतांची वागणूक साध्य करावी. तू एका अल्लड तट्टूवर स्वार झाला आहेस, तेव्हा ते बेकाबू होणार नाही याबद्दल सावधगिरी बाळग. तुझ्या हातातून लगाम सुटला तर तू प्राणास मुकून रक्ताच्या थारोळ्यात आढळशील. तुला जर मानवासारखी अक्कल असेल तर तुझ्या शिदोरीतील खाद्य तू जपूनच खाशील. बेहिशेबी खाण्याने लठ्ठ माव होशील. तुला माणूस म्हणावे की मडके म्हणावे असा प्रश्न पडेल. माणसाचे उदर प्राणधारणेसाठी आणि परमार्थ साधण्यासाठी असते. पण तुला वाटते की ते अन्न कोंबण्यांसाठीच असते. लोभाचा दाब वाढल्याने श्वास घेणेदेखील जेथे कठीण होते तेथे उपासनेचा काय पाड ? इंद्रियार्थी विमूढात्म्यांना हे कळत नाही की पोट जितके भरलेले असते, तितका मेंदू रिकामा असतो. आपले

डोळे आणि पोट यांना तृप्ती कशाशी खातात हे माहीतच नसते. नरकाच्या आगीत सरपण टाकावे तितके कमीच. त्याप्रमाणे इंद्रियांना किती चारले तरी "आणखी काही आहे का". अशी त्यांची ओरड असतेच. तुझ्या आत्म्याचा येशू मरावयाला टेकलेला आहे आणि तुझा खटाटोप गाढव पोसण्यासाठी चाललेला असतो.[१०५] बुद्धिमान प्राण्या, तू धर्माची सौदेबाजी करून ऐहिक सुख साधू नकोस. येशूचे बायबल विकून आपल्या गाढवासाठी ज्वारी विकत घेऊ नकोस. तुला कदाचित ठाऊक नसेल की, पशू आणि श्वापदे जाळयात अडकतात ती केवळ आपल्या लालसेमुळे होय. दुसऱ्या कोणत्याही कारणामुळे नव्हेत. वाघ डरकाळया फोडत कोणत्याही पशूवर झडप घालतो पण आमिषाच्या लोभाने उंदराप्रमाणे जाळयात सापडतो. तू ज्याची तूपरोटी खातोस त्याच्या जाळयात उंदरासारखा अडकून बसतोस आणि त्याचे प्रहारही तुला सोसावे लागतात.

* * *

एका हाजीने (मक्केच्या यात्रेकरूने) मला एक हस्तिदंती कंगवा दिला होता. (देव हाजी लोकांना उदंड आयुष्य देवो.) कोणीतरी मला सांगत होता की एका हाजीने मला कुत्रा म्हणून संबोधले, कारण तो माझ्यावर काही कारणास्तव चिडला होता. मी तो कंगवा फेकून दिला आणि म्हटले, " मला नको हे हाडूक ! मला पुन्हा कुत्रा म्हणू नकोस ! मी माझी मीठभाकर खाऊन तृप्त आहे. तुला असे वाटले काय की मी हलवा खाण्याच्या आशेने हलवा देणाऱ्याच्या गमजा सहन करीन ? "

हे जीवा ! जेवढे मिळते तेवढयावर तृप्त हो ! म्हणजेच तुला सर्वत्र समदृष्टी प्राप्त होईल व राव आणि रंक दोघेही तुला सारखेच वाटू लागतील.

तू आशेने बादशहापुढे हात का पसरतोस ? लोभाचा त्याग करशील तर तूच बादशहा होशील. तुला स्वाभिमान असेल तर तू पोट तबल्यासारखे रिकामे ठेव. दारोदार भिक्षेसाठी भटकण्याऐवजी त्यांच्या दरवाजांकडे पाठ फिरव.

## लोभी पिता आणि कुरकुरणारा पुत्र

तुर्कस्थानातील ख्वारज्मच्या सुलतानाकडे भल्या पहाटे एक माणूस गेला. त्याला पाहताच त्याने खालपर्यंत वाकून सलाम केला आणि तो उभा राहिला. पुन्हा त्याने अजिजीने धूळ चाटली आणि पुन्हा तो उभा राहिला. त्याच्याबरोबर त्याचा मुलगा पण होता. त्याने बापाला विचारले, " बाबा, तुम्हाला मी एक शंका विचारतो. तुम्ही म्हणत असता की, मुसलमान ज्याच्याकडे तोंड करून प्रार्थना करतात तो किब्ला मक्केत आहे. पण तुम्ही आज ह्या दिशेला तोंड करून नमाज का पढलीत ? "

वासनेने भारलेल्याच्या मागे लागू नका, कारण क्षणाक्षणाला त्यांचे आराध्य बदलत असते.

अरे भाई ! अशा माणसाची आज्ञा मानू नकोस. त्याची आज्ञा झिडकारणारे सुखी होतात. हुशार माणसा ! तृप्तीमुळे मान ताठ राहू शकते. लोभाने भारलेले डोके खांद्याहून वर उठतच नाही. लोभामुळे आपली प्रतिष्ठा विलयास जाते. जवाच्या दोन दाण्यांसाठी उपरण्यातील मोती सांडू नकोस. तुझी तहान झऱ्याचे पाणी पिऊन भागत असताना बर्फाचे पाणी पिण्याच्या आशेने आपली अब्रू का घालवतोस ? तुझ्या ठायी तृप्ती असेल तर तुला स्थैर्य लाभेल. नाहीतर गरजेपायी तुला दारोदार हिंडावे लागेल. महाराज, तुम्ही लोभ आवरा. तुम्हाला हांजीहांजी करून काय मिळणार आहे ? ज्याचा आशाळभूतपणा नाहीसा झाला असेल त्याला कोणाचीही ताबेदारी पत्करावी लागत नाही. तुझ्या स्वार्थीपणामुळे लोक तुला हाकलून देतात. तुझ्या आधाशीपणामुळे तुला सज्जनांच्या संगतीला मुकावे लागते. तू लोभीपणा घालविला नाहीस तर लोक तुलाच घालवून देतील.

## वासना माणसाला हीन बनविते

एका साधूला एकदा ताप आला. त्याला एकजण म्हणाला, " शेजाऱ्याकडून गुलकंद मागून घे." साधूने उत्तर दिले, " बाबा ! मी मागितले तर मला आंबट चेहरा पाहावा लागेल. त्यापेक्षा मरण पत्करले." शहाणी माणसे कपाळावरील आठ्या पाहाव्या लागू नयेत म्हणून कोणाकडेही गलकंद मागणार नाहीत. तुझ्या लहरीला जे रुचेल त्याच्या मागे तू धावू नकोस. देहाला सुख मिळेल पण जिवाचे तेज जाईल. वासना माणसाला हीन बनविते. तुझी बुद्धी जागृत असेल तर वासनेला आवर घालशील. जर तू वासनेच्या आहारी जाऊन भोगविलास करशील तर नशीब तुझी नाचक्की करील. पोटाची आग शांत करण्यासाठी वरचेवर खात राहणे बरे वाटते, पण जेव्हा अन्न मिळत नाही तेव्हा निराशेचा खटाटोप पदरी पडतो. चांगल्या दिवसांत चैन कराल तर वाईट दिवस आल्यावर तुमचा चेहरा पडलेला दिसेल. खादाड मनुष्य पोटाचे ओझे वाहात असतो. त्याला खाद्य मिळाले नाही तर मात्र त्याची त्रेधा-तिरपीट उडते.

पोटाची पूजा करणाऱ्यावर खजील होण्याची पाळी येते. माझ्या मते पोट संकुचित असणे हे मन संकुचित असण्यापेक्षा बरे.

## खादाडपणा वाईटच

मी बसऱ्याहून काय आणले आहे माहीत आहे ? छान मज्जा आहे ! ताज्या खजुराहूनही सरस आहे. आम्ही सर्व कंथाधारी फकीर एका खजुराच्या मळ्यावरून चाललो होतो. आमच्यात एक खादाड मनुष्य होता. तो आधाशीपणाने खात असे म्हणून सगळे त्याला शिव्या देत. तो एकदा लुंगी सावरून झाडावर चढला पण पाय घसरून खाली पडला.

खजूर तोडून घेऊन जाणे आणि खाणे प्रत्येक खेपेला जमेल असे नाही. पण तो लोभी मनुष्य अविवेकी होता म्हणून खाण्याच्या मागे लागून मरण पावला.

गावचे पाटील आले आणि 'त्यास कोणी ठार मारले ?' असे त्यांनी विचारले. मी त्यांस 'दमदाटी करू नका' म्हणून सांगितले. 'तो हावरटपणाने झाडावर चढला आणि खाली पडून मेला. ज्यांची आतडी लांब असतात, त्याची बुद्धी सुमार असते.'

टोळाला पोटाशिवाय दुसरे अंगच नसते म्हणून साधी मुंगी देखील त्याचा पाय धरून त्याला ओढून घेऊन जाते. आता जा ! आध्यात्मिक शुचिता साधा. पोटाची ओरड कब्रस्तानातील मातीशिवाय शांत होत नाही.

**यांग्य संधीची वाट पाहा**

एक सूफी साधू होता. उदर आणि शिश्न यांच्या हाकाटीमुळे तो बेचन झाला होता. त्यामुळे त्याला त्यांच्यासाठी दोन दिनार खर्चावे लागले. एका मित्राने त्याला दिनार कसे खर्चलेस म्हणून हळूच विचारले. त्याने सांगितले "मी एक दीनार पोटासाठी खर्च केला आणि एक शिश्नासाठी. मी मूर्खपणा केला खरा. दीनार खर्चून काहीच उपयोग झाला नाही, कारण पोट भरले नाही आणि शिश्न रिते झाले नाही."

षड्रस भोजन असो किंवा साधी झुणका-भाकर असो, तिच्यासाठी तिष्ठत बसावे लागते तेव्हाच ती गोड लागते.

झोप अनावर झाल्याशिवाय शहाणा मनुष्य तक्यास टेकत नाही.

योग्य संधी आल्याशिवाय कोणतीही गोष्ट बोलून दाखवू नये. चांगले मैदान दिसेपर्यंत बिटीदांडू हातातच राहू द्यावा. शक्य तो मोजके बोला आणि तोलून मापून पाऊल पुढे टाका.

* * *

तबकारी शहरात एक फेरीवाला गंडेरी विकण्यास गिऱ्हाइकापाशी घुटमळत होता. शेवटी एका बोळात त्याने एका सज्जनाला गाठून म्हटले, "गंडेरी घ्या आणि मिळतील तेव्हा पैसे द्या." त्या साधूने त्याला जे सांगितले ते लक्षात ठेवण्यासारखे आहे.

"गंडेरी मला विकण्याची तुला घाई झाली असली तरी गंडेरी घेण्याची मला मुळीच घाई नाही."

गंडेरीत गोडवाच असतो असे नाही; कारण तू पैशासाठी तगादा लावशील तेव्हा ती कडूच ठरेल.

* * *

खुतान गावच्या नबाबाने एका विद्वानाला रेशमाचा पोषाख पाठविला होता. त्या विद्वानाने पोषाख परिधान करून सलाम केला आणि तो म्हणाला, "खुदावंतांचा जयजयकार असो. खुतानच्या नबावांचा पोषाख चांगलाच आहे, पण

त्याहून चांगली माझी पासोडी आहे. " तू स्वतंत्र विचाराचा असशील तर जमिनीवर झोपलास तरी हरकत नाही. गालिचा मिळविण्यासाठी कंबर वाकवून सलाम करू नकोस.

## ' माझी कांदाभाकरच बरी '

एक मनुष्य कांदाभाकर खात होता. इतरांप्रमाणे त्याच्याजवळ अनेक प्रकारची तोंडीलावणी नव्हती. एका पाजी माणसाने त्यास म्हटले, " काय दरिद्री आहेस ! जा ! बादशहाच्या अन्नछत्रातून काही तरी घेऊन ये. आपल्याजवळ काही नसेल तर माणसाने भिडस्तपणा करू नये. कारण भीड भिकेची बहीण ! "

हे ऐकून त्या गरिबाने अंगरखा घातला आणि अस्तन्या वर सारून तो अन्न-छत्राकडे गेला. पण तेथे जाताच तेथील लोकांनी त्याचा अंगरखा फाडला आणि त्याचे हात पिरगळून परत पाठविले. तो बिचारा खिन्न झाला आणि अश्रू ढाळीत म्हणाला, " जीवा, तुझ्या धडपडीचे प्रायश्चित भोग. "

हावरट माणूस नानाप्रकारच्या संकटांना आमंत्रण देत असतो. मी बरा, माझे घरदार बरे आणि माझी कांदाभाकर बरी !

मी कमावून खातो ती जवाची भाकर उदार माणसांच्या पंगतीतील मिष्टान्ना-पेक्षा श्रेष्ठ. परान्नाला सोकावलेला माणूस जेवणावळ कधी असते ही बातमी ऐकण्यासाठी कान टवकारून बसलेला असतो आणि त्याला धड झोपही लागत नाही.

* * *

एका गरीब म्हातारीने एक मांजर पाळले होते. म्हातारीच्या घरात ठण-ठणाट असल्यामुळे ते राजाच्या मुदपाकखान्यात गेले. पण तेथे त्याला तेथील नोकरांनी चोप दिला. घायाळ होऊन ते पळत सुटले. ते स्वतःशी पुटपुटत होते " या नोकरांच्या हातून माझी सुटका झाली तर मी धन्य होईन. म्हातारीची पडवी आणि तेथील उंदीर एवढे मला पुरे. "

माझ्या लाडक्या जीवा ! मधाची किंमत डंख सोसून खाण्याइतकी नसते. खिरीचे सांडलेले थेंब चाटून सुद्धा तृप्त होता येते.

देव ज्या स्थितीत आम्हांस ठेवतो त्याबद्दल कुरकूर केलेली त्याला आवडत नाही.

## धांदरट नवरा आणि जहांबाज बायको

आपल्या मुलाला दात येतात हे पाहून एक गृहस्थ सचिंत झाला होता. तो म्हणाला, " त्याला आता दात येत आहेत आणि मग त्याला खावेसे वाटेल! तर मी धान्य कोठून आणू ? बरे ! त्याच्याकडे दुर्लक्ष करूनही चालणार नाही ! "

त्याने आपला हा विचार आपल्या बायकोला सांगताच ती अशी काही उसळली म्हणता की सांगता सोय नाही.

"सैतानाला भिऊन मूल मरेल अशी अभद्रवाणी का बोलता ? जो रदन देतो तो अशनही देतोच ! ईश्वर सर्वसामर्थ्यवान आहे. त्याला सर्वांच्या पोटाची काळजी आहे. तुम्ही व्यर्थ चिंता कशाला करता ? जो मातेच्या उदरात अर्भकाची मूर्ती घडवितो तो त्याच्या कपाळी आयुष्य आणि आहाराच्या रेषा काढून ठेवतोच. स्वत:पाशी पोसण्याची ताकद असल्याशिवाय कोणी गुलाम विकत घेईल काय ? झाले तर ! जो जन्मास घालतो तो पोटासही घालतो. दासाला आपल्या स्वामीबद्दल असते तेवढीसुद्धा तुमची देवावर श्रद्धा नाही. पूर्वी अबदाल साधू ज्या दगडाला स्पर्श करीत तो चांदीचा होत असे हे तुम्हाला ठाऊक नाही काय ? "

जो मनाने तृप्त असतो त्याला दगड आणि चांदी ही सारखीच असतात असे मी म्हटले तर ते वावगे आहे असे समजू नका. अर्भकाचे मन निर्मळ असते म्हणून त्याच्या-समोर मूठ धरली तर तीत चांदी आहे की माती आहे असा प्रश्न त्याला कधी पडतच नाही. जो फकीर बादशहाची हांजीहांजी करतो त्याला सांगावे, ' बादशहा दरवेशा-पेक्षा पराधीन असतो. गरिबाच्या पदरात एक दिरम पडले तरी त्याचे भागते. पण फरीदून (वित) बादशहाला सारा इराण देश जिंकूनही चैन पडले नाही. बादशहाला राज्याची आणि भांडाराची काळजी लागलेली असते. फकीर हाच खरा बादशहा. त्याचे केवळ नाव फकीर असते. चिंतामुक्त फकीर चिंतातुर राजापेक्षा निश्चितच श्रेष्ठ असतो.

शेतकरी आणि त्याची घरधनीण आपल्या घरी ऐटीत झोपत असतात तशी ऐट बादशहाला राजमहालात देखील लाभत नाही. माणसाला जेव्हा मस्त झोप लागते तेव्हा आपण सिंहासनावर आहोत की कुर्दिस्तानच्या वाळवंटात आहोत त्याची त्याला जाणीव नसते. झोपी गेलेला राजा असो किंवा रंक असो दोघेही दिवस उजाडल्यावरच उठतात.

अकिंचना ! तू जेव्हा कोणा घमेंडखोर सावकारास पाहशील तेव्हा जा आणि कोणाचे मन दुखवण्यासारखी श्रीमंती तुजजवळ नाही याबद्दल देवाचे आभार मान!

* * *

एक सच्छील गृहस्थ आपल्या ऐपतीप्रमाणे घर बांधून राहात होता. एकजण आला आणि त्याला म्हणाला, " अहो तुम्ही चांगले गडगंज श्रीमंत आहात. चांगला बंगला बांधा ! " त्याने उत्तर दिले, " जे आहे ते पुरे ! दुमजली घर कशासाठी हवे ? एवीतेवी मी घरातून निघून जाणार. सोडून जायला तरी हे घर ठीक आहे ना ! "

मानवा! पुराच्या कक्षेत असलेल्या जागी घर बांधू नकोस कारण ते पूर्ण होई-पर्यंत कोणी जगणारच नाही.

पेंढाऱ्यांच्या ऐन वाटेवर कोणी बुद्धिमान आणि विचारवंत घर बांधत नसतात.

* * *

एक ऐश्वर्यशाली सुलतान दिवंगत झाला. त्याला कोणी वारस नसल्यामुळे एक पोथीपरायण शेख गादीवर बसला. नौबतीचा सूर कानी पडताच एकांतात जपमाळ ओढणाऱ्या त्या शेखाचा नूर बदलला आणि तपश्चर्येचा त्याचा उत्साह पार मावळला. त्याने जोरात मुलुखगिरी आरंभिली आणि त्यामुळे दरबारी मंडळींचे धाबे दणाणले. तो असा काही चढेल बनला की कोणाही शूर शिपायाला युद्धाचे आव्हान देऊ लागला. त्याने शत्रूला जिंकल्यावर निष्पाप प्रजेची बेसुमार हत्या केली. तेव्हा समान मताचे आणि जमातीचे लोक एकत्र आले. त्याला किल्ल्यात कोंडून त्यांनी त्याच्यावर चारी बाजूंनी बाण आणि दगडांचा वर्षाव केला. त्यामुळे तो हतबुद्ध झाला. त्याने एका तत्त्ववेत्या विचारवंताकडे जासूद पाठवून आपल्याला मदत करण्याची विनंती केली त्याने, "आता मला तुमच्या आशीर्वादानेच वाचवा कारण बाण-तलवारींचा आता काही उपयोग नाही."

तो सत्पुरुष हसून म्हणाला, "अर्धी भाकर खाऊन स्वस्त का झोपला नाहीस कोण जाणे! अद्वितीय द्रव्यलोभी[१०७] कारूनला हे कळले नाही की शांतिधनाचे भांडार तपोभूमीच्या काळोख्या कोपऱ्यात असते."

## प्रगतीच्या अपेक्षेने आहे त्याच स्थितीत समाधान मानावे

उदार गृहस्थाचे वैशिष्ट्य म्हणजे त्याचा दिलदारपणा होय. मग त्याच्याजवळ धनदौलत नसली तरी त्याला उणेपणा येत नाही. याउलट कृपण मनुष्याचे उखळ पांढरे झाले तरी त्याला औदार्याचा झटका येणार नाही.

सहृदय मनुष्य भुकेकंगाल असला तरी त्याचे तेज काही कमी होत नाही.

औदार्य ही जमीन आणि संपत्ती ही शेतकी होय. तुम्ही दान कराल तसे पीक भरघोस येईल. देव मनुष्याला मातीपासून घडवितो तेव्हा त्याला माणसाचा विसर कसा पडेल? संपत्ती साठवून मोठा मनुष्य म्हणवून घेण्याची खटपट करू नकोस, कारण साठलेल्या पाण्याला कुबट वास येतो. तू उदार होण्याचा प्रयत्न कर, म्हणजे साठलेले पाणी प्रवाही होईल आणि पुण्याचा पूर लोटेल आणि तुला भगवंताचा अनुग्रहही लाभेल.

जर कोणी कंजूष मनुष्य कफल्लक होईल, तर त्याला पुन्हा कधी डोके वर करता येणार नाही. तू जर मौल्यवान मोती असशील तर घाबरून जाऊ नकोस. तुला काळ नष्ट करू शकणार नाही. वाटेत पडलेल्या मातीच्या ढेकळाकडे कोणाची नजर जाईल? तेच सोनाराच्या चिमटयाला लागून असलेला सोन्याचा कीस खाली पडला तरी तो दिवा लावून शोधून काढतात. काच जरी दगडापासूनच तयार करतात तरी दगडातील मळ दूर झाल्याशिवाय काच होऊ शकत नाही.

चारित्र्य शुद्ध असणे महत्त्वाचे. एरव्ही संपत्ती कधी येते आणि कधी जाते.

**प्रसवे अवस सुवर्णा अरुणा**

काही मधुरभाषी वडीलधारी मंडळींकडून मी ऐकले की, या शिराज गावात पूर्वी एक म्हातारा होऊन गेला. त्याने अनेक सुलतानांच्या राजवटी पाहिल्या होत्या. तो शिराज नगराच्या संस्थापकाचा समकालीन होता.

हे झाड जुने असले तरी त्याच्यापाशी नवे फळ होते. त्याच्या पदरी एक अत्यंत गोंडस पोऱ्या होता. साऱ्या शहरात त्याच्याइतका देखणा कोणीच नव्हता.

त्याच्या हनुवटीत भलतीच जादू होती. सरूच्या झाडाला सफरचंद लागले असते तरी देखील इतकी नवलाई वाटली नसती. त्याच्या कुरळ्या केसाने रसिकांची मने मोहित होत. म्हणून त्याचे मुंडन करणे हेच सोईचे असे त्याला वाटले.

म्हातारचळामुळे मतिभ्रम झालेल्या त्या बुढ्ढयाने त्याच्या डोक्यावर वस्तरा चालवून त्याचा पपनस करून टाकला ! [१०८] आता त्याचे मस्तक मूसा पैगंबराच्या पंजाप्रमाणे पांढरेफटक झाले. त्या असुरी वस्तऱ्याच्या धारदार जिभेने त्या सुंदर तरुणाला कुरूप बनवून टाकले. त्याचे केस जाऊन त्याचा गोंडसपणा नष्ट झाल्यावर त्याने पटकन वस्तरा काढून ठेवला. तारा तुटलेल्या तंबोऱ्याप्रमाणे त्याचे तोंड उतरून गेले होते.

त्याचा एक चाहता आवक होता, अनुरागाने भ्रांत झालेल्या नजरेने तो त्याच्याकडे पाहात होता.

एकाने त्यास उपदेश केला. " त्याच्यावर मोहित होऊन तू प्रणय-क्लेश सोसत आहेस. त्याच्या रूपाचे वाटोळे झाले आहे म्हणून आता तरी त्याचा नाद सोडून दे. तू ज्या लावण्यज्योतीवर पतंगासारखा उल्लू झाला होतास ती ज्योत वस्तऱ्याने मालवून टाकली आहे."

लगेच तो चतुर प्रेमी ओरडून म्हणाला, " ढिले आषकच भावबंधन तोडतात. लाखमोलाची गोष्ट म्हणजे मुलाचे रूप होय. त्याचे मुंडन करण्याचा बावळटपणा त्याच्या बापाने करू नये असे त्याला बजवावे. माझा जीव त्याच्या प्रेमात अडकला आहे, केशकलापात नव्हे. चेहरा गोड असला म्हणजे बस् ! केस काय, वाढतात आणि गळतात ! "

द्राक्षाची वेल काही बारा महिने घोस देत नाही. कधी पाने गळून विरूप होते, तर कधी फळाने बहरते. गुणी लोक सूर्यासारखे आणि निर्गुणी निखाऱ्यासारखे.

सूर्य ढगात शिरल्याने त्याचे तेज मंदावले तरी ढगातून बाहेर आल्यावर पुन्हा तो तळपतो. गुणहीन निखारे पाण्यात पडल्यावर त्यांचे सारे काही आटोपते.

प्रिय मित्रा, तू काळोख पाहून घाबरू नकोस. तुला हे माहीत नाही की " आबे हयात " — अमृताचा साठा–तिमिरव्याप्त गुहेतच सापडतो.

घालमेलीनंतर जगाला उसंत सापडत नाही काय ? 'सादी'नेही पल्ला गाठेपर्यंत पर्यटन केले नाही काय ?

व्यर्थ चिंतेने व्याकुळ होऊ नकोस. लक्षात ठेव की, रात्रीच्या गर्भाशयातच दिवसाचे वास्तव्य असते.

□ □ □

अध्याय ७

# उक्ती आणि कृती

मी आता विद्यार्जन आणि चारित्र्य या विषयांवर प्रवचन करणार आहे. मी खेळ, तमाशा यांबद्दल सध्या बोलत नाही. तू आणि वासना दोघे एकाच ठिकाणी राहता. तू वासनेच्या ताब्यात जातोस तेव्हा तुला परक्याने वेठीस धरले असे होते. वासना आवरुन दुराचार टाळणारा महामल्ल रुस्तुम[१०९] सामपेक्षाही शूर असतो. तू जर कोणाचा शत्रू होशील तर तुझा धाक कोणालाही वाटणार नाही. कारण ते म्हणतील की याला स्वत:वरच काबू मिळविता आला नाही तर तो आम्हांस कसा जिंकील ?

मुलाला जसे छडीच्या साहाय्याने शिकवून तयार करतात तसेच तू स्वत:ला तयार कर. उगाच वाईटसाईट बोलून लोकांचे डोके उठवू नकोस.

तुझे शरीर म्हणजे भल्या-बुऱ्या लोकांची दाट वस्ती आहे. तू राजा आणि तुझी बुद्धी वजीर होय. या वस्तीतील पुंड म्हणजे लोभ, मद, मोह हे होत. येथील सज्जन नागरिक म्हणजे तृप्ती, आज्ञाधारकता अणि संयम हे होत. काम, मत्सर हे चोर-दरोडेखोर होत. राजा जर पुंडपाळेगारांची तळी उचलायला लागला तर बुद्धिवंतांना सुखाने राहता येणार नाही. शिरेत रक्त किंवा शरिरात प्राण जसे एकजीव होऊन राहतात, त्याप्रमाणे काम, क्रोध, लोभ, मोह हे तुझ्यात खिळलेले आहेत. हे तुझे षड्रिपू जर शिरजोर झाले तर तुझी आज्ञा धाब्यावर बसवतील. पण बुद्धीच्या वज्रमुठीची जाणीव होताच काम-क्रोधादि शत्रू जपून वागतात. कोतवालाचा मुक्काम असेल तेथे रात्रीच्या वेळी टोळभैरव काय म्हणून फिरकतील ?

जो बादशहा शत्रूंना धाकात ठेवत नाही तो दुष्टदमनाच्या कामी अपेशी ठरतो.

या बाबतीत मी अधिक सांगू इच्छित नाही. कारण शहाण्याला साधा शब्दही पुरे असतो.

### मौनमाहात्म्य आणि स्वाभिमानाचे तेज

स्थैर्याच्या बाबतीत तू पर्वताशी बरोबरी करशील, तर तुझी कीर्ती विश्वव्यापी होईल. बुद्धिमान मनुष्या, तू मौनव्रत धारण कर. कारण कयामतीच्या न्यायदान-सत्रात मुक्या (जनावरा) च्या कर्माची छाननी होत नाही. म्हणून जसे मौक्तिक बिंदू दृष्टीस पडल्याशिवाय शिंपले तोंड उघडीत नाहीत तसेच ज्ञानी लोक काही रहस्य सांगावयाचे असले म्हणजेच बोलतात. सारखी वडवड करणारा बहिरा असतो, कारण त्याने गप्प बसावे यासाठी त्याला दिलेली समज त्याला ऐकू येत नाही. उचलली

जीभ आणि लावली टाळ्याला, असे करशील तर इतर काय बोलतात याकडे तुझे लक्ष राहणार नाही. संपूर्ण विचार केल्याशिवाय बोलू नये. दुसऱ्यांचे बोलणे संपेपर्यंत मध्येच काही बोलू नये.

बऱ्यावाइटाचा संथपणाने विचार करणारे बावळट नव्हेतच. तसेच क्षणोक्षणी चुरुचुरू बोलणारा हजरजबाबी नव्हे.

मनुष्याचा विवेक ही एक महत्त्वाची गोष्ट आहे. तू बोलघेवडेपणा करून बावळट बनू नकोस. कमी बोलणारा कुचकामी कधीच ठरत नाही. कारण ढीगभर मातीदेखील कस्तुरीच्या एका कणाशी बरोबरी करू शकत नाही. दहा लोकांशी बोलण्यात गुंतलेल्या मूर्खाशी तू जपून वाग. एकच शब्द बोललास तरी हरकत नाही, पण तोलून मापून बोल.

लक्ष चुकणारे शंभर बाण मारण्यापेक्षा लक्ष टिपणारा एकच बाण मार.

आपण काहीतरी बोलावे आणि ते उघडकीस येताच आपला कपाळमोक्ष व्हावा अशा प्रकारे खाजगीतही काही बोलू नये.

भिंतीचा आडोसा आहे या समजुतीने काही गुपित सांगू नये. कारण भिंतीलाही कान असतात. तुझ्या मनातील गुपित हे वेढा घातलेल्या शहरासारखे असते. त्या शहराची वेस खुली नसते याबद्दल काळजी घे. शहाणा मनुष्य तोंडाला कुलूप लावतो, कारण मेणबत्तीची जीभ (वात) लांब असेल तर तिला जळावे लागते. म्हणून शहाणे लोक आपले तोंड शिवून टाकतात.

## गुपित कसे राखावे

ख्वारज्मच्या तिकश[११०] बादशहाने आपल्या गुलामांना एक गुपित सांगून त्याची वाच्यता न करण्याबद्दल ताकीद दिली. पण ते वर्षभर त्यांच्या मनात राहिले आणि एके दिवशी जगजाहीर झाले. त्याने मारेकऱ्यांना त्या गुलामांची मुंडी उडविण्याचा हुकूम दिला. तेव्हा जवळ असलेल्या एकाने विनविले, "खुदावंत! मी अभयदान मागतो. या गुलामांची कोणतीच चूक नाही. आपण चुकलात. बोटाएवढा झरा असतानाच पायबंद घालता येतो. तो धो धो वाहू लागल्यावर कसा अडविता येईल?"

आपले गुपित ज्याला सांगाल तो दुसऱ्यांना ते सांगितल्याशिवाय राहात नाही. जडजवाहीर खजिनदाराच्या हवाली करावे, पण मर्म मात्र आपल्या मनात जपून ठेवावे. जोवर शब्द बाहेर पडत नाहीत, तोवर त्यांच्यावर तुमची सत्ता असते. पण एकदा ते बाहेर पडल्यावर तुम्हीच त्यांच्या हवाली जाता. गुपित म्हणजे मनाच्या विहिरीत कोंडलेले भूत. जीभ उचलून टाळ्याला लावली की ते मोकाट सुटते. अजस्त्र पिशाच्चाला वाट करून देणे सोपे. पण पुन्हा त्याला बंदिस्त करणे अशक्य. सतान बाहेर पडला म्हणजे तू कितीही वेळा "लाहोल"[१११] म्हटलेस तरी

तो परतणार नाही. महावीर रुस्तुमाचा घोडा एका पोरट्याने सोडला, तर शंभर रुस्तुमही तो आवरू शकणार नाहीत. ज्या गोष्टीची वाच्यता झाल्याने अनेकांचे नुकसान होते ती कधी उच्चारू नका. एका अनाडी शेतकऱ्याला त्याच्या बायकोने दिलेला कानमंत्र किती छान आहे पाहा—

"असेल अक्कल तर बोल नाहीतर मूग गिळून बैस."

## अज्ञानी माणसांचा आधार – मौन

एक सदाचारी संत होता. तो काही दिवस इजिप्तमध्ये मौनव्रत धारण करून बसला होता. जवळचे आणि लांबचे बुद्धिमान लोक त्याच्याकडून कौल घेण्यासाठी पतंगासारखे त्याच्याकडे येऊन थडकत असत. एके दिवशी चिंतन करून त्याने उद्गार काढले, "मनुष्य हा जिभेआड लपलेला प्राणी आहे. मी हा पडदा फाडून बाहेर प्रकट झालो, तर लोकांनी मला ज्ञानी का म्हणू नये ?"

असे तो बोलला आणि त्याच्या शत्रुमित्रांना कळून आले की साऱ्या इजिप्तमध्ये त्याच्याइतका मूर्ख तोच. त्याच्या सेवेत रमलेले बेचैन झाले. त्यांना आता घात झाला असे वाटले.

तो तेथून निघाला आणि जाता जाता त्याने मशिदीच्या महिरपीवर लिहून ठेवले की, "मी आरशात आपले तोंड पाहिले असते तर स्वतःला मूर्ख समजून मी बेचैन झालो नसतो. माझ्यात इतके अवगुण असताना मी एकच चूक केली आणि ती म्हणजे स्वतःला सुंदर समजून मी तोंडावरून पडदा बाजूला सारला. आवाज जितका बारीक तेवढी प्रतिष्ठा दांडगी लाभते. तुझ्या बोलण्यामुळे तुझे तेज टिकून राहिले नसेल तर तू पळ काढ."

विचारवंता ! तुला प्रतिष्ठा लाभते ती मौनाने ! मौनच नालायकीवर पडदा टाकते. तू विद्वान असशील तर अधिक बोलून आपली छाप पाडण्याची खटपट करू नकोस आणि मूर्ख असशील तर तोंडावरचा बुरखा फाडू नकोस. आतल्या मनातले गुपित एकदम बोलून टाकू नकोस.

फुरसतीने तुला ते प्रकट करता येईलच. पण एकदा एखाद्याचे बिंग बाहेर पडले म्हणजे काही केल्या पुन्हा ते गुप्त राखता येत नाही.

जनावरे मुकी असतात आणि मानव बोलका असतो. पण फार बोलणारा जनावरापेक्षाही हीन होय.

मनुष्याने विवेकानेच बोलावे नाहीतर जनावरांप्रमाणे मुके राहावे. बुद्धी आणि वाणी यांवरूनच माणसाची योग्यता ठरते. पोपटाप्रमाणे अर्थशून्य बडबड करणारा आणि बेअकली बनू नकोस. लेखणी पाहा ! ती रहस्य कसे चांगले जपून ठेवते ! मानेवर सुरी आल्याशिवाय ( बोरू तासल्याशिवाय) ती काही बोलतच (लिहीतच) नाही !

* * *

एकदा एका माणसाने लढताना शिवीगाळ केली तेव्हा लोकांनी त्याला पकडून त्याचा सदरा फाडला आणि त्याला लाथाबुक्क्या दिल्या. मार खाऊन उघड्या अंगाने तो रडत बसला.

एका अनुभवी गृहस्थाने त्यास म्हटले "मस्तवाल माणसा ! जर तुझे तोंड कळीसारखे बंद राहिले असते तर तुझे कपडे फुलाच्या पाकळ्यांप्रमाणे गळाले नसते. मूर्ख मनुष्याचा मेंदू तंबोऱ्यासारखा पोकळ असल्याने त्याचे सर्व बोलणे अर्थशून्य असते. तू पाहतोसच की आग (ज्वाला) ही जिभेसारखी (वाणीसारखी) आहे. तिला थोड्याच वेळात पाणी टाकून विझविता येते. जर मनुष्याच्या अंगी कला असेल, तर ती प्रकट झाल्याशिवाय राहणार नाही. कलावंताला वल्गना कराव्या लागत नाहीत. तुझ्याजवळ कस्तुरी नसेल, तर उगाच बाता मारू नकोस. तुझ्याजवळ कस्तुरी असेल तर तीच आपल्या वासाने प्रकट होईल. हे शंभर नंबरी सोने आहे म्हणून शपथेवर सांगण्याची गरज काय ? कसाचा दगडच ती गोष्ट ताबडतोब जाहीर करील.

'सादी' हा नालायक आणि कुचकामी मनुष्य आहे अशी टीका करणारे हजारो लोक आहेत. त्यांना माझे कपडे खुशाल फाडू द्या पण ते जर माझे डोके उठवतील तर ते सहन करण्याची मला शक्ती नाही.

* * *

उजदुद्दौला देलमी बादशहाचा मुलगा फार आजारी होता आणि त्यामुळे बापाचा धीर खचला होता. एका साधने त्यास बंदिस्त केलेले वन्य पक्षी सोडून देण्याचा उपदेश केला. पहाटे किलबिलाट करणाऱ्या पक्ष्यांचे पिंजरे तोडले गेले. कारागृहच पाडल्यावर कोण कैदी शिल्लक राहतो ? एका सुस्वर बुलबुलाला मात्र त्याने बागेच्या कुंजात सुरक्षित ठेवले. उजाडताच मुलगा बागेत गेला. त्याला त्या बुलबुलाविशाय राजगृहात एकही पाखरू दिसले नाही. तो हसून त्या बुलबुलाला म्हणाला, "पाहा, तुझी गोड वाणीच तुझ्या बंदिवासाला कारण झाली !"

तू बोलका नसतास तर लोकांना तुझी फिकीरही वाटली नसती. पण जे बोलशील ते ठसेल असेच बोल. "सादी" देखील कित्येक वर्षे अबोल राहिला होता. त्याला टोमणे मारणाऱ्यांची कटकट नव्हती.

लोकांच्या संगतीला जो बगल देईल तोच प्रियपात्राला बगलेत मारील.

बुद्धिवंत माणसा ! लोकांच्या उणिवांची उठाठेव करू नकोस. उलट त्यांच्या न्यून्यांचे परिशीलन करून स्वत: शहाणा हो. कोणी बडबड करीत असेल तर कानात बोट घाल. कोणी नेसलेले काढून फेकत असेल तर तुझी नजर फिरव.

* * *

तुर्की लोकांच्या मैफलीत एकाने कव्वालाचा डफ आणि तुणतुणे फोडले. गुलामांनी त्याचे केस धरून ओढले आणि डफावर मारतात तशा त्याच्या तोंडावर

थपडा मारल्या. मारामुळे त्याला रात्री झोप लागली नाही. दुसऱ्या दिवशी एका स्थविराने त्याला समजावून सांगितले, " डफासारखा तुला त्यावर मार नको असेल तर तंबोऱ्याप्रमाणे तू तुझी मुंडी खाली घालावीस. "

* * *

दोघेजण रस्त्यातून जात होते. रस्त्यावर धुळीची वावटळ उठली होती आणि दगड, विटा, चपला त्या वावटळीत उडत होत्या. त्यांपैकी एकजण त्या गोंधळाच्या वाटेला न जाता पुढे चालू लागला. दुसरा भांडण मिटवायला गेला आणि डोके फोडून घेऊन परतला.

ज्याला कोणाच्या बऱ्यावाइटाची फिकीर नसते त्याच्यासारखा सुखी आणि स्वाभिमानी विरळाच ! माझ्या वदनात डोळे आणि कान अशी इंद्रिये आहेत. शिवाय तोंड बोलण्यासाठी आणि चित्त सावध राहण्यासाठी असते. तेव्हा तू सारासार विवेक कर आणि उच्चनीच यातील अंतर जाण ! उगाच अमका हलका तमका बडा असे बोलत राहू नकोस.

**अबोलपणामुळे आराम मिळतो आणि आतताईपणामुळे फजिती होते**

एका वृद्ध माणसाचे म्हणणे ऐका. अनुभवी माणसाचे बोल हितप्रद असतात. " मी हिंदुस्थानात गेलो होतो. तेथे मी अमावास्येच्या रात्रीसारखा एक शिद्दी पाहिला. त्याच्या मिठीत एक चंद्रानना होती. तिच्या ओठावर त्याचे दात होते. त्याने तिला इतके घट्ट आवळले होते की असे वाटावे की जणू रात्रीने दिवसास दडवूनच ठेवले आहे.

मला सुविचार सुचला ! दुरित नष्ट करून पुण्यकर्म करावे असे मला वाटले. त्या पाजी माणसाचा मला मनस्वी राग आला. मी ओरडलो, " आणा रे काठ्या अन् दगड ! काय जंगली पापी आणि निर्लज्ज माणूस आहे हा ! " शिवीगाळ, टोमणे, दुश्वास आणि आदळआपट केल्यावर काळे आणि पांढरे यांतील फरक मला कळला. उजाडल्यावर काळोखाचा जसा लोप होत जातो तसे ते काळे भूत बागेच्या पलीकडे निघून गेले आणि कावळ्याच्या तोंडातून तांबडे पांढरे अंडे बाहेर पडावे तशी ती त्याच्या तडाख्यातून बाहेर पडली.

मी लाहोल व ला कुव्वत (इडापिडा टळो) असे म्हटल्याबरोबर ते भूत पळाले. त्या अप्सरेने माझा हात धरला आणि मला दटावून ती म्हणाली, " अरे धनलोभाने धर्म विकणाऱ्या फकिरा ! मी या मनुष्यावर कित्येक वर्षांपासून मोहित झाले होते. त्याच्यासाठी माझा जीव बैचेन झाला होता. तू माझ्या तोंडचा घास काढून घेतलास. माझ्या हौसेचा तू विचका केलास." तिने आक्रोश केला, फिर्याद केली. ती मला अन्यायी आणि निष्ठुर म्हणाली, " काय करू ! कोणी तरुण धावून येत नाही ! नाहीतर या थेरड्याचे उट्टे काढले असते. याला आपल्या म्हातारपणाची देखील लाज वाटत नाही. याने कोणी पाहू नये अशा माझ्या अवघड जागी हात घातला."

ती किंचाळत होती आणि तिने माझा सदरा घट्ट धरला होता. मी लाजून मुंडी खाली घातली, आणि माझे कपडे टाकून पळालो. कारण मला लहानमोठ्यांच्या फटकाऱ्यांची भीती वाटत होती. मी कपडे टाकून त्या बाईच्या समोरून पळालो. कारण तिच्या हाती मी सापडण्यापेक्षा माझे कपडे सापडलेले बरे.

काही दिवसांनंतर ती मला भेटली त्या वेळी मला म्हणाली, " मला ओळखता ?" मी म्हटले, " मला देव तारो ! तुझ्या तावडीतून सुटल्यावर फालतू उठाठेव न करण्याचे मी ठरविले आहे. अशी वेळ कोणावर येऊ नये. शहाण्या मनुष्याने आपण बरे आपले काम बरे म्हणून स्वस्थ बसावे."

घडल्या गोष्टीपासून मी एक बोध घेतला. एखादी गोष्ट प्रत्यक्ष पाहूनसुद्धा ती पाहिलीच नाही अशा थाटाने वागू लागलो.

तुझ्याजवळ बुद्धी असेल आणि तुझी शुद्ध शाबूत असेल तर तू " सादी " प्रमाणे शहाणपणाने बोल, नाहीतर तोंड मीट.

## चहाडी-चुगली करू नये

महान सुफी अबू सुलेमान दाऊद बीन नसीर हा ताई यांच्याकडे आला आणि त्याने त्यांना सांगितले की, अमक्या सुफी साधूला मी दारू पिऊन पडलेला पाहिला. ओकल्यामुळे त्याचे कपडे भिजले होते. त्याच्या अवतीभोवती कुत्री जमा झाली होती. हजरत ताईनी ही हकीकत ऐकली. पण त्यांना त्या बातमीदाराचे कृत्य आवडले नाही. ते थोडा वेळ डोके धरून बसले आणि त्याला म्हणाले, " महाशय, जो खरा मित्र असतो तो अशा वेळीच उपयोगी पडावा लागतो. जा आणि त्याला दारूच्या अड्ड्यातून घेऊन या. हे पाहा, त्याला तुम्ही खांद्यावरून आणा. प्यालेल्या माणसाला घोड्याचा लगाम संभाळता येत नाही."

बातमीदार आ वासून हे सर्व ऐकत होता. तो विचारात पडला आणि गाढव जसे चिखलात सापडले म्हणजे उभे राहते तसा ताटकळत उभा राहिला. पण त्याला सुफी संताच्या आज्ञेची अवहेलना करण्याची हिंमत नव्हती आणि त्या दारुड्याला खांद्यावरून आणण्याचीही त्याची तयारी नव्हती. थोडावेळ तो तेथेच घुटमळत राहिला. काय करावे ते त्याला सुचेना. हुकमाची अमलबजावणी टाळण्याची सोयही नव्हती. शेवटी तो त्या दारुड्याला खांद्यावर घेऊन आला. साऱ्या शहरातील लोक त्याची मस्करी करीत होते. काही लोक टोमणे मारीत होते, " पाहा हा दरवेश ! काय विचित्र शुचिर्भूतता ही ! आणि केवढी धर्मपरायणता !" कोणी म्हणत होते,' " म्हणे सुफी ! दारू झोकली आहे आणि तीही पासोडी गहाण ठेवून बर का !' दुसरा कोणी हातवारे करीत म्हणाला, " एकजण तर्र झालेला आहे आणि एक अर्धवट शुद्धीत आहे."

खरे म्हणजे गावात बदनामी होण्यापेक्षा डोक्यावर शत्रूची तलवार पडलेली परवडली.

दिवसभर धडपड करून त्याने शेवटी त्या दारुड्याला त्याच्या घरी पोहोचविले. रात्री त्याला झाल्यागेल्याची लाज वाटू लागली, आणि झोप येईना. दुसऱ्या दिवशी हजरत ताई त्यास म्हणाले,

" बेटया ! बोळात पडलेल्या तुझ्याच बांधवाची अब्रू काढलीस तर लोक शहरात तुझी नाचक्की करणारच. "

हुशार गड्या ! काही लोक वाईट असतील आणि काही चांगले असतील पण त्यात वाईटांकडे बोट दाखवू नकोस. कारण वाईट म्हटल्याने वाईट माणूस विनाकारण तुझा शत्रू होईल. पण तो चांगलाच असेल तर निंदा केल्याचा आरोप तुझ्या कपाळी येईल. कोणी तुझ्याजवळ येऊन अमका वाईट आहे म्हणाला तर समज की त्याची कातडी पशूचीच आहे. वाईट गोष्टीचा पुरावा सांगावा लागतो आणि त्यावरून ती सिद्ध व्हावी लागते. तू जेव्हा लोकांना वाईट म्हणतोस तेव्हा तुझे म्हणणे खरे असले तरी तुझे कृत्य वाईटच.

माझे गुरू हजरत शेख शिहाबुद्दीन सुहरावर्दी यांनी मला नदीच्या काठावर दोन युक्तीच्या गोष्टी सांगितल्या होत्या. त्या म्हणजे स्वत:बद्दल स्वत:चेच मत बनवू नकोस ! आणि दुसरी म्हणजे लोकांच्या बाबतीत छिद्रान्वेषण करू नकोस.

* * *

एका मनुष्याने कोणाएकाची त्याच्यामागे निंदा चालविली होती. एका मान्यवर गृहस्थाने त्यास म्हटले, " माझ्यासमोर दुसऱ्यांची निंदा करू नकोस. त्यामुळे तुझ्याबद्दल माझा भलताच ग्रह होईल. तुझ्या सांगण्यावरून तो मनुष्य हलक्या दर्जाचा असेल हे कबूल, पण त्यामुळे तुझी प्रतिष्ठा कशी वाढेल ? "

* * *

एकजण म्हणाला, " चुगलीपेक्षा चोरी बरी! " मला तो गृहस्थ विनोदी वाटला. मी त्यास म्हटले, " तुम्हांला झाले आहे तरी काय ? तुम्ही भलतेच काहीतरी बोलत आहात. चोरीत अशी काय जादू आहे की ती चहाडीपेक्षा श्रेष्ठ ठरावी ? "

तो म्हणाला, " सांगतो ऐका, चोर आपल्या दंडाच्या बळावर पोट भरतात, तर चुगली करणारा मूर्ख भाकड-कथा सांगतो, पण त्याच्या पदरात काहीत पडत नाही. "

* * *

मी बगदाद येथील निजामिया मद्रशामध्ये[११२] शिकत असताना मला शिष्यवृत्ती मिळे. त्या ठिकाणी अहोरात्र अध्ययन, अध्यापन, चर्चा, चालत. मी एकदा माझ्या शिक्षकांना म्हणालो, "हजरत ! अमका माझ्याशी असूयेने वागतो. मी जेव्हा धर्मशास्त्र, मुहमंद पैगंबराचा बोध अशा विषयावर बोलतो तेव्हा त्या दुष्टाचा जळफळाट सुरू होतो. " मद्रशाच्या प्राचार्यांनी माझे गाऱ्हाणे ऐकले आणि ते रागाने

म्हणाले, "नवल आहे बुवा ! तुला दोस्ताची असूया पसंत नाही म्हणतोस ! पण चुगली करणे चांगले असे तुला कोणी सांगितले रे ? त्याने आपल्या नीचपणाने नरकाची वाट धरली असेल! पण चुगली करून तू पण त्याच वाटेने चालला आहेस!"

* * *

कोणीएक म्हणाला, "हजाज[११३] बिन युसुफ हा मोठा जुलमी आहे ! त्याचे अंत:करण कठोर आहे. त्याला प्रजेचे नि:श्वास क:पदार्थ वाटतात ! देवा त्याच्या हातातून सत्ता काढून घे."

त्या मनुष्याला एका वयस्कर माणसाने पोक्त सल्ला दिला की, "कयामतीच्या-न्यायदानप्रसंगी त्याला त्याच्या छळवादाची शिक्षा फर्माविली जाईल आणि बाकीच्या लोकांना त्याचा द्वेष केल्याबद्दल अद्दल घडेल ! त्याच्याशी किंवा त्याच्या राजवटीशी तुझे काही कर्तव्य नाही. त्याचे दैव त्याला वठणीवर आणल्यावाचून राहणार नाही. त्याचा जुलूम तर मला नापसंत आहेच. पण तुझ्या चुगलीने माझा तुझ्याबद्दल ग्रह वाईट झाला आहे. हतभागी माणसाला त्याचा अपराध नरकाकडे नेतो. त्याचे वय वाढत असून त्याच्या कर्माच्या नोंदीत कृष्णकृत्यांची भर पडत जाते. चहाडखोरही अपराध्याच्या आधी जलद गतीने नरकाकडे जात असतो. बरे झाले ! नरकात गुन्हेगाराला त्याचा साथीदार भेटेल !"

* * *

एक साधू होता. तो एका सुंदर मुलाकडे पाहून हसला. दुसरा एक साधू त्याबद्दल कागाळी करू लागला. शेवटी ती गोष्ट सगळ्यांना समजली. तेव्हा एक ज्ञानी मनुष्य म्हणाला, "अडचणीत सापडलेल्या मित्राची अब्रू काढू नकोस. कारण गंमत म्हणून काही म्हटलेले अशिष्ट नव्हे, आणि चुगली करणे शिष्टसंमत नव्हे."

* * *

लहान असताना मला रमजान महिन्यात रोजे राखण्याचा फार मोठा शौक होता. गल्लीतील एक फकीर मला शुचिर्भूतता शिकवित होता, "प्रथम बिस्मिल्ला योग्य रीतीने म्हणावा. नंतर भावैक्य साधावे आणि शेवटी हात धुवावेत. नंतर नाक-तोंड तीनदा धुवावे. तर्जनीने नाक साफ करावे. अनामिकेने दात घासावे. कारण रमजानचा उपवास (जवाल) सुरू झाल्यावर काडीने दंतधावन करू नये. त्यानंतर तीन ओंजळी पाण्याने कपाळा-पासून हनुवटीपर्यंत तोंड धुवावे. त्यानंतर कोपरा-पर्यंत हात साफ करावेत. त्यानंतर सुभानअल्लाचा मंत्र म्हणावा आणि नामस्मरण करावे. पुन्हा हातपाय तोंड धुऊन खुदाचे नाव घ्यावे म्हणजे झाले. हे काम मी फार चांगले जाणतो. कारण तुला माहीत आहे की वयस्कर लोक अनुभवी असतात."

हे बोलणे गावच्या जुन्या पाटलाने ऐकले. तो ओरडला, "ए खवीस ! काय बडबड करतो आहेस ? रमजानच्या उपवासात काडीने दात कोरणे वर्ज असते हे

त्याला सांगितलेस ना? मग त्याला रमजानात मढे खाणे–म्हणजे चुगली करणे वाईट आहे हे का सांगितले नाहीस? रमजान महिन्यात खाणेपिणे सोडणाऱ्यांना सांगावे की अगोदर अवाच्य बोलणे सोडून द्या. बोलतेवेळी जर कोणाच्या नावाचा उल्लेख करावा लागला तर तो फार खुबीने करावा. तुम्ही जर उठता-बसता लोकांना गाढव म्हणू लागलात, तर लोकसुद्धा तुमचे नाव काही सन्मानपूर्वक घेणार नाहीत. माझ्या गल्लीबोळात जर माझ्या चालीरीतीबद्दल चर्चा कराल तेव्हा माझ्यासमोर जे काही बोलू शकाल तेच बोला. चारचौघात बोलायला तुम्हांला संकोच वाटतो ना? तुम्हाला स्वतःबद्दल शरम वाटत नाही म्हणूनच तुम्ही मजेत असता. लाज सोडून दिल्यावर माझ्या अपरोक्ष का बोलावे? "

* * *

काही कडक व्रताचारी एका निवांत ठिकाणी बसले होते. तेव्हा एकाने टीका करण्यास प्रारंभ केला. कोणा एका निरुपद्रवी माणसाची टिंगल करण्यास सुरुवात झाली. तेव्हा एकजण म्हणाला, "अहो महाशय, तुम्ही कधीतरी युरोप खंडात जाऊन धर्मयुद्ध केले आहे काय? " तेव्हा त्याने उत्तर दिले, "नाही, मी अद्याप गावाच्या वेशीबाहेर पाऊल ठेवले नाही." तेव्हा सात्विक दरवेष म्हणाला, "ज्याला पाहून काफर स्वस्थ बसतो आणि ज्याच्या बोलण्याच्या मर्माघाती वारांनी मुसलमान दुःखित होत नाही असा कोणी मनुष्य मी पाहिला नाही."

**मरगज** येथील एक वेडा काय छान बोलला! ते ऐकून आश्चर्याने तोंडात बोट घालावे! "मी जर कोणाची निंदा केली म्हणजे समजावे की माझ्या आईची चुगली केली. उत्तम देवभक्ती ही सत्फल देणारी असते. जो साथीदार साथ करीत नाही त्याच्या बाबतीत दोन गोष्टी वर्ज्य समजाव्यात. एक म्हणजे त्याची मालमत्ता अनधिकाराने घेऊ नये; दुसरे म्हणजे त्याची निंदा करू नये. जो दुसऱ्यांची निंदा करतो तो चांगले बोलेल अशी अपेक्षा करू नकोस. तो दुसऱ्यांबद्दल तुमच्याजवळ जसे बोलतो, तसेच तुमच्याबद्दल दुसऱ्यांच्या जवळ बोलेल. माझ्या दृष्टीने जो इतर बाबतीत लक्ष न घालता आपल्या कामात गुंतलेला असतो, तोच खरा शहाणा."

तीन प्रकारच्या माणसांबद्दल त्यांच्या मागे निंदा करण्यास हरकत नाही असे म्हणतात. इतरांबद्दल तसे करणे गैर होय. पहिला, बदनाम झालेला बादशहा जेव्हा प्रजेचे हाल करतो, तेव्हा त्याच्याबद्दल हकीकत सांगणे अनुचित नव्हे; कारण त्यापासून प्रजेला सावध राहता येते. दुसरा प्रकार निर्लज्ज माणसाचा. त्याचा कैवार घेऊ नका. तो स्वतःच आपले गुण प्रकट करतो. त्याचे दोष सांगणे हा काही अविचार नव्हे. कारण तो उघडया डोळ्यांनी खड्ड्यात पडणारा असतो. तिसरा, फसवे वजनमाप वापरणारा भामटा. त्याच्याबद्दल जेवढे माहीत असते तेवढेच बोलावे.

* * *

एकदा एक चोर जंगलातून येऊन सीस्तान शहराच्या वेशीवर आला. त्याला भूक लागली होती. आणि त्याने खाण्यासाठी दुकानातून काही जिन्नस विकत घेतले. मोबदल्यात दुकानदाराने त्याच्या सामानातून काही पैशाचे सामान काढून घेतले. त्यापायी चोराने गिल्ला केला. " देवा, तू चोराला आगीत जाळून टाक. कारण हा सीस्तानी भामटा दिवसाढवळ्या दरोडा घालतो."

*　　　　*　　　　*

एका सोज्वळ सुफी माणसाला एकाने म्हटले, " अमूक एक मनुष्य तुमच्याबद्दल काय म्हणाला माहीत आहे ? " सुफी म्हणाला, " पुरे ! सांगू नको ! तू आपला आराम कर ! दुष्मन काय म्हणतो ते न ऐकलेलेच बरे. खरे म्हणजे, जे लोक दुष्मनाचा निरोप सांगतात ते स्वत: वैऱ्यापेक्षा वाईट असतात. स्वत: शत्रुत्व करणारा असल्याशिवाय शत्रूचा निरोप कोणी आणणार नाही. मला कापरे भरावे अशी निंदा माझा शत्रूदेखील करू शकणार नाही. तू आपल्या तोंडाने तशी निंदा उच्चारतोस म्हणून तू शत्रूपेक्षा वाईट आहेस. दुष्मन निदान तुमच्या मागून बोलत असतो. चहाडी सांगणारा जुन्या खपल्या उकरून काढतो. आणि चांगल्या लोकांमध्ये भांडण लावून देतो. जो मित्र जुनी वैरे जागी करतो त्याला टाळावे ! एकीकडून दुसरीकडे चहाडी नेण्यापेक्षा काळोखात खड्ड्यात पडलेले पत्करले. दोघांमध्ये भांडण लावून देणारा चहाडखोर आगीत तेल टाकणारा असतो.

## चतुर वजिराची गोष्ट

चक्रवर्ती फरीदूनचा एक आवडता वजीर होता. तो हुशार आणि दूरदर्शी होता. सर्वांत मुख्य गोष्ट म्हणजे तो भाविक होता. हीन अधिकारी प्रजापीडक असतो आणि राजकोष भरण्याची आणि उत्तम कारभार करण्याची उत्तम पद्धत म्हणजे, प्रजेची पिळणूक असा त्याचा ग्रह झालेला असतो. जर तुझे देवाकडे दुर्लक्ष झाले तर तुला राजाकरवी प्रायश्चित्त मिळेल. भल्यापहाटे एकजण फरीदून बादशहाकडे गेला आणि म्हणाला, " खुदावंतांचा विजय असो ! माझा कोणताही मतलब नाही, पण एक गुप्त गोष्ट ऐकून घ्यावी. आपला वजीर आपला छुपा शत्रू आहे. लष्करात तर त्याच्याकडून कर्ज न घेतलेला शिपाई किंवा अधिकारी सापडावयाचा नाही. त्याने अशी अट घातली आहे की महावैभवशाली सम्राट निधन पावल्यावरच ते कर्ज फेडावे. त्या स्वार्थी मनुष्याला आपण नको आहात. कारण त्याला आपले पैसे बुडतील अशी चिंता वाटते."

एकदा बादशहाने वजिराकडे कठोर नजरेने पाहिले आणि विचारले, " दिसावयास तू माझा मित्र आहेस, परंतु आतल्या आत माझा द्वेष का करतोस ? "

वजिराने सिंहासनासमोरील जमिनीचे चुंबन घेऊन आदबीने उत्तर दिले, " आपण विचारलेच म्हणून सांगणे प्राप्त आहे. माझी उत्कट इच्छा अशी आहे की

खुदावंतांची प्रजा धन्याची कल्याणचिंतक असावी. आपण म्हणता की मी आपल्या मरणाच्या अटीवर कर्ज दिले आहे. याचा अर्थ असा होतो की आपल्याला दीर्घायुष्य लाभावे म्हणून या लोकांनी प्रार्थना करावी. कारण त्यांना कर्ज फेडणे नको असते. खुदावंतांना लोकांनी माझ्या जुलमाला भिऊन आपल्या दीर्घायुष्यासाठी आणि भर-भराटीसाठी मनापासून प्रार्थना करू नये असे वाटते काय ? लोक देवाला का आळवतात ? त्याने संकटाच्या शरसंधानापासून आपले संरक्षण करावे म्हणून ! "

बादशहाला वजिराचा युक्तिवाद एकदम पटला. त्याचा चेहरा लगेच फुलासारखा उमलला. त्या वजिराचा मान आणि पदवी त्याने वाढवून दिली.

चहाडखोरासारखा नतद्रष्ट दुसरा कोणीच नसतो. त्याचे दैव आंधळे असते. त्याची वाटचाल अधोगतीकडे जाते. तो मूर्खपणाने दोघा मित्रांमध्ये वितुष्ट निर्माण करतो. ते दोघे कधीकाळी एक होतीलच. तेव्हा मात्र ह्या करंट्याला लाजेने मान खाली घालावी लागेल. दोघा मित्रांमध्ये आग लावणे म्हणजे शहाणपणा नसून आत्मदहन होय.

ज्याने ' सादी ' प्रमाणे मौनाचे सुख अनुभवले आहे, तो इहपराबद्दल वायफळ गप्पा कधीच मारीत नसतो. जे तुम्हांला हितकारक वाटते, ते लोकांना आवडो किंवा न आवडो, बोलून टाका. त्यामुळे मरणोत्तर कयामतीच्या न्यायदानप्रसंगी एखाद्याला तरी हितवादाची उपेक्षा केल्याबद्दल खंत वाटेल.

## पत्नी कशी असावी ?

सुस्वभावी आणि सुंदर स्त्री देवभोळ्या आणि गरीब पतीला राजा करून टाकते. तुझ्या बाहुपाशात मनपसंत बायको असेल तर बेट्या जा, आपले घर गुढी-तोरणांनी सुशोभित कर ! रात्रीच्या वेळी सुखदुःखाची वाटेकरीण सोबतीला लाभत असेल, तर दिवसभर काबाडकष्ट करण्याची क्षिती वाटणार नाही. आपली सुंदर पत्नी पडदा पाळत असेल, तर नवऱ्याला स्वर्ग दोन बोटे उणा वाटेल. ज्याची मनोरमा पतीशी एकरूप झाली आहे, तो या जगी धन्य आणि यशस्वी होय ! तुझी बायको संयमी, मनमिळाऊ आणि मधुरभाषिणी असेल, तर तिच्या रंगरूपाबद्दलच्या उणिवां-बद्दल दुर्लक्ष कर. मनाला शांतता आणि समाधान देणारी गमत्या स्वभावाची बायको सुंदर बायकोपेक्षा बरी; कारण तिच्या सहनशीलपणामुळे आणि नवऱ्याबद्दलच्या आपुलकीमुळे नवऱ्याच्या कित्येक दोषांवर पांघरूण पडते. ती आपल्या नवऱ्याने आणलेली चिचदेखील सफरचंदाच्या गोडीने खाईल. नवऱ्याने आंबट तोंड केले तर ती मजेने हलवा खाणार नाही. अप्सरेसारख्या पण बदचालीच्या बायकोपेक्षा दिसायला ओबडधोबड पण सुस्वभावी पत्नी सरस होय. जर कावळ्याला पोपटाबरोबर पिंजऱ्यात सहवास घडेल तर कावळा पिंजऱ्यातून निसटून जाणेच सुखाचे समजेल.

बदचाल बायकोला कंटाळून रानोमाळ भटकत राहा, किंवा असहाय होऊन

वाट्याला आलेले दुःख सहन कर. घरी जाऊन कपाळावरील आठ्या पाहावयाला लागण्यापेक्षा न्यायाधीशाने ठोठावलेला कारावास पत्करला.

ज्याच्या घरात बायको वाईट असते, त्या घरधन्याला देशाटन म्हणजे मोठा सण वाटतो.

ज्या घरात बायकोचा वैताग असह्य होतो ते घर आनंदाला मुकले आहे असे समज.

जर बायको घर सोडून बाजाराचा रस्ता धरील तर तिला ठार कर. नाही तर तूच बाई होऊन राहावेस हे बरे !

तुला अज्ञानी आणि खोटारडी बायको लाभली असेल तर तू बायको न शोधता आपल्यासाठी झकास एक ब्याद शोधून काढलीस असे म्हणावे लागेल.

ज्याला मनाने आणि कर्तृत्वाने अनुरूप बायको लाभते त्याच्यावर भगवंताची मर्जी आहे असे समज.

ज्याची बायको परपुरुषाशी हसत बागडत असते, त्याला सांग की नवरेपणाचा टेंभा मिरवू नकोस. चवचाल बाईने चाळे आरंभिले तर तिला आपल्या नवऱ्याचा चेहरा काळाकुट्ट करण्यास सांगावे. परपुरुषाशी वागताना बायको आंधळी आहे असे वाटावे.

तिने घरातून बाहेर पडावे ते थेट कबरीत जाण्यासाठीच होय. बायकोचा पाय घरात टिकत नसेल तर गप्प बसणे शहाणपणाचे नव्हे. तिच्यापासून होणारी मानहानी सहन करीत जगण्यापेक्षा सुसरीच्या तोंडात प्रवेश करणेच अधिक बरे ! परपुरुषाशी पडदा पाळण्यासाठी आग्रह धर, नाही तर ती कसली बायको आणि तू कसला नवरा ! सुंदर[११४] आणि सुस्वभावी भार्यासुद्धा शत्रूप्रमाणे संकटे आणणारी असते. तेव्हा कुरूप आणि प्रतिकूल बायकोबद्दल बोलणे नको.

बायकोला कंटाळलेल्या दोघाजणांनी काय मजेदार मते प्रकट केली पाहा ! एकजण म्हणाला, "वाईट बायकोशी जीवित कंठणे कोणाच्याही नशिबी न येवो." दुसरा म्हणाला, "या जगात बायको म्हणून कोणी प्राणी राहू नये."

बेट्या, वर्षावर्षाला बायको बदल ! गुदस्ताचे पंचांग कुचकामी असते. बोचणारा जोडा वापरण्यापेक्षा अनवाणी चालणे बरे. घरातील भांडणापेक्षा प्रवासातील यातना परवडल्या हो ! असे म्हणतात की, बायका चंचल, हुकुमशाही गाजविणाऱ्या आणि मगरूर असतात. तरीदेखील मिठीत मात्र त्या मधुरच वाटतात. जर कोणी बाईलवेडा भेटला, तर 'सादी' तू त्याला टोमणे मारू नकोस. तू देखील फाजील बायकोचीताबेदारी करतोस आणि दुःख गिळतोस, पण थोड्याच वेळात तिला बाहुपाशात घेतोस.

* * *

एक तरुण माणूस आपली बायको भांडकुदळ असल्याबद्दल एका वृद्ध माणसापाशी तक्रार करीत होता.

"ही दुष्ट कैदाशीण आहे, तिचा छळ मला सोसवत नाही, माझे जीवन म्हणजे तिच्या ओझ्याखाली जात्याच्या तळीप्रमाणे झाले आहे."

तो वृद्ध म्हणाला, " बाबा वैतागू नकोस. जरा धीर धर. जरा सहनशील झाल्याने कोणाची मानहानी होत नाही. तू बायकोच्या ओझ्याखाली जात्याच्या तळीप्रमाणे कष्टी असशीलच. पण रात्रीच्या वेळी मात्र तू जात्याचे पेड बनतोस त्याचे काय ? दिवसा जात्याची तळी झालास म्हणून कोठे बिघडले ? "

गुलाबाचे रोप पाहून तुम्हांला आनंद होतो ना ? झाले तर ! त्याच्या काटयांची तक्रार कशाला करावयाची ? ज्या झाडाचे फळ आम्ही सदैव चाखतो, त्याचे काटे पण सहन केले पाहिजेत !

## बोधवचन : मुलाबाळांचे संगोपन

मुलगा दहा वर्षांचा झाल्यावर त्याच्यावर डोळा ठेवणाऱ्यांना म्हणावे, "खबरदार ! कापसाजवळ शेकोटी पेटवू नये. कारण त्यामुळे घरच जळून खाक होते." तुला जर सत्कीर्ती हवी असेल, तर तू आपल्या मुलाला जप. आणि त्याला बुद्धिमान आणि सुशिक्षित कर. जर विद्या आणि बुद्धी अर्धवट असतील तर सारेच मुसळ केरात ! तू मरून जाशील आणि तुझा काहीच मागमूस राहणार नाही. ज्याला बापाने कोडकौतुकाने पाळले असेल, त्याला जीवन मोठे कठीण वाटेल. त्याला मोठा करताना संयम आणि पोक्तपणाचे बाळकडू दिले पाहिजे. तो लहान असताना धाक आणि खरडपट्टीच्या योगाने त्यास ताळयावर आण. चांगल्याबद्दल संकल्प, वाईटा-बद्दल त्याग, यांची चांगली शिकवण दे. लहान मुलांना चुचकारणे आणि शाबासकी देणे हे फटकारणे आणि धाक दाखविणे यापेक्षा चांगले. ज्याचे तुम्ही पालन करता त्याला काबाडकष्ट करण्यास उद्युक्त करा. आणि जरी तुमच्यापाशी कारून कुबेराची संपत्ती असली, तरी तुमच्या मुलाला मेहनतीची कामे करावयास शिकवा.

आपली संपत्ती आणि अधिकार यास फार महत्त्व देऊ नका; कारण संपदा "चपलचरणा" असते.

मुलाला दिलेले चांदी सोने केव्हाच संपते. पण कारागिरीची पैशाची पेटी कधी रिकामी होत नाही. नशीब तुझ्या पोराला आयुष्यभर परदेशवास घडवील याची तुला कल्पना असू दे. ज्याच्या अंगी विद्या असेल तो कशाला दुसऱ्यांकडे हात पसरील ?

"सादी", हे वैभव कसे मिळाले हे तुला ठाऊक नाही. रानावनात हिंडण्याने आणि सातासमुद्राची मुशाफरी करण्याने नव्हे. त्याच्या लहानपणी त्याला वडिलांच्या हातून खमंग छडीचा चोप मिळत असे आणि नंतर अल्लाहने त्यास मोठेपण बहाल केले. आज्ञाधारक मनुष्य अल्पावधीतच सर्वाधिकारी बनतो. ज्या मुलाला मास्तरांचा मार लाभत नाही, त्याला लोकांच्या लाथा खाव्या लागतात.

मुलाची चांगली जोपासना करा आणि त्यांना सुखसोयी उपलब्ध करून द्या. कारण त्यांमुळे त्यास दुसऱ्यांच्या तोंडाकडे पाहावे लागणार नाही.

ज्याला मुलांचा काहीच त्रास भोगावा लागला नाही, त्याच्या मुलांचा त्रास दुसऱ्यांना भोगावा लागतो. आणि तो मुलगा उनाड निघतो. त्याला वाइटांची संगत घडता कामा नये. कारण ते करंटे त्यास तात्काळ आपल्यासारखे करून टाकतील. ज्या मुलाचे तोंड दाढीमिशी फुटण्यापूर्वीच (पुं मैथुनाने) काळे होते, त्या पंढापेक्षा अधिक गुन्हेगार कोणीच नाही.

ज्या निर्लज्ज नपुंसकामुळे घराण्यालाच कलंक लागतो त्याचा संपर्क संपूर्ण टाळावा. दारुड्यांच्या सहवासात आढळणाऱ्या मुलाच्या वडिलास त्याच्या प्रगतीवर पाणी सोडण्यास सांगावे. तो जर मेला किंवा विनाश पावला तर त्याचा खेद मानू नका.

* * *

एके दिवशी आमच्या गल्लीत एक मोठा भोजनसमारंभ चालू होता. तेथे सर्व प्रकारचे लोक जमले होते. गाण्याची मैफल सुरू होताच लोकांचा "हाय" "हुई" असा आवाज आकाशास जाऊन भिडला. माझा एक मित्र गोंडस पोऱ्या होता. त्याला म्हटले, "ए! बाहुली! त्या तरुण मंडळीत मिसळत का नाहीस? तू मैफलीत सामील झालास तर तिला झकास रंगत येईल बघ!"

त्या सुंदर यष्टीच्या पोऱ्याने मैफलीत जाता जाता म्हटले,

"मला अजून मिसुरडे फुटले नाही; तर आडदांड पुरुषात कसे बसावयाचे?"

## बालमैथुनापासून परावृत्त व्हावे

लवंड्यांच्या नादी लागू नका. तो तुमच्या घरादाराचे वाटोळं करील. घरी जा आणि लग्न करून सुखी व्हा! ज्या फुलावर रोज सकाळी एकेक बुलबुल बसतो त्याच्याशी कामक्रीडा करण्याची इच्छा बाळगू नये. जो प्रत्येक मैफलीची 'शमा' (दीपक) असतो, त्याच्यासाठी तुम्ही पतंग बनू नये.

कोठे ती सुंदर सुस्वभावी अर्धांगी आणि कोठे हा उर्मट लवंडा!

झाली तेवढी शोभा पुरे झाली. आता माझ्यात लवभर अक्कल शिल्लक असेल तर मी तंगतुर्कान [१०६] मुक्कामी जाऊ नये हेच खरे. एक तर अधर्मी बनविणाऱ्या कामवासनेला मज्जाव करावा, नाहीतर आषक होऊन मापुकाकडून लाथाबुक्या खावयाला तयार व्हावे.

तू जर गुलामाची खरेदी केलीस तर आपला मान राखून त्याचे पालनपोषण करावेस आणि त्याच्याकडून भरपूर कामे करवून घ्यावीत. जो धनी गुलामाच्या ओठांना दात लावतो, त्याच्यावर गुलाम सत्ता गाजवावयाला लागतो. नोकराचे काम पाणी ओढणे आणि दगड फोडणे असे असावे. त्याला गोंजारून लाडावले तर तो थोबाड फोडतो.

रूपशाली सावज दृष्टीस पडताच तिला आशाळभूतपणाने हाताळण्याचा प्रयत्न केला तर यश मिळेलच अशी खात्री देता येत नाही. तिला पुष्पकलिकेसारखी प्रीतीची हळुवार फुंकर घालावी म्हणजे ती फुलासारखी फुलून हसत तुमच्या मागे लागेल.

त्याउलट लफंगा लवंडा निर्लज्ज आणि चंचल असतो. कवठाप्रमाणे तो दगड मारल्यानेही झाडावरून खाली पडणार नाही. त्याला स्वर्गातील अप्सरा मानून जिभल्या चाटत त्याच्याकडे पाहू नका. कारण भयाण जंगलासारखे त्याचे दुसरेही एक तोंड असते. तुम्ही त्याच्या पाया पडाल तर तो तुमची काहीच किंमत ठेवणार नाही. तुम्ही लीनता दाखविली, तरी तो तुम्हांला कधी शाबासकी देणार नाही.

जर तू कोणा मुलावर डोळा ठेवशील तर आपल्या डोक्यातून भेजा आणि कनवटीतून पैसा काढून फेक.

तुम्ही जर दुसऱ्यांच्या मुलावर वाईट नजर ठेवाल, तर त्यामुळे तुमच्या मुलाला बिघडवाल.

या आमच्या शिराज शहरातच एकदा असे झाले की एका व्यापाऱ्याने एक गुलाम विकत घेतला. त्याचे गाल गुबगुबीत होते आणि तो चित्तहरण करणारा होता. रात्रीच्या वेळी त्याचा हात त्याच्या नितंबावर जाताच त्या मुलाने चेकाळून त्या नादान धन्याच्या डोक्यावर आणि हातापायावर हाणले. धन्याने खुदा आणि पैगंबरांची शपथ घेऊन 'पुढे तसला फाजीलपणा करणार नाही' असे सांगितले.

त्याच आठवड्यात त्याला आपला मुक्काम हलवावा लागला. त्याचे मन विषण्ण झाले होते. डोक्यावर आणि हातापायावर जखमा झाल्यामुळे पट्ट्या बांधलेल्या होत्या. प्रवासात त्याला एक मोठा डोंगर लागला. तेथे असलेल्या काफिल्यापैकी एकाला त्याने 'त्या पर्वतशिखराचे नाव काय' असे विचारले! माणूस फार दिवस जगला तर त्याला काय काय नवीन गोष्टी पाहाव्या लागतात म्हणता!

काफिल्यातील एकाने त्यास सांगितले, "याला तंगतुर्कान[११५] म्हणतात. येथील लोक फार देखणे असतात. तुम्हांला माहीत नाही वाटते?"

लगेच त्या व्यापाऱ्याने त्या गुलामाला सामान खाली उतरविण्यास सांगितले.

* * *

साधुसंतांची एक जमात देखण्या पोरांच्या सहवासात आढळते. ते मारे बाता मारत असतात, "आम्ही संयमी आहोत. आमच्या मनात कसलेही पाप नसते. आम्हांस दिव्य ज्ञान प्राप्त झाले आहे."

अरे थेरड्या! माझे ऐक. जो उपवास करतो, तो पंगतीत बसला तर त्याच्या तोंडाला पाणी सुटणारच! शेळी खजुराच्या बियाच का खाते? कारण मालक खजूर पेटीत बंद करून ठेवतो म्हणून. घाण्याच्या बैलाचे तोंड चाऱ्यातच का नसते? तर घाण्याची दावणी आखूड असते, आणि त्याच्यापर्यंत त्याचे तोंड पोचत नाही म्हणून.

## साधू आणि बुकरात

एकाने एक देखणा पोऱ्या पाहिला. प्रेमातिशयाने त्याची कळाच बदलून गेली. वैशाख मासात पानाफुलांवर पडणाऱ्या दवासारखा त्याच्या अंगाला दरदरून घाम सुटला.

सुप्रसिद्ध हकीम बुकरात (हिपोक्रिटस) त्याच वाटेने चालला होता. त्याने 'त्या माणसाला काय झाले आहे' म्हणून तेथील लोकांना विचारले. त्याला एकाने उत्तर दिले, "हा एक संयमी साधू आहे, दिवसरात्र हा रानोमाळ भटकत असतो. त्याला माणसांचा सहवास आवडत नाही. गर्दी दिसली की हा पळ काढतो. एका देखण्या पोराने त्याचे मन पळवून नेले आहे. त्याची नजर त्याच्या रूपकर्दमात रुतली आहे. त्याला लोक छी: थू: करतात हे कळल्यावर त्याने लोकांना विनविले, "जरा अपशब्द थांबवा. मी रडतो म्हणून मला खंत वाटत नाही असे समजू नका. मी जाणून बुजूनच हळहळत आहे. हे रूपवान चित्र माझे मन खेचते असे समजू नका. खरे म्हणजे या सुंदर प्रतिमेच्या शिल्पकाराने — भगवंताने — माझे मन चोरले आहे."

अनुभवी बुकरात हे ऐकत होता. त्या ज्ञानी वृद्धाने त्या आसक्त साधूची मखलाशी ऐकून म्हटले, "समजा तो जे म्हणतो ते खरे आहे, म्हणजे त्याचा जीव देखण्या पोरावर नसून त्याला घडविणाऱ्या परमेश्वरावर आहे. त्याचे हे म्हणणे कोणासही पटणार नाही. कारण त्या शिल्प्याने या साधूचे चित्त चोरणारी ती एकच प्रतिमा घडविली नाही. देव रूपवान मुले निर्माण करतो हे खरे आहे. पण नुकतेच जन्माला आलेले बाळही देखणे असतेच की! मग ते का याचे मन मोहून टाकीत नाही? देवाचे शिल्पच पाहावयाचे असले तर मूर्ती लहान असली काय अन् मोठी असली काय? जो खरा ज्ञानी आहे त्याला देवाची कला चिनी सुंदरीला पाहून जितकी गोचर होते तितकीच एखादा उंट पाहूनही प्रत्ययास येते."

माझ्या (सादीच्या) ग्रंथातील ओळ न् ओळ म्हणजे सुंदर चेहऱ्यावर घातलेला बुरखाच होय. या काळ्या अक्षराखाली जो अर्थ दडला आहे तो पडदानशीन सुंदरीसारखा किंवा ढगातील चंद्रासारखा आहे. "सादी" कधी लावण्याला हपापलेला नाही. कारण त्याच्या पदरी पडद्यातील सुंदरींचा भरणा आहे. माझ्या वाणीने मैफलीला रंग भरत असल्यामुळे ज्वालेप्रमाणे ती दीप्ती आणि दाह या गुणांनी नटलेली आहे. माझ्या वैऱ्यांनी खुशाल माझी निंदा करावी. त्यांच्या मत्सराचे मला काहीच वाटत नाही. ते पारशी[११६] (हिव) तापाने पछाडलेले आहेत झाले!

## संसारी लोकांचे मत न मानण्याविषयी

जो जगराहटीपासून वेगळे जीवन जगतो, त्याने लोकमताचा अव्हेर केला आहे असे समजावे. या जगात निंदक कोणाचीच गय करीत नाही. साव आणि चोर दोघांनाही नावे ठेवली जातात. जर कोणी देवदूताप्रमाणे आकाशातून उड्डाण करील, तर त्याच्या

भोंदुगिरीची टीका होईल. युफ्रेटीस नदीला देखील समोरून अडविता येईल. पण निंदकाची इवलीशी जीभ आवरता येत नाही. जर बदमाशांची टोळी जमा होऊन बसली असेल, तर ते म्हणतील, " पाहा, ही वांझोटी भक्ती आणि ही पोट जाळण्याची शक्कल. "

तू मात्र देवाच्या प्रार्थनेपासून पाठ फिरवू नकोस म्हणजे ते देखील तुझ्या वाटेला येणार नाहीत. जर पवित्र भगवान तुझ्यावर प्रसन्न झाला तर इतरेजनांना तू नापसंत असलास तरी काही बिघडणार नाही. मूढ जानपद देवाच्या गोष्टी जाणत नाहीत. त्यांच्या गोंगाटाकडे दुर्लक्ष करून तू देवाच्या मार्गाला लाग. पापी लोक तुझ्या वाटेने प्रवास करीत नाहीत. त्याचे कारण म्हणजे त्यांचे पहिलेच पाऊल चुकीचे पडलेले असते.

दोन प्रकारचे लोक एकाच गोष्टीबद्दल कान लावून ऐकत असतात. एक सैतानी स्वभावाचा माणूस आणि दुसरा पैगंबर.

एक अनाचार करतो : आणि दुसरा अक्कल शिकतो. पहिल्याचे दोष दाखवून दिले, तरी तो सन्मार्गाची कास धरत नाही. जमशेद बादशाहाचा पेला विश्वदर्शन घडवीत असे, पण प्रकाशातच. काळोखात त्याचा काही उपयोग होत नसे.

तुम्ही वाघ असाल तर लोक तुमच्या शौर्याची टीका करतील. कोल्हा असाल तर निंदक तुमच्या कावेबाजपणाची टर उडवतील. कोणी एखादा एकांतप्रेमी असेल किंवा लोकांत मिसळून वागत नसेल तर ते म्हणतील, " काय हा दुढ्ढाचार्य ! बेटा लोकांना टाळतो ! लोक म्हणजे काय सैतान आहेत काय ? " बरे कोणी हसतमुख असेल किंवा मनमिळाऊ असेल, तर त्याला विशुद्धाचरणी आणि संयमी म्हणून कोणी ओळखणार नाहीत.

कोणी श्रीमंत असेल तर त्याला चिक्कू मारवाडी म्हणून नावे ठेवतील. कोणी विरक्त फकीर असेल, तर त्याला कर्मदरिद्री म्हणून टाकून बोलतील. कोणी विजयी वीर हरला म्हणजे त्यांना हर्षवायू होतो. आणि ते देवाचे नवस फेडतात. ते म्हणतील, " किती दिवस पीडा टाळू शकाल ! सुखानंतर दुःख यावयाचेच. " जर कोणी कमी ऐपतीचा मनुष्य नशिबाच्या फेऱ्याने उच्चपदावर चढेल तर ते दातओठ खात मत्सराने म्हणतील, " काय दैव तरी आंधळे पाहा ! ह्या नालायकाचा भाव त्याने वाढवला ! "

तुझा कारभार व्यवस्थित चालला असेल, तर तुला लोभी आणि महत्त्वाकांक्षी म्हणतील. जपून वागत असशील, तर म्हणतील, " काय पण फाटका फकीर आहे ! " तू करारी स्वभावाचा असशील, तर तुला छळवादी म्हणतील. आणि मुखदुर्बळ असशील तर म्हणतील, " पाणी तापविण्याचा शुद्ध बंब आहे पाहा." सहनशील माणसाला कधी कोणी शूर म्हणणार नाही. उलट शेपूट घालून पळणारा म्हणतील. जर कोणी असामान्य हिम्मतवान असेल, तर त्याला सर्व वेड्यात काढतील. कोणी मिताहारी असेल तर

टोमणे मारतील, " कोणासाठी हो तुम्ही पैसा ठेवीत आहात?" त्याचा आहार चांगला असेल तर त्याला खादाड आणि चैनबाज म्हणून हिणवतील. जर कोणी श्रीमंत मनुष्य साधेपणाने राहू लागेल आणि छानछोकी ही प्रतिष्ठावंताना शोभत नाही असे त्याचे मत असेल, तर त्याच्यावर टीकेचा भडिमार होत राहील : " पाहा, हा करंटा पैसा कसा पुरून ठेवतो आहे " याउलट त्याने आपला दिवाणखाना उत्तम रीतीने सजविला आणि तो उंची वस्त्रे परिधान करू लागला तर त्याला लोकांची बोलणी खाणे नकोसे होईल. " पाहा कसा बायकोप्रमाणे नटतो मुरडतो आहे. "

फकीर जर तीर्थयात्रेला गेला नाही तर तीर्थयात्रा करून आलेले लोक गाव सोडून न हलल्याबद्दल त्याचा जीव खातात आणि म्हणतात, " पाहा, कसा भेकड आहे तो ! याला यात्रेची ताकदच नाही. याला आपल्या बायकोला कवटाळून बसणे हवे असते ! त्याला काय विद्या आहे की मत आहे की काय आहे ? अत्यंत अनुभवी माणूससुद्धा निंदकांच्या हल्ल्यापासून सुटत नाही. हा काय ! बारा पिंपळावरचा मुंजा ! एक ना धड, भाराभर चिंध्या ! त्याला दैव अनुकूल असते तर तो असा देशोधडीस लागला नसता. "

जर कोणी लग्न न करता एकलकोंडा राहिला, तर त्याच्याकडे वक्रदृष्टी वळवून निंदक म्हणतात, " हा प्राणी खरा भूमीला भार झालेला आहे. " बरे, त्यातून त्याने लग्न केलेच तर म्हणतात, " पाहा, कसा आपल्याच करणीने गाढवासारखा चिखलात रुतला आहे. "

अशी आहे निंदकांची जात. त्यांच्या हातून कुरूप करंटाही सुटत नाही आणि देखणा मनुष्यही सहीसलामत राहू शकत नाही.

* * *

मी इजिप्तमध्ये असताना माझ्या पदरी एक देखणा गुलाम होता. तो फार लाजरा होता. केव्हाही त्याची मान खालीच असावयाची. एकजण म्हणाला, " हा मुलगा भोळसट आहे. त्याचे कान पिळून त्याला तरतरीत बनव. "

एकदा मी त्याची खूप हजेरी घेतली. लगेच तो उपदेशक म्हणाला, " पाहा कसा त्या गरीब प्राण्याचा प्राण घेत आहे तो ! "

तुला जर कोणी रागाच्या भरात असताना पाहिले तर ' संतापी ', ' अविचारी ' अशी विशेषणे तुला चिकटलीच म्हणून समज. याउलट तू जर कोणाशी अदबीने वागलास तर तुला लोचटच म्हणतील. दानशूराला उपदेशक येऊन सांगतील, " आता पुरे झाले. उद्या आपल्या पोटासाठी ठेवशील की नाही ? "

" बाप तसा बेटा. ढीग पैसा मिळविला आणि हाल करून घेऊन मेला. ह्याची गतही तीच होणार ! " लोकनिंदेपासून कोण सुटला आहे ? खुद्द पैगंबरांना देखील काय लोकांची बोलणी कमी खावी लागली ? ख्रिस्ती नसराण्यांनी त्यांना काय

टोमणे दिले माहीत आहे? म्हणे, हा पैगंबर सर्वशक्तिमान! पण याला साधे कुटुंब आणि मुलगासुद्धा नाही.

थोडक्यात काय कोणाचीही पगडी डोक्यावर राहात नाही, अशा परिस्थितीत गप्प बसण्यापलीकडे दुसरे काही करता येत नाही.

* * *

एक तरुण होता. त्याला बुद्धीचे पाठबळ चांगले होते. म्हणून तो परदेशांत बरेच पांडित्य गाजवीत होता. तो देवभोळा आणि सन्मान्य होता. एवढेच नव्हे तर त्याचे रूपलावण्य आणि हस्ताक्षरही वाखाणण्यासारखे होते. तो उत्तम वक्ता व व्याकरणशास्त्री होता. पण "श्रीगणेशा" तच अडखळावयाचा. मी एका सौजन्य-मूर्तीला म्हटले, "बिचाऱ्याला पुढचे दात नाहीत म्हणून असे होत असावे."

तो एकदम कावून ओरडला, "असली परोक्ष निंदा पुन्हा माझ्यासमोर कधी करू नकोस! त्याच्यात अनेक चांगले गुण असताना तुला नेमका हा एकच दोष का दिसला? तुला अंतिम न्यायदानाची जाणीव असू दे. सम्यक् दृष्टी असलेल्याने दोष कधी पाहू नयेत. शिकल्यासवरलेल्या आणि व्यासंगी माणसाचा उच्चार थोडा नीट झाला नाही तर काय बिघडले? साध्यासुध्या दोषापायी त्याच्यावर अन्याय करू नकोस! 'चांगले आहे तेवढेच घे.' असे थोरामोठ्यांनी सांगितलेलेच आहे. चांगले आणि वाईट एकत्र आढळतातच. फूल आणि काटे जवळ जवळ असतात, तेव्हा काटे सोडून फुलांचा हार करावा."

ज्याला केवळ वाईट तेवढेच पाहण्याची सवय असते, त्याला मोराचा पिसारा मुळीच दिसत नाही; पण त्याचे बारीक पाय तेवढेच दिसतात. चांगले तेवढे ग्रहण करण्याची सवय ठेव. बाळा, आरसा गंजला असेल तर त्यात रूप कसे दिसणार?

युक्तीने बोल आणि निंदा टाळ. कोणाच्याही दोषाचा उच्चार करू नकोस. वेड्या! लोकांचे दोष काय पाहतोस! आपले दोष ध्यानात येताच तुला मान खाली घालावी लागेल. दोषी लोकांच्या उठाठेवी मला कशाला? मला स्वतःला माझी ओळख पटेल, तर मी दोषीच ठरेन. जर तू स्वतःला दोषी करतोस तर दुसऱ्यांना नावे ठेवण्यात काय हशील आहे? तुझ्या परीने तुला निंदा गैर वाटत असेल, तर ती टाळच. पण साक्षीदारालाही तसेच करण्यास सांग. मी देवभक्त असेन किंवा भोंदू असेन, बाह्यात्कारी माझा तुझ्याशी संबंध आहे आणि मनात देवाशी संबंध आहे. जर मी शुचिर्भूतपणा दाखविला, तर मला नावे ठेवू नकोस.

मी चांगला आणि वाईट कसाही असलो, तरी तू काही बोलू नकोस! कारण चांगले किंवा वाईट परिणाम मलाच भोगावे लागणार आहेत. माझी वागणूक चांगली किंवा वाईट असेल, तर देव तिचे मर्म तुझ्यापेक्षा चांगले ओळखील.

तू माझ्या चुकांपायी माझे धिडवडे काढतोस, त्याअर्थी माझ्या सत्कृत्यांची तू तारीफ करशील असे मी समजणार नाही. सदाचारी माणसाच्या एका सत्कृत्याबद्दल देव दहा सत्कृत्ये नोंदून घेतो. तूदेखील जर कोणाचा एखादा सद्‌गुण पाहिलास, तर त्याच्या दहा दोषांवर पांघरूण घाल. दुसऱ्याच्या एखाद्या दोषाबद्दल आकाश-पाताळ एक करू नकोस आणि त्या माणसातील अनेक सद्‌गुणांना कमी लेखू नकोस. तू सादीच्या शत्रूप्रमाणे आपल्या पोटातील किल्मिषामुळे सादीच्या वाणीची निंदा करतोस. त्यातील शंभर अलौकिक गोष्टींकडे तू लक्ष देत नाहीस. त्याच्या एकाच दोषाची टिंगल करतोस. माझ्या टीकाकारांमध्ये दुसरा कोणताच दोष नाही. फक्त मत्सरामुळे त्यांचा गुणग्राहकतेचा डोळा फुटला आहे.

दयाघन देवानेही सृष्टी किती सदोष रचली आहे पाहा. तीत काळा, गोरा, वाईट, चांगला असे भेद आढळत नाहीत का ? तुम्ही जे जे पाहता ते चांगले असलेच पाहिजे असे नाही. तुम्ही मात्र पिस्त्याचे बी घ्या आणि सालपटे टाकून द्या.

□ □ □

अध्याय ८

# कृतज्ञता

मी माझ्या मित्रा (देवा)च्या उपकाराचा उच्चारदेखील करू शकत नाही. त्याची योग्यता पाहिल्यावर त्याच्या कोणत्या कृत्याला उपकार म्हणावे हे कळत नाही. माझ्या देहावरील केसन् केसांतून त्याचे उपकार दिसतात. मग माझ्या रोमरोमातून मी कृतज्ञता कशी व्यक्त करू ? परमेश्वराची पहिली प्रशस्ती ही की त्याने मला, ' असत् ' मधून सत्यसृष्टीत जन्मास घातले. त्याची स्तुती करण्याएवढी प्रज्ञा कोणास आहे ? त्याचे गुण जसे अगणित आहेत तसेच त्याचे उपकारही अनंत आहेत. ईश्वर महान कारागीर आहे. तो मातीतून मानवमूर्ती बनवितो व तीत आत्मा, चेतना आणि भावना यांचे बीजारोपण करतो. तू बापाच्या वृषणात असल्यापासून तो म्हातारा होईपर्यंत तुझ्यावर त्याने किती प्रकारे उपकार केले आहेत, याचा विचार कर. त्याने तुला पवित्र घडविला आहे म्हणून तूही पवित्र आणि सदाचारी हो. कारण, शुचिर्भूत माणसाने घाणीत पाय ठेवणे वाईट. आरशावर साठलेली धूळ सतत पुसावी. कारण तो गंजल्यावर कोणत्याही उपायाने ती घाण दूर करता येत नाही. तू पूर्वी शुक्रबिंदू नव्हतास काय ? तू शूर असशील, तर तुझ्या डोक्यातून मस्ती घालवून दे. तुला आपल्या मेहनतीनेच भाकर मिळत असली तरी आपल्या दंडावर फार भरवसा ठेवू नकोस. अहंकारी मानवा ! तू सत्य का समजून घेत नाहीस ? काम करण्यासाठी हाताला चालना देणारा परमेश्वराशिवाय आणखी कोण आहे ? तुझ्या श्रमामुळे काही चांगले घडत असेल, तर ते देवाने तुला तशी बुद्धी दिली म्हणून घडते, तुझ्या प्रयत्नामुळे नव्हे. म्हणून तू विजयी ठरलास, तर भगवंताचे आभार मान. आपल्या शक्तीवर अवलंबून तुला एक पाऊलही पुढे टाकता येणार नाही. क्षणोक्षणी अज्ञातातून मदत होत असते. आईच्या उदरात असताना मानवाला वाचा असते काय ? तरी त्याला नाभीद्वारे पोषण मिळतच असते. त्याची नाळ तुटल्याबरोबर त्याचे पोषण बंद होताच आपोआप मातृस्तन-परिग्रह घडतोच. प्रवासी जेव्हा आजारी पडतो, तेव्हा त्याच्या औषधात त्याच्या गावचेच पाणी देतात. बाळाचे पोषण होते पोटात. नाळेतून त्याला आहार मिळतो. बाळ जन्मल्यावर त्याला मातृस्तनाची ओढ लागते. पुढे त्याचे पोषण या कारंज्यातून होते.

आईची कूस म्हणजे स्वर्ग आणि त्यातील अमृत-सरिता म्हणजे मातृस्तन. आईचा देह हा जिवाच्या फळाचे झाड होय. तिच्या कडेवरील गोजिरवाणे बाळ म्हणजे रसाळ गोमटे फळच.

स्तनाच्या शिरा हृदयात असतात ना ! मग दूध म्हणजे काळिजातील रक्तच

नव्हे का ? तूच सांग. त्या रक्तातच बाळाच्या दातांचा दंश घडतो. तरी तो रक्त-पिपासू तान्हाच आईचा परमानंद असतो. दंड बळकट झाल्यावर आणि सर्व दात आल्यावर मात्र धात्री आपल्या स्तनावर इंद्रावण चोळते. ते कवंडल दुधाची धार अटकावते आणि मुलाला प्रिय पयोधराचा विसर पडतो. त्याप्रमाणे मानवा ! तू देखील ईश्वरभक्तीच्या मार्गावरील बालक आहेस. सहनशील हो, म्हणजे तुला पापाचा विसर पडेल.

एका तरुणाने आपल्या आईच्या आज्ञेचा आव्हेर केला आणि त्यामुळे आई मनात फार खिजली. आपल्या हाती काहीच नाही हे जाणून तिने त्याच्यासमोर पाळणा आणला आणि ती म्हणाली, " बेमुर्वत पोरा ! तुला आपले बाळपण आठवत नाही काय ? तू लहान असताना निराधार आणि अशक्त होतास आणि तुझ्यामुळे मला रात्रीची झोप लागत नसे. तू पाळण्यात पडलेला असताना तुझ्या अंगावर बसलेली माशी देखील तुला हाकता येत नव्हती. त्या माशीमुळे तुझी काय तिरपीट उडायची ? आज मोठा सरदार झाला आहेस. पाळण्यात असताना तू जितका अशक्त होतास तशाच अवस्थेत तू कबरीत जाणार आणि मुंगीदेखील तू बाजूला सारू शकणार नाहीस. कबरीतील किडे तुझ्या भेजातील चरबी खाऊन टाकतील. तेव्हा तुझ्या डोळ्याचे तेज कुठल्याकुठे बेपत्ता होईल. रस्त्याने जाणारा आंधळा तू पाहिला नाहीस काय ? त्याला वाट आणि विहीर नीट ओळखता येते का ? तू उपकार मानणारा असशील, तरच तुला डोळे आहेत असे म्हणता येईल. नाही तर तुला देखील आंधळाच म्हणावे लागेल. तुझी बुद्धी आणि समंजसपणा ही शिक्षकाने तुला शिकविली नाहीत, तर देवानेच तुला निर्माण करताना त्यांची योजना केली आहे.

सत्य जाणणारे हृदय जर तुला दिले नसते, तर तुझ्या कानाला सत्यवाणी देखील निरर्थक वाटली असती.

## मानवी देहाच्या रचनेवरून व्यक्त होणारे परमेशाचे कौशल्य

एक बोट ! काही पेरांनी ते बनलेले; पण गणिताचे ज्ञान ते प्रकट करते. ईश्वराच्या सृजन-कौशल्यावर ते बोट तू मोडलेस तर तो मूर्खपणा होईल. माणसाचे साधे चालणे ! या कामासाठी किती हाडांची योजना झाली आहे पाहा ! टाचा, ढोपरे आणि पावले यांची हालचाल झाल्याशिवाय एक पाऊल पुढे ठेवणे अशक्य आहे. माणसाला नमन करणे सोपे होते; कारण पाठीला एकच एक हाड नसते. तुझा मृण्मय पुतळा बनतो, तो दोनशे हाडांची माळ तयार झाल्यावर. सन्मार्गी मानवा ! तुझ्या अंगातील शिरा म्हणजे जमिनीवरील तीनशेसाठ कालवे होत. मेंदूतील अक्कल-हुशारी आणि विवेक, तुझी अंगांगे हृदयामुळे आणि हृदय चैतन्यामुळे प्रिय झालेली असतात. पशूची मान खाली असल्यामुळे तो हीन असतो, पण तू आपल्या पायावर उभा असल्यामुळे " अलिफ " या अरबी आद्याक्षरासारखा ताठ आहेस. जनावरांचे

तोंड खाण्यासाठी खाली जाते, पण तू मात्र ऐटीत आपला घास आपल्या तोंडासमोर आणतोस ! तुझे असे ऐश्वर्य असताना परमेश्वराच्या प्रार्थनेखेरीज दुसऱ्या कोणत्याही कारणाने मान वाकविणे तुला शोभत नाही. तुला आपल्या चेहऱ्याचा मोह न पडो ! तू चांगल्या सवयी लावून घे. तुला उंच यष्टीपेक्षा सरळ मार्गाची आवश्यकता अधिक आहे. कारण काफराला देखील आमच्यासारखाच चेहरा असतो. तू बुद्धिमान असशील तर तुला देवाने जे डोळे, कान आणि तोंड दिले आहेत, त्यांच्याशी द्रोह करू नकोस !

तू लोकांवर दगड मारणारा वेडा नाहीस हे कबूल, पण तू अचरटपणाने स्वकीयांशी भांडता कामा नये. कृतज्ञ बुद्धी असलेले शहाणे भगवंताचे आभार मानून आपले ऐश्वर्य खिळे ठोकून भक्कम बनवितात !

## उपकाराची फेड अपकाराने करू नको

एक शूर बादशहा एका काळ्या घोड्यावरून पडला आणि त्याची मान मोडली. हत्तीने धडक दिल्यावर व्हावे तशी त्याची मान शरीरात घुसली. तेव्हा त्याला वळून पाहताना सारे शरीर हलवावे लागे. सगळे वैद्य हकीम पेचात पडले. ग्रीसचा एक वैद्य आला. या युनानी हकिमाने त्याची मान वळवून शरीर ताठ केले. तो हकीम लाभला नसता तर बादशहाला जमिनीवरून उठताच आले नसते.

दुसऱ्या एका प्रसंगी तो हकीम बादशहाकडे आला. पण त्या पाजी बादशहाने पाहिलेही नाही. त्या विद्वान हकिमाला या गोष्टीमुळे भारी अपमान झाल्यासारखे वाटले. तो पुढे चालू लागला आणि म्हणाला, " मी त्या दिवशी त्याची मान नीट केली नसती तर त्याने मला पाहून आता जशी वळविली तशी वळवली नसती. "

त्याने एका पोराकरवी त्याच्याकडे अंडे पाठवून ते शेकोटीत टाकण्यास सांगितले. त्यामुळे धूर निघताच बादशहाला एक शिंक आली आणि त्याची मान पूर्ववत् देहात रुतून बसली. 'तोबा ! तोबा ! ' म्हणत त्या बादशहाने त्या हकिमाला शोधायला जासूद पाठविले. पण त्याचा पत्ता लागला नाही.

भगवंताने केलेल्या उपकारांकडे दुर्लक्ष करू नकोस. दुसरे काही केले नाहीस तरी हरकत नाही. उपकाराकडे दुर्लक्ष केलेस तर कयामतीच्या न्यायदानाच्या दिवशी तुला मान ताठ ठेवता यावयाची नाही.

## भगवंताच्या कलादृष्टीची प्रशंसा

रात्र आणि दिवस ही तुझ्या सोयीसाठी आहेत. रात्री चांदणे आणि दिवसा सूर्यप्रकाश तुला लाभतो. आकाशाचा फरासदार वसंताचे जाजम पसरतो. वायू, हिम, वर्षा, मेघ, नाद आणि वीज हे सर्व आज्ञाधारक हरकारे होत. आणि ते तू पेरलेले बी जमिनीत पोसतात. तुला तहान लागली, तर कासावीस होऊ नकोस; कारण मेघनामक भिस्ती आपल्या खांद्यावरून तुझ्यासाठी पाणी आणत आहे.

रूप, रंग, अन्न हे सर्व जमिनीतूनच उपजतात. त्यांचे आकलन करण्यास नेत्र, घ्राण, रसना यांची योजना केली आहे. मधमाशीपासून तुला मध लाभतो आणि दवापासून आंब मिळतो. खजूरवृक्ष खारका देतो आणि बियापासून झाड मिळते. रोपे लावणारा प्रत्येकजण वाढत्या झाडाकडे पाहून आश्चर्यचकित होतो. सूर्य, चंद्र, सुरैय्या (कृत्तिका) हे सर्व तुझ्यासाठीच आहेत. ही जणू तुझ्या घराच्या छतावरील झुंबरेच होत. काट्यातून फुलाची आणि नाभीतून कस्तुरीची उत्पत्ती ही सर्व तुझ्यासाठीच आहेत. तुझ्यासाठी दगडातून सोने आणि सुक्या काड्यातून हिरवीगार पालवीचीही व्यवस्था आहे. तुझ्या नेत्रांचे आणि भुवयांचे चित्रण परमेश्वराने स्वहस्ते केले आहे. कारण पवित्र वस्तू परक्याकडून केल्या जात नाहीत. सुंदरीचे संवर्धन करणारा परमेश्वर रंगारूपाने तिला सजवितो. त्याचे उपकार केवळ जिव्हेने मानणे अपुरे आहे. ते प्राणानेच, मनापासूनच फेडले पाहिजेत.

भगवंता, माझे अंतःकरण व्यथित झाले आहे आणि डोळ्यांना थकवा आला आहे. कारण मला तुझ्या उपकारांची गणतीच करता येत नाही. पशू, वनचर, कीटक इतकेच काय आकाशात भ्रमण करणाऱ्या फिरस्त्यांना देखील तुझे उपकार पूर्णपणे मानता आले नाहीत. कदाचित त्यांनी एका कोटीतील एक भाग संपविला असेल.

'सादी'! जा आता पुरे झाले! झाले गेले विसरून नीट वाग. ज्या मार्गाचा शेवट तुला माहीत नाही तो धरू नकोस.

* * *

एका माणसाने एका मुलाचा जोरात कान पिळला. "अरे आचरट पोरा! कमनशिब्या! मी तुला लाकडे फोडण्यासाठी कुऱ्हाड दिली होती. मशिदीची भिंत फोड म्हणून मी तुला सांगितले नव्हते. तुला जीभ आहे ती देवाचे आभार मानावयाला. कोणीही सत्यशोधक देवाविरुद्ध कृत्य करणार नाही. तुझे कान हे कुराण आणि स्मृती (हदीस) यांच्या श्रवणासाठी आहेत. तेव्हा कागाळ्या आणि असत्य वचन ऐकण्याचा हव्यास धरू नकोस. तुझे दोन डोळे परमेशाचे रचनाकौशल्य पाहण्यासाठी आहेत. ते तुझ्या मित्रांची आणि बांधवांची व्यंग्ये शोधण्यासाठी नाहीत."

## असमर्थांचे रक्षण करावे आणि दैवी साहाय्याचे आभार मानावेत

अत्यंत वाईट परिस्थितीशी तोंड द्यावे लागेपर्यंत सुखाच्या समयाची खरी किंमत कोणाला कळत नसते. दरवेशाला शिशिरऋतू आणि दुष्काळ ही जिवावरची संकटे. पण त्यांची श्रीमंत मनुष्याला फिकीर नसते.

ठेचाळलेला गरीब मनुष्य रडतो आणि त्याला झोप लागत नाही, कारण त्याने आरोग्यसंपन्न असताना देवाचे आभार मानले नव्हते. तू जरी धडधाकट आणि जलद चालणारा असलास, तरी देवाची कृपा स्मरून असमर्थांबरोबर चालताना

सावकाश चालत जा. तरुणांनी वृद्धांना सौजन्याने वागविले पाहिजे. शक्तिशाली लोकांनी दीनदुबळ्यांना दयेने वागविले पाहिजे. जेहून ( आमू दर्या ) नदीच्या तीरावर राहणाऱ्यांना पाण्याची किंमत कशी कळणार ?

युफ्रेटीस नदीच्या किनाऱ्यावर राहणाऱ्या अरबांना मक्केच्या वाटेवरील वाळवंटात वसलेल्या जरुद खेड्यातील पाण्यासाठी हपापलेल्या लोकांची व्यथा काय ठाऊक ? ज्याला काही दिवस दुखणाईत राहावे लागले आहे, त्यालाच आरोग्याची कदर कळते. तू ऐटीत कूस बदलतोस, तेव्हा तुला अंधाऱ्या रात्री कंटाळवाण्या कशा वाटतील? तापकरी लोकांच्या यातना लक्षात घे. कारण त्यांनाच रात्री कंटाळवाण्या वाटतात. पहारेकऱ्याची घंटा ऐकल्यावर डोळे उघडणाऱ्या घरमालकाला रखवालदाराला रात्री काय त्रास भोगावा लागतो याची कल्पना कशी असू शकेल ?

मी ऐकले होते की[११७] तुघ्रिल बादशहा एकदा एका हिंदू गुलामाजवळून जात होता. तो गारा, पाऊस आणि पूर अशा आपत्तीमुळे सुहेल[११८] तारकेप्रमाणे थरथर कापत होता. तुघ्रिलला पहारेकऱ्याचा कळवळा आला, आणि तो म्हणाला, " थोडा वेळ थांब. इतक्यात माझा एक नोकर कातडीकबा (अंगरखा) आणून देईल. तो घालून घे. "

इतक्यात गार वारा सुटला. बादशहा राजमहालात गेला होता. त्याचा एक पोरगेला नोकर होता व त्याच्यावर त्याचा लोभ होता. त्याचे रूप पाहण्यात बादशहा गुंग झाला होता. आणि त्याला त्या गरीब गुलाम हिंदू पहारेकऱ्याचा विसर पडला. कातडीकबा (सदरा) त्या बिचाऱ्याच्या फक्त कानाला (ऐकावयाला) मिळाला. पण दुर्दैवाने तो त्याच्या खांद्यावर आला नाही. त्याला थंडीचा तसा त्रास वाटत नव्हता. पण कातडीकब्यासाठी वाट पाहणे असह्य झाले.

बादशहा गाफिलपणे झोपी गेला. सकाळी नौबत वाजविणाऱ्याने काय म्हटले माहीत आहे ? " तू गुलामाला बाहुपाशात घेतल्याबरोबर तुला सद्वाक्याचा विसर पडला. तुझी रात्र चैनीत गेली. पण रात्री आमच्यावर काय संकटे आली ते तुला कसे कळणार ? " काफल्यातील माणसांनी खाण्यासाठी भटारखान्याची वाट धरली. पण त्यांचे क्लेश फक्त ज्यांचे पाय गरम वाळूत पोळतात त्यांनाच कळू शकतात. नाखवा ! आता तरी नाव पाण्यावर सोड कारण गरिबांच्या डोक्यावरून पाणी गेले. काफल्यातील तरुणांनो जरा सबूर ! काफल्यात काही वयस्क आणि अशक्त माणसेही आहेत. काफल्याच्या उंटावरील हौद्यावर तू खुशाल झोपला आहेस, पण उंटाचा लगाम सारवाना (उंट चालविणारा) च्या हाती आहे. तुला जंगल, डोंगर, दगड, वाळवंट यांची फिकीर नाही. पण पायी चालणारे मागे राहिले आहेत त्यांची तू विचारपूस कर. तू पर्वतप्राय घोड्यावर किंवा उंटावर चालला आहेस; तुला पायी चालणाऱ्यांचे काय होय ! तो बिचारा आपलेच रक्त पितो आहे. आपल्या घरात

मापुकाला कुशीत घेऊन झोपलेल्याला रिकाम्या पोटाने तडफडणाऱ्यांचे हाल कसे कळणार ?

*　　　*　　　*

कोतवालाने एका माणसाचे हात बांधले होते. तो बिचारा रात्रभर बेचैन आणि कष्टी झाला होता. काळोख्या रात्री त्याच्या कानी एका गरिबाचा आक्रोश आला. गळ्यात फासा असलेल्या त्या चोराने हे शब्द ऐकले व तो म्हणाला, "तू किती वेळ रडत राहणार ? झोप आता. गरीब मनुष्या ! जा ! देवाचे आभार मान. तुझे हात तरी कोतवालाने बांधले नाहीत."

आपल्यावर संकट आले असताना आपलेच दुःख मोठे असे मानू नका. तुमच्याहूनही अधिक दुःखी असतील त्यांच्याकडे पाहा.

*　　　*　　　*

एका उघड्या भिक्षेकऱ्याने एक दिरम उसना घेतला आणि आपल्यासाठी कच्च्या कातड्याचा अंगरखा बनविला. तो नशिबास दोष देऊन म्हणाला, "ह्याच पोशाखामुळे उन्हाळ्यात उकडून माझा प्राण जातो."

एक मूर्ख आपल्या कष्टाला कंटाळून रडत असताना कारागृहातील विहिरीतून एकजण ओरडला, "गप्प बैस ! भगवंताचे आभार मान. निदान तुला माझ्यासारखे हातपाय बांधून विहिरीत तरी कुणी टाकले नाही."

*　　　*　　　*

एक मनुष्य एका साधूच्या जवळून जात होता. त्याला तो यहुदी असावा असे वाटले. त्याच्या मानेवर त्याने गुद्दा मारला. त्या साधूने त्याला आपला अंगरखा देऊन टाकला. तो लज्जित होऊन म्हणाला, "माझी चूक झाली. मला क्षमा करा ! हे दान देण्याचे आता काय कारण आहे ?"

त्याचे आभार मानून त्या साधूने म्हटले, "मी येथे काही उचापत करावयाला आलो नाही. पण तू जे माझ्याबद्दल समजतोस तसा मी नाही. चांगली वागणूक असलेला गबाळा असला, तरी तो मनात किल्मिष असलेल्या छानछोक मनुष्यापेक्षा अधिक चांगला असतो. माझ्या मते रात्री भटकणारा चोर साधूच्या पोशाखातील पाप्यापेक्षा चांगला होय !"

*　　　*　　　*

जंगलात एक मागे राहिलेला पांथस्थ आक्रोश करीत होता. "माझ्यापेक्षा अधिक दुःखी या जंगलात कोण आहे ?"

ओझ्याखाली वाकलेले गाढव म्हणाले, "नादान माणसा, तू नशिबाचे रडगाणे किती गाशील ? जा. तुला गाढवावर स्वार व्हावे लागले नाही, आणि तुला गाढवा-प्रमाणे दुसऱ्यांचे ओझे वाहावे लागत नाही. याकरिता परमेश्वराचे आभार मान."

* * *

एक धर्ममार्तंड एका प्यालेल्या माणसाजवळून चालला होता. त्याला आपल्या सोवळ्याचा कैफ चढला होता. मगरूरीने त्याने त्याच्याकडे पाहिले नाही. तेव्हा त्या तरुणाने मान उंच करून म्हटले, "अरे थेरड्या ! जा ! आपल्या सद्भाग्या-बद्दल देवाचे आभार मान ! कारण गर्वाने मनुष्य नालायक बनतो."

जर कोणी बंदिवासात असेल तर त्याला पाहून हसू नकोस. देव अचानक तशी वेळ तुझ्यावर न आणो. कोणी सांगावे ? उद्या भाग्य फिरल्यावर माझ्याप्रमाणे तूही असा मस्तपणे पडून राहशील. दैवाने तुझे ठिकाण मशिदीत नेमले म्हणून तू काय दुसऱ्यांना काफर, यहुदी, पारसी म्हणून हिणवावे ? मुसलमान बांधवा ! तू हात जोडून देवाचे आभार मान, की त्याने तुझ्या गळ्यात जानवे किंवा कमरेत कस्ती (पारशांची) बांधली नाही. तू काफर नाहीस. जी गोष्ट हवी असते तिच्या शोधार्थ कोणी स्वतःच्या हिकमतीने जात नाही. देवच त्यांना तशी बुद्धी देतो. देवाची आज्ञा कोठून सुटली हे ध्यानात घे. अल्लाहशिवाय दुसरा कोणावर विश्वास ठेवणारा आंधळाच म्हटला पाहिजे."

देवाने वनस्पतीत औषधी गुण निर्माण केला आहे. आणि प्राण्याला आयुष्य लाभणार असेल तर त्या उपयोगी पडतात. जिवंत माणसांना मध अमृततुल्य आणि आनंददायक असतो; पण मेलेल्याला कोणतेच औषध लागू होत नाही. मरावयास टेकलेल्याच्या तोंडात मधाचे बोट ठेवल्याने काय होणार आहे ? एका माणसाच्या डोक्याला लोखंडी गज लागला. त्याला कोणीतरी त्यावर गंध उगाळून लावण्यास सांगत होता. शक्य असेल तोवर संकटच टाळावे, पण तशी देवाचीच आज्ञा असेल तर तिला विरोध करण्यासाठी हात उगारू नका. जोपर्यंत इंद्रिये कार्यक्षम आहेत तोवर चेहरा टवटवीत असतो आणि शरीर शुचिर्भूत राहते. खाण्यापिण्याची अडचण उत्पन्न झाल्यावर शरीराचे सारेच तंत्र बिघडते. आर्द्र, रूक्ष, उष्ण आणि शीत या चार धातूंनी देह बनलेला असतो. यांपैकी एकाचा वरचष्मा झाला, तर तब्येतीचा समतोल जाऊन तराजू कोसळून पडतो. श्वासोच्छ्वास निमाला तर हृदयाच्या उष्णतेशी त्याचा मेळ बसत नाही आणि अशा रीतीने तब्येतीच्या कटकटी सुरू होतात. जर जठरात अन्न पचले नाही तर नाजूक देहाचे फार हाल होतात. जाणकार या गोष्टीकडे फारसे लक्ष देत नाहीत. कारण सतत ही सर्व तंत्रे संभाळणे त्यांना जमत नाही. उत्तम आहाराने शक्ती येते असे समजू नकोस. फक्त ईश्वरी कृपा असेल तरच तुझे योग्य पोषण होईल. मी देवाची शपथ घेऊन सांगतो, तू सुरा आणि तलवारीसमोर जरी आपले डोळे धरलेस, म्हणजे यातना भोगण्यास सिद्ध झालास, तरी देवाचे आभार मानले

असे होत नाही. तू नमाजासाठी वाकलास की देवाची स्तुती कर आणि 'अलहमदुलिल्लाह' म्हण कारण त्यानेच बुद्धी दिली आहे. तू स्वतःला विसरून जा. जपमाळ ओढणे, स्तवन करणे, प्रार्थना म्हणणे, दुवा मागणे हे सर्व याचनेचे प्रकार होत आणि याचकाने मगरूरी करून चालत नाही.

तू सतत प्रार्थना करून आपले कर्तव्य बजावलेस हे मान्य करतो पण तू जे अन्न खातोस तेही देवाच्या मालकीचेच आहे हे लक्षात ठेव.

प्रथम देवाने मानवाला स्पृहा दिली आणि त्यानंतर त्याने आपले मस्तक नमविले. देवाचीच सदिच्छा नसेल तर मनुष्य दुसऱ्याला कशी प्रेरणा देईल? अल्लाह एकच आहे असे जिह्वेने उच्चारले तरी तिला युक्तिवाद शिकविणारा देवच होय. मानवाचे सत्य-ज्ञानाचे साधन त्याचे नेत्र होत आणि भूमि आणि आकाश हे त्याच्या जिज्ञासेच्या क्षेत्रात येतात. तुझ्यासमोर हे ज्ञानाचे कपाट उघडलेले आहे. हाताना दानाची सवय असते तर मस्तकाला नमनाची ताकत असते. तसे नसते तर हाताने दान घडले नसते आणि मस्तकाने नमून प्रार्थना घडली नसती. मोठ्या चातुर्याने त्याने तुला जिह्वा दिली आणि दिमतीला कान दिले. कारण हृदयाच्या पेटाऱ्याची ती चावी होय. वाणीने कथन केले नसते तर हृदयाबद्दल कुणाला काय समजले असते? 'कान' या हेराने बातमी दिली नसती तर 'मस्तिष्क' या सुलतानाला जाग कशी आली असती?

मला मनोरंजक वाणी दिली, तुला अर्थग्राही समजूत दिली. ही जोडी सतत दारावर पहारा करते आणि सुलतानाला बातमी पुरवते. आपल्या शहाणपणाचे स्वतःच कौतुक करू नकोस. ते ज्या देवाच्या दरवाजातून तुम्हाला मिळाले त्याचे सामर्थ्य जाणा. माळी जी फळे-फुले बादशहाला अर्पण करण्यासाठी घेऊन जात असतो ती शाही बागेतूनच त्याला मिळतात.

## भारताची यात्रा आणि मूर्तिपूजेचे खूळ

मी सोमनाथ या शहरात हस्तिदंताची मूर्ती पाहिली. आपल्याकडे अंधकार-युगात 'मनात' जशी मूर्ती असे तशी ती वस्त्रालंकारांनी सजली होती. शिल्पकाराने ती मूर्ती इतकी सुंदर बनविली होती की तिच्यासारखी दुसरी असेल अशी कल्पना करणेही अशक्य आहे.

त्या निर्जीव मूर्तीच्या दर्शनासाठी भाविकांचे तांडे तेथे येत असत. चीन-चुगळ या देशदेशांतराच्या महाराजांनी पण त्या मूर्तीबद्दल आदर बाळगला होता.

ती पाषाणमूर्ती होती. अशाच एका पाषाणहृदयी मूर्ती (मापुका) बद्दल सादीनेही आदर बाळगला होता.

मोठमोठे कवी तेथे जात आणि त्या अबोल प्रतिमेपुढे रडगाणे गात.

मला मोठा प्रश्न पडला तो हा की सजीव भक्त दगडाधोंडयाची पूजा का करतात ?

तेथील एक पुजारी सज्जन होता व त्याच्या खोलीतच माझे वास्तव्य होते. मी त्याला चुचकारून म्हणालो, "अरे ब्राह्मणा ! या गावात जो प्रकार चालतो तो पाहून मला आश्चर्य वाटते. हे लोक त्या परतंत्र पुतळ्यावर भाळले आहेत आणि खुळचटपणाच्या खाईत पडले आहेत. त्या मूर्तीच्या दंडात शक्ती नाही आणि पायात गती नाही. तिला जमिनीवर पाडले तर तिला उठता देखील यावयाचे नाही. त्याचे डोळे 'कहरुबा' (तृणचुंबक) दगडाचे आहेत हे तुला दिसत नाही काय ? या मूढ लोकांकडून सत्यनिष्ठेची अपेक्षा करणे चुकीचे आहे. "

मी असे बोलल्यावर तो माझा मित्र माझ्यावर खवळला आणि डोळे वटारून माझ्याकडे पाहू लागला. त्याने त्या मंदिराच्या पुरोहितांना ही बातमी सांगितली. मला त्या ठिकाणी माझ्या सुरक्षिततेची चिन्हे दिसेनाशी झाली.

त्यांच्या पुढचा रस्ता वाकडा होता म्हणून सरळ मार्ग सुद्धा त्यांना वाकडा दिसे. मनुष्य स्वतः जरी बुद्धिवान असला तरी मूर्खांच्या मेळाव्यात तो खुळाच ठरतो.

आता काय करावे ? माझी युक्ती फसली. आता काही थातुरमातुर केल्याशिवाय मला गत्यंतरच नव्हते ! जर वैरी सूड घेण्याच्या पवित्र्यात असेल तर सामोपचारच लागू पडतो. म्हणून त्या ब्राह्मणाची मी वाखाणणी सुरू केली.

'झेंदावेस्ता (पारशी वेद) आणि भाष्य जाणणाऱ्या माझ्या महान मित्रा! मलाही ह्या मूर्तीची घडण फारच आवडली आहे. वा ! काय रेखीव कलाकृती आहे ! असा चेहरा मी कोठेच पाहिला नाही. पण यातील रहस्य मला उमगत नाही. मी थोडया दिवसांसाठी प्रवासी म्हणून येथे आलो आहे. मुशाफिराला खरे खोटे कोठे कळते ? तू विद्वान आहेस आणि या बुद्धिबळपटावरील वजीर आहेस; या शहराच्या राजाचा गुरू आहेस. केवळ अंधानुकरणाने उपासना करणे गैर आहे. जो मुशाफिर हे जाणतो तो धन्य होय ! खरे म्हणजे या मूर्तीच्या भक्तांत पहिला नंबर माझा आहे. मग याचे रहस्य काय ते मला सांग."

ब्राह्मणाचा चेहरा एकदम प्रफुल्लित झाला. तो हुरळून म्हणाला, "गोडबोल्या मित्रा ! तुझा प्रश्न बरोबर आहे. तुझी कृतीही ठीक आहे. जो गुरूच्या शोधात असतो त्याला इष्ट गती लाभते. प्रतिदिवशी सकाळी आशीर्वाद द्यायला या मूर्तीशिवाय कोणी येथे हात उचलत नाही. तुला पाहावयाचे असेल तर तू आज रात्री येथे राहिलास तर उद्यापावेतो तुला हे रहस्य समजेल. "

त्या म्हाताऱ्याच्या सांगण्यावरून मी त्या रात्री तेथेच राहिलो. रुस्तुमचा जासूद बैजन हा देखील एकदा असाच पिशाच्चाच्या तावडीत सापडला होता.

ती रात्र कयामतीच्या–अंतिम–न्यायदानाच्या–दिवसासारखी फार मोठी वाटली. माझ्या भोवताली पुरोहित लोक हातपाय न धुताच भजनाला बसले होते.

त्यांनी पाण्याला स्पर्श केला नव्हता. त्यांच्या काखेतून उन्हात सडणाऱ्या शवाची दुर्गंधी येत होती.

मी मोठे पाप केले होते. त्यामुळे रात्री माझ्यावर मोठे संकट ओढवले. मी सगळी रात्र त्या पराधीन अवस्थेत काढली. एक हात मी माझ्या छातीवर ठेवला व दुसऱ्या हाताने नमन केले.

इतक्यात चौघडा वाजला. सकाळच्या प्रहरी कोंबडाही त्या पुरोहिताचा त्रासदायक संदेश ओरडून सांगत होता. काळरात्र संपल्यावर दिवस उगवला तो खतीबाच्या तलवारीसारखा वाटला.[११५]

दिनकराच्या ज्वाळा सर्वत्र पसरल्या आणि जग तेजात न्हाऊन निघाले. हे दृश्य म्हणजे जंगी घराण्याच्या राज्यातील एका ठिकाणाहून श्वेत-रक्तवर्णी तुर्की-तार्तरांची फौज चालून आल्यासारखे होते. अंधश्रद्धाग्रस्त भाविक हातपाय न धुताच गल्लीबोळातून येऊन जमा झाले. गावात एक चिटपाखरू राहिले नव्हते. पण देवळाच्या प्रांगणांत तसुभर जागा नव्हती. मला फार वाईट वाटत होते आणि झोपमोड झाल्याने माझे मन ठिकाणावर नव्हते. त्यातच एक चमत्कार घडला. मूर्तीने आपला हात वर उचलला. लोकांचा आवेश उचंबळून आला. जणू समुद्राला भरती आली.

लोक पांगले, त्या ब्राह्मण पुजाऱ्याने हसून मला म्हटले, "आता तरी तुझी शंका दूर झाली ना? सत्याची प्रतीती आली ना? तुझे पाखंड पार पळाले ना?"

मला कळून आले की या लोकांत अज्ञान पक्के रूढ झाले आहे. त्यांची श्रद्धा अवास्तव आहे. खरी वस्तुस्थिती कोणी सांगत नव्हता. कारण लौकिकदृष्टी असलेल्यापासून सत्य लपवून ठेवावे लागते. पण कोणी मातब्बर माणूस भेटला तर त्याच्याशी लढून हात मोडून घेण्यात काही अर्थ नाही.

तेथील थोतांड पाहून मी जरा अस्वस्थ झालो. पण ते पाहून माझ्या बोलण्याबद्दल मला पश्चात्ताप वाटत आहे असे त्यांना वाटले.

माझा विलाप पाहून काफर नरम झाले. महापुरात मोठाले दगडदेखील हालतातच की! ते मला नमस्कार करण्यासाठी धावून आले. मोठ्या आदबीने त्यांनी माझे दंड धरले.

मी आढेवेढे घेत त्या हस्तिदंती मूर्तीकडे गेलो. ती सालंकृत सिंहासनावर विराजमान झाली होती.

त्या प्रतिमेच्या हाताचे मी चुंबन घेतले. (त्या प्रतिमेचा आणि तिच्या पूजकांचा धिक्कार असो) काही दिवसांकरिता मी काफराचे सोंग घेतले. वेदांच्या (झेंद) अंगप्रत्यंगाचा मी विद्वान बनलो. मी त्या मंदिरात निर्धास्त झाल्यामुळे मला अतिशय आनंद झाला आणि पृथ्वीवर जागा अपुरी वाटू लागली.

एकदा रात्रीच्या वेळी मी मंदिराचा दरवाजा घट्ट बंद करून घेतला आणि विंचवासारखा इकडे तिकडे फिरत राहिलो. सिंहासनावरून खालून पाहिले. मला एक जरीचा पडदा दिसला. त्या पडद्यामागे एक वयस्कर मूर्तिपूजक पुरोहित मांडी ठोकून बसला होता व त्याच्या हातात दोरी होती. मला एकदम सारे बिंग कळून चुकले. हजरत पैगंबर दाऊद यांच्या हातात जसे लोखंडाचे मेण बनत असे तसे त्या पुरोहिताच्या हातातही होत असे.

त्या पुरोहिताने दोरी ओढल्याबरोबर मूर्ती आशीर्वादासाठी हात वर उचलत असे. त्याने मला पाहिले आणि तो लाजला. कारण खरे बिंग बाहेर पडल्याने नाचक्की होते. तो पळून जाऊ लागला आणि मी त्याच्या मागून धावलो. मी त्याला उचलून एका विहिरीत टाकून दिले. कारण तो ब्राह्मण जिवंत राहिला असता तर त्याने माझा प्राण घेण्याचा प्रयत्न केला असता. मी त्याचे रहस्य उघडकीस आणीन या भीतीने त्याने माझा भेजा बाहेर काढला असता.

जर कोणी उचापती करणारा हाती आला तर त्याचा नायनाट करावा. जर तो मूर्ख जिवंत राहिला तर तो तुला जिवंत राहू देणार नाही. त्याने तुझ्या उंबरठ्यावर मान ठेवून लाचारी दाखविली तरी मोका सापडताच तो तुझे डोके उडविल्याशिवाय राहणार नाही. फसवेगिरी करणाऱ्याच्या तू नादी लागू नकोस. जर तू त्यांच्या नादी लागलास आणि तुला खरे ते दिसले तर पाठीशी घालू नकोस.

मी त्या पुरोहिताला दगडाने ठेचून मारला, कारण मेलेला माणूस काही अपाय करू शकत नाही.

माझ्या त्या कृतीमुळे लोकांत मोठी खळबळ उडाली आणि मी तेथून पळ काढला.

वाघांच्या जंगलाला तू आग लावलीस तर त्या वाघापासून बचाव करून घेण्याची अक्कल असावी. लोकांना डसणारा सर्पशावक मारू नये आणि मारल्यास त्या ठिकाणी राहू नये. तू मधमाशांचे पोळे डिवचलेस तर त्या जागी राहू नकोस, तुझी फजिती होईल. आपल्यापेक्षा अधिक नेमबहाद्दर धनुर्धाऱ्याशी शरसंधान करू नकोस. केलेसच तर पोबारा कर. सादीच्या उपदेशात तुला यापेक्षा दुसरे काही आढळणार नाही की "बाबा! भिंत पोखरलीस तर तिला लागून उभा राहू नकोस!"

इतका वेळ बोभाटा झाल्यावर मी तेथून निघून हिंदुस्थानात (दिल्लीला) आलो आणि नंतर यमनला जाऊन मक्केची यात्रा केली.

तो दारुण प्रसंग माझ्यावर आल्यामुळे माझ्यात कडवटपणा आला होता. आणि या घडीपर्यंत तो दूर झाला नाही.

अबूबक्र साद जंगी ज्या वैभवात जन्माला आला तेवढे भाग्य कोणत्याही मातेला मागे लाभले नसेल व पुढे लाभणार नाही. माझ्या महद्‌भाग्यानेच मला आश्रयस्थान

लाभले. या कृपावंतांचा मला आश्रय लाभला. त्या दौलतीचा मी गुलाम असून तिच्या भरभराटीसाठी मी प्रार्थना करतो. देवा, ही सावली शाश्वत ठेव. तीमुळे माझ्या दुःखांच्या मानाने मला दिलासा मिळाला नाही, तरी आपल्या वैभवाच्या मानाने तो मिळेल.

त्याचे उपकार मी कसे फेडू ? मी सेवेसाठी गेलो तर माझे डोके पायाशीच जाते. मी आतापर्यंत अनेक प्रकारच्या यातना भोगल्या. माझ्या कानात अजून ती बोधवचने घुमत आहेत.

पहिले म्हणजे मी जेव्हा हात उचलून देवाकडे प्रार्थना करतो तेव्हा सोमनाथाची मोहक मूर्ती मला आठवते आणि ती माझ्या डोळयांत धूळ फेकते. मी जो माझा हात वर केला तो माझ्या शक्तीने नव्हे. श्रद्धाळू लोक कधीच आपल्या इच्छेने हात वर करीत नाहीत, तर विधीची दोरी कळसूत्री बाहुल्याप्रमाणे त्यांना नाचवते. पाप व पुण्य ही दोन्ही द्वारे लोकांसाठी मोकळी आहेत. पण पुण्यकर्म करणे प्रत्येकाच्या अखत्यारातले नसते.

ह्या एका प्रतिबंधामुळेच खास आमंत्रणाशिवाय कोणीही राजदरबारात जाऊ नये. अल्लाच्या द्वाराची चावी पण कोणाच्या हाती नसते. त्याच्यासारखा सर्व-समर्थ तोच हे खरे. म्हणून सन्मार्गस्थ मित्रा ! तुझा असा कोणताच उपकार नसतो. उपकार फक्त देवाचे असतात. ज्या एका अज्ञात तंत्राने तुझी घडण झाली आहे त्या तंत्रामुळेच तुझ्या हातून वाईट कर्म घडणार नाही.

मधमाशीच्या तोंडी अमृत ठेवणाराच सापाच्या दातात विष ठेवतो. जर देवाच्या मनात तुझे वाटोळे करावयाचे असेल तर तो प्रत्यक्ष तुझ्या हातून प्रजापीडा घडवील. जर तो तुझ्यावर खूष असेल तर तो तुझ्या हातून प्रजारंजन घडवील. तू सन्मार्गी असल्याची घमेंड करू नकोस कारण तुझा हात देवाच्या हाती आहे. म्हणूनच तू उभा आहेस. हा मोठा उपयुक्त उपदेश आहे. तुम्ही याप्रमाणे वागाल तर लोकांत तुमचे नाव होईल.

लोकांनी अनुज्ञा दिल्यास तुझी कीर्ती वाढेल आणि ते तुला मोठ्या मानाच्या ठिकाणी बसवतील. पण तू एक कर. जे तुला लाभेल ते तू एकटा भोगू नकोस. दीन फकिराकडे पण लक्ष ठेव. मी मेल्यावर तू माझ्यासाठी खूप प्रार्थना करशील, पण त्यामुळे मला माझ्या कर्माची सार्थकता वाटणार नाही.

□ □ □

## अध्याय ९

# पश्चात्तापाचा प्रताप

ऊठ जीवा ! तुझ्या वयाला सत्तर वर्षे झाली आणि अद्यापही तू झोपेत आहेस! तुझे आयुष्य फुकट चालले आहे. तू या जगात राहण्याची व्यवस्था चालू ठेवली आहेस. पण येथून जाण्याबद्दल कसलीच तयारी करीत नाहीस ! मेल्यानंतर जेव्हा कयामतीच्या न्यायदानाची जत्रा भरेल तेव्हा चांगल्या कर्माच्या मोबदल्यातच सुखाची जागा मिळेल. हातात पैसा असेल तेवढ्याच मालाची खरेदी करू शकशील. तू दरिद्री असशील तर तुझी तुला लाज वाटेल कारण बाजार जेवढ्या थाटात भरतो तेवढे दरिद्री माणसाचे दुःख तीव्र बनते. पन्नासाला पाचच दिरम नाणी कमी पडत असली तरी तुझ्या जिवाला तळमळ लागेल. तुझी पन्नास वर्षे जरी फुकट गेली, तरी उरलेली पाच तरी सत्कारणी लाव. मृतात्म्याला वाचा असती तर बिचारा म्हणाला असता, 'जिवंत मानवा, तुला जर वाचाशक्ती असेल तर तू मढ्यासारखा मुग्ध राहू नकोस. तू गाफिलपणाने सारे आयुष्य घालविले असशील, तर थोडा तरी वेळ वाचव.'

### एका म्हाताऱ्याचा आपल्या गमावलेल्या तारुण्याबद्दल शोक

आम्ही काही तरुण मंडळी एका रात्री एकत्र बसून तारुण्यातील गमतींबद्दल बोलत होतो. आम्ही बुलबुलाप्रमाणे चिवचिवत होतो आणि फुलासारखे प्रफुल्ल झालो होतो. आमच्या गल्लीत आम्ही आनंदी लोक म्हणून प्रसिद्ध होतो.

आमच्यापासून किंचित दूर एक वृद्ध बसला होता. कालगतीने त्याचे काळे केस पांढरे झाले होते. त्याच्या तोंडाचे बोळके झाल्याने त्याचे बोलणे बंद झाले होते. त्याचे ओठ आमच्यासारखे पिस्त्याच्या बीप्रमाणे नव्हते. आमच्यातील एकाने त्याच्याजवळ जाऊन म्हटले, "आजोबा, तुम्ही एकाकी बसून कसले दुःख आठवत आहात ? थोडा वेळ दुःखाची कोंडी फोडून बाहेर या आणि मनाला उत्साह आणण्यासाठी आम्हा तरुणांबरोबर मजेत हिंडा."

म्हातारा खाली घातलेले तोंड वर करून जे अनुभवाचे बोल वदला ते ऐकण्यासारखे आहेत. "बागेत वाऱ्याची झुळूक आल्याने कोवळी रोपेच हालतात. रोपटे लहान आणि रसरशीत असतानाच ते वाऱ्याबरोबर डुलते, ते पिवळे पडल्यावर वाऱ्याच्या माऱ्याने जमिनदोस्त होते. वंसतसमयी सुगंधित वारा वाहतो त्या वेळी वृक्ष आपली सुकली पाने फेकून देतो. मी तरुणाबरोबर हिंडणे शोभणार नाही. कारण माझ्या गालावर वार्ध्यक्याचा प्रभाव आहे. माझ्या देहातील आत्म्याचे पाखरू क्षणार्धात आपला या जगाशी असलेला संबंध तोडून टाकील. आता प्रभूच्या देणगीचा

आनंद लुटणे तुमच्या भाग्यात आहे. आम्ही चैनबाजीला रामराम ठोकला आहे. डोक्यावर वार्धक्याची धूळ साठल्यानंतर तारुण्याची उमेद बाळगणे वेडेपण होय. कावळ्यासारख्या माझ्या डोक्यावर बर्फवृष्टी झाली आहे म्हणून मला बुलबुलासारखे बागेत बसणे शोभत नाही. मोरच आपल्या सौंदर्याचा देखावा करतो. ज्याची पिसे गळली असतील तो गृध्र तसा डौल करील असे तुम्हास का वाटावे ? माझ्या शेतातील कापणीसुद्धा झाली आहे. तुमची तर अजून रोपटी कोवळी आहेत. आमच्या उद्यानाची टवटवी केव्हाच मावळली. सुकल्या फुलांचा कोणी गुच्छ बांधील काय ? अरे लाडक्या पुत्रा, माझ्या हाती काठी आली आहे. खेळणे, बागडणे तरुणानांच शोभते, कारण बुढ्ढ्याना दुसऱ्यानी हात दिल्याशिवाय काहीच करता येत नाही. माझा एकेकाळी लालबुंद असलेला चेहरा पाहा कसा पिवळा जर्द झाला आहे. सूर्याचे तेज मंद झाले तर त्याला सूर्यास्तच म्हणतात. बुढ्ढ्याने कामवासना बाळगण्यापेक्षा तरुणाने बाळगली तर ती वाईट दिसणार नाही. मी माझ्या दुष्कर्माबद्दल मात्र लहान मुलांप्रमाणे रडलेले बरे दिसेल. तरीपण मुलाप्रमाणे अजाणतेने वागून चालणार नाही. मला खंत बाळगलीच पाहिजे."

वर्षानुवर्षे गुन्हे करीत जगण्यापेक्षा मरून जाणे श्रेयस्कर असे न्यायी लुकमान म्हणाला ते रास्त आहे. आपल्या हातातील पुंजी आणि माल घालविण्यापेक्षा सकाळीच आपले दुकान बंद करणे केव्हाही चांगले. तरुण मनुष्य आपल्या तेजाने काळाचा अंधार नाहीसा करतो. बिचारा वृद्ध मात्र तो अंधार आपल्याबरोबर घेऊन कब्रस्तानात प्रवेश करतो.

*  *  *

एक म्हातारा एका वैद्याकडे आला. त्याचे कुंथणे एकून माझा जीव मेटाकुटीस आला. तो बोलला, " वैद्यराज, जरा माझी नाडी पाहा. मला मुळीसुद्धा हलता येत नाही. माझे शरीर इतके वाकले आहे की तुम्हाला वाटेल मी जमिनीतच रुतून बसलो आहे."

वैद्य म्हणाला, " आता आपला या जगीचा व्यवहार आटोपता घ्या. आपले पाय मोकळे होतील ते कयामतीच्या न्यायदानानंतरच.

तू जरी तरुण असताना खूप परिश्रम केले असशील तरी वार्धक्यात जरा अक्कलहुशारीने वाग. वयाला चाळीस वर्षे पूर्ण झाल्यावर शारीरिक श्रम बेताचेच करावेत. कारण ते आपल्या आवाक्याबाहेरचे असतात. आता आशाआकांक्षा गुंडाळून ठेव कारण तारुण्याचा बहर ओसरला आहे. मला आता हिरवळ पाहून तरतरी येणार नाही. कारण थोड्याच दिवसांत माझ्या थडग्यातून हिरवळ उगवणार आहे. आम्ही मेल्यानंतर जे लोक जन्माला येणार आहेत, ते आमच्या कबरीतील माती तुडवत राहणार आहेत. हाय ! तारुण्याचा मादक काळ संपला ! यमन देशातील विजेसारखा तो लुप्त झाला.

माझे सारे आयुष्य खाण्यालेण्याच्या काळजीत गेले. धर्माबद्दल विचार करावयाला एक क्षणाचीही फुरसत मिळाली नाही. मला वाईट वाटते ते अशासाठी की आम्ही असत्याचे पूजक बनलो आणि सत्यापासून पारखे होत चाललो. 'आमचे सारे आयुष्य गेले पण आमच्या हातून कोणतीही एखादी गोष्ट होऊ शकली नाही.' असे एक गुरुजी शिष्याला म्हणत होते, ते खरे आहे."

## म्हातारपणातील अशक्ततेचे रडगाणे गाण्यापेक्षा तारुण्यातील सामर्थ्यात समाधान मानणे बरे

तरुणा! आतापासून तू विबुध सांगतील त्याप्रमाणे वागण्याची स्वतःला सवय लावून घे. कारण उद्या तुझे वय झाल्यानंतर तुला तारुण्याच्या गमजा करता येणार नाहीत. आज मन प्रसन्न आणि शरीर सुदृढ आहे तेवढ्यातच तू आपले अभीष्ट साधून घे. मला त्या काळाची किंमत कळली नाही म्हणून अपेश पदरी आले असे वाटते. ज्या काळातील प्रत्येक दिवस देखील भाग्याचा वाटावयाला पाहिजे तो काळच नियतीने माझ्याकडून हिसकवून घेतला आहे. ओझ्याखाली तडफडणारे गाढव करून करून काय साधेल? म्हणूनच मी म्हणतो की आपले तट्टू पुढे ढकल. फुटका पेला सांधला म्हणून काही तो धड पेल्यासारखा विकता येणार नाही.

पण हे जरी खरे असले तरी पेला आपल्या हातून फुटला तर तो सांधल्याशिवाय गत्यंतर नाही. तुला जेहून नदीत उडी मार असे कोण सांगतो? पण पाय घसरून तू पडलासच तर मात्र आपला प्राण वाचव. तू गाफीलपणाने शुद्धोदक वाया घालवलेस. आता तुला 'तयम्मुम' (लघ्वीनंतरचे प्रक्षालन) मातीनेच करावे लागेल. तुला तरुणाबरोबर धावण्याची शर्यत करता आली नाही, तर उठत बसत का होईना त्यांच्याबरोबर वाटचाल कर. चपळ लोक केव्हाच दूर निघून गेले असले व तू वार्धक्याने जर्जर झाला असलास तरी हातपाय गळू न देता नीट उभा राहा.

* * *

एका रात्री मी मक्केजवळील फेद या वाळवंटातील ठिकाणी झोपी गेलो. माझ्या सोबत्यांना देखील थकव्याने कैदी बनवून टाकले होते. एक सांडणीस्वार धापा टाकीत आला आणि उंटाची लगाम माझ्यावर फेकून त्याने मला उठविले. "एवढे काफिले पुढे चालले असताना व घंटीचा आवाज येऊन सुद्धा तू घोरत पडला आहेस! तुला मरावयाचे आहे काय? मला साखरझोप आवडत का नाही? तरीदेखील हे भयाण रान माझ्यापुढे आहे. सुखद झोपेमुळे काफिल्याची वर्दळ तुझ्या कानी पडली नाही तर तू मुक्काम कसा गाठणार आहेस?

नगारखान्यातून आवाज निघण्यापूर्वीच जागे होऊन प्रवासाची तयारी करू लागतात ते चाणाक्ष लोक धन्य होत! रस्त्यात झोपलेले लोक जागे झाल्यावर त्यांना पुढे चालून गेलेल्यांची पावले देखील दिसणार नाहीत. लवकर उठणारा वाटसरू

मार्गक्रमण करू लागतो. तांडा निघून गेल्यावर जाग येऊन उपयोग काय? आता तुझे वय झाले आहे. तारुण्य संपुष्टात आले आहे. केस देखील पांढरे झाले आहेत. आता तरी गाफीलपणाने झोपून राहू नकोस! माझ्या काळ्या केसातून पांढरा केस दृष्टीस पडल्यादिवशीच माझी उमेद गेली! हाय! माझे प्रिय आयुष्य वाया गेले. जे थोडे श्वासोच्छ्वास शिल्लक आहेत ते सुद्धा निघून जातील.

जे आयुष्य गुन्हेगारीमध्ये गेले ते गेले. त्याशिवाय जे शिल्लक आहे ते पण जाईल आणि हाती काहीच लागणार नाही. ते जपून वापरलेस आणि आपले काही भले व्हावे असे वाटत असेल तर पाहा, हा पेरणीचा मोसम आहे.

कयामतीच्या-मरणोत्तर न्यायदानाच्या शहरात जाताना रिकाम्या हाताने जाऊ नकोस. कारण तुला निष्कारण दुःख भोगत बसावे लागेल. जर तुझ्या अकलेचे चक्षू शाबूत असतील तर दिसते तोवर कब्रस्तानवासाची जुळवाजुळव कर. बेटा! आपल्याजवळ माया असणे हे फायद्याचे आहे. पण तीच खाऊन फस्त करणाऱ्याला कसला लाभ होणार? आता कमरेपर्यंत पाणी आले आहे. महापूर लोटण्याच्या अगोदर ईशाराधना आटोपून घे. डोळ्यातून अश्रू गाळण्याचा हाच मोका आहे. तोंडात जीभ आहे तोपर्यंतच पश्चात्ताप व्यक्त कर. देहात आत्मा आणि तोंडात वाचा ही सदासर्वकाळ राहणारी नव्हेत. आज अनुभविक माणसांचे बोल ऐक, नाही तर नकीर आणि मुनकर हे दोघे देवदूत तुझ्या थडग्यात येऊन तुझी कसून चाचणी घेतील. तुला तुझ्या भाग्याने प्राण लाभला आहे कारण प्राणाविणे देह म्हणजे पाखराविणे पिंजरा! सारे आयुष्य रडगाणे गाण्यात घालवू नकोस.

* * *

एका मनुष्याला मृत्यू आला. तेव्हा दुसरा एकजण गळा काढून रडू लागला. एका समजदार माणसाने त्याचा शोक पाहून म्हटले, "तुझ्या रडण्याने मृतात्म्याला क्लेश होतो. त्याच्या अंगी सामर्थ्य असते तर तो थडगे फोडून बाहेर आला असता आणि त्याने तुला दटावून सांगितले असते, मी मेलो म्हणून तुला इतका आकांत करण्याचे काहीच कारण नाही. मी मेलो त्यात वावगे काहीच झाले नाही. फक्त तुझ्यापेक्षा दोन दिवस अगोदर मी माझा मुक्काम हालवला एवढेच. आपल्यालाही मरण आहे हे विसरून गेला आहेस वाटते? म्हणूनच माझ्या मृत्यूमुळे तू एवढा दुःखी आणि दुबळा झाला आहेस. मयताला पाहून त्याच्यावर फुले वाहणारे त्याच्यासाठी म्हणून काहीच करत नसतात तर फक्त आपल्या दुःखी मनाचे समाधान करून घेतात.

जन्मास आलेले मूल मेले म्हणून रडण्याचे काय कारण? येताना ते शुद्ध अवस्थेत आले होते आणि शुद्ध असतानाच निघून गेले, तू सुद्धा शुद्ध स्वरूपात जन्मला होतास म्हणून नेमधर्म पाळ आणि शुचिर्भूत राहा. कारण अशुद्ध स्थितीत मृत्यू येणे लांछनास्पद ोय. प्राणपाखराने तुझ्याशी असलेला संबंध तोडून टाकण्याअगोदर त्याचे पाय बांधून

ठेव. तू बरेच दिवस भलत्यांच्या जागेत बसला आहेस. म्हणून तुझ्या जागी दुसरे कोणीतरी बसणार आहेत. तू पहिलवान असशील किंवा शूर शिपाई असशील पण तुझ्या कफनाच्या कापडाशिवाय तुझ्याबरोबर आणखी काही येणार नाही. नीलगाय फासा तोडून निघेल तर वाळूत रुतून बसेल.

तुझे पाय कबरीत अडकून बसण्याअगोदर तुझ्या अंगी वळवळ करण्याचे सामर्थ्य असू दे. या जुनाट घरावर प्राण वेचू नकोस. कारण घुमटावर फेकलेले आक्रोड तेथे टिकत नाहीत. फक्त तुझ्या हाती असलेल्या क्षणाचा चोख हिशेब ठेव."

* * *

जमशेद बादशहाचा मुलगा मेला तेव्हा त्याचा देह सुकुमार असल्यामुळे रेशमाचे कफन शिवून त्याच्या अंगात घालण्यात आले. जमशेद काही दिवसांनंतर आपला शोक प्रकट करण्यासाठी कब्रस्तानात आला. त्याचे रेशमी कफन फाटलेले पाहून तो स्वतःशीच म्हणाला, "मी माझ्या सामर्थ्यामुळे कृमीकीटकापासून या रेशमाचा बचाव केला होता पण त्यांनी कबरीत त्याचा फन्ना उडविला.

एक गायक होता. त्याच्या या दोन काव्यपंक्तीनी माझ्या काळजाचे पाणी केले होते. 'हाय ! मी मेल्यावर देखील फुले फुलणारच आहेत आणि 'लाला' चे ताटवे बहरणारच आहेत. वसंत आणि हेमंताच्या कित्येक फेऱ्या होतील, तेव्हा मी मात्र माती किंवा वीट झालेला असेन."

* * *

एका देवभोळ्या सौजन्यमूर्तीला एक सोन्याची वीट सापडली. सुवर्णाने त्याची बुद्धी चळली आणि त्याचे शुद्ध अंतःकरण नाना प्रकारच्या विचारांनी काळवंडून गेले. रात्रन् रात्र तो आपल्या संपत्तीच्या विचारात घालवू लागला आणि म्हणू लागला की, "ही माया माझ्या हयातभर पुरेल. आता यापुढे मला ओशाळून कोणापुढे हात पसरावे लागणार नाहीत. एक छानपैकी बंगला बांधीन. त्यात संगमरवरी लादी असावी. चकाकणारे छत, सुबक सागवानी लाकडाचे असावे. भेटावयाला येणाऱ्यां-साठी सुंदर दिवाणखाना हवाच ! त्याच्यासमोर फुलबागही हवी. माझे आयुष्य माझ्या लक्तरांना ठिगळावर ठिगळे लावण्यात गेले. त्यापायी मला किती लोकांची बोलणी ऐकून मान खाली घालावी लागली. बस्, यापुढे मात्र जेवण बनविण्यासाठी स्वयंपाकी ठेवीन. अगदी आरामात माझ्या जिवाचे कोडकौतुक करीन. कांबळ्याच्या कडक अंथरुणाने माझ्या अंगाची दैना झाली. आता घ्या म्हणावे ! माझा बिछाना तरी पाहा ! तो असल्या भ्रामक विचारात गढून गेला. त्या विचारांनी त्याचे डोके बिथरले. आता त्याला देवाची आळवणी, दैन्य भाकणे असल्या कामासाठी फुरसत कोठे होती ? खाण्यापिण्याची किंवा नमाज-नवसांची त्याला फिकीर नव्हती. गर्वाने

ताठून तो रानोमाळ भटकू लागला, कारण त्याला कोठेही बसल्याने किंवा वास्तव्य केल्याने चैन पडत नसे.

एकजण कबरीची माती कालवून विटा बनवीत होता. ते पाहून तो सज्जन म्हातारा स्वत:शी म्हणाला,

"अविचारी मना ! जरा यापासून बोध घे. या सोन्याच्या विटेत काय रमून बसला आहेस ! कधीकाळी तुझ्या देहाचीच वीट बनणार आहे. माणसाला लोभ जडला तर एखाद्या घासाने त्याचे समाधान होणार नाही. अभाग्या ! टाकून देही वीट ! एक वीट काही नदी अडवू शकणार नाही. तू संपत्ती आणि फायद्याच्या विचारात गाफील झाला आहेस आणि तुझ्या आयुष्याचे भांडवल संपत आले आहे. या जमिनीवर इतक्यांदा वादळ उठणार आहे की, आमच्या देहकणांचा थांगपत्ता लागणार नाही. लोभाच्या धुळीमुळे तुझ्या दृष्टीला काही दिसत नाही आणि लालसेच्या उष्ण वाऱ्याने आयुष्याच्या शेताचे पीक जळाले आहे. तुझ्या डोळ्यांतील गाफीलपणाचे काजळ पूस. कारण उद्या मातीच्या ढिगाखाली तुझाच सुरमा होणार आहे."

## दोन माणसांतील वैर

दोन माणसे एकमेकांचे हेवेदावे आणि कुरापत काढण्यात मशगूल झाली होती. चित्याप्रमाणे ते एकमेकांवर चालून जात. एकाचे तोंड दुसरा पाहात नव्हता त्यामुळे त्यांचे जीवन फार अवघड झाले होते.

त्यांपैकी एकावर मृत्यूने घाला घातला. त्याच्या सुखासमाधानाचे दिवस संपले होते. हे पाहून त्याच्या वैऱ्याला हायसे वाटले. पुढे काही दिवसांनी तो त्याच्या थडग्याजवळून जात असताना त्याच्या मनात विचार आला की "तो जिवंत असताना त्याचे घर सोन्याने मढवलेले होते. पण आता त्याची कबर धूळ खात पडली आहे." मनातील आकसामुळे त्याने त्या कबरीचा एक दगड काढून टाकला. पण त्याला खड्डयात दिसले ते एका बादशाहाचे डोके. डोळे मातीने भरलेले. त्याचे अस्तित्व कबरीच्या कारागृहात बंदिस्त झालेले होते. त्याच्या देहाचा कृमिकीटकांनी फन्ना आरंभला होता. कालचक्रामुळे त्याचे मुखचंद्र अगदी आखडून गेले होते आणि नियतीच्या अत्याचारामुळे त्याच्या देहाच्या सरूचे झाड काडीप्रमाणे झाले होते. दैवगतीने त्याच्या तळव्यापंज्यांची फारकत केली होती. त्याची अवस्था पाहून त्याला रडू कोसळले आणि त्याच्या अश्रूंनी कबरीची माती भिजून चिंब झाली. त्याला आपल्या कृत्याची खंत वाटली. त्याच्या हुकमावरून त्याच्या थडग्याच्या दगडावर अशी अक्षरे लिहिली गेली,

"कोणाच्या मरणाने हुरळून जाऊ नका. त्याच्या मृत्यूनंतर दैव तुम्हाला फारशी उसंत देणार नाही."

हे त्याचे बोलणे एका भाविक मनुष्याने ऐकले. तो म्हणाला,

"सर्व समर्थ परमेश्वरा ! हा मनुष्य आपल्या शत्रूसाठी ढसढसा रडतो आहे ! तेव्हा तुला त्याची कीव येणार नाही तरच नवल. आमच्या देहाची स्थितीदेखील अशीच होणार आहे आणि आमचे दुष्मन त्यासाठी अश्रू ढाळणार आहेत. माझ्या शत्रूने देखील मला क्षमा केलेली पाहून माझ्या मित्राला (देवाला) जरूर करुणा येईल."

कधी काळी तुम्ही हे डोके पाहाल तेव्हा म्हणाल की त्यात डोळेच नव्हते. एके दिवशी मी कुदळीनी माती खणली तेव्हा मला एक करुणस्वर ऐकू आला, 'कुदळ जरा बेताने चालवा हो ! या मातीत कानाडोळ्यासारखी नाजुक अंगे पसरलेली आहेत.'

## बाप आणि मुलीची गोष्ट

एकदा रात्रीच्या वेळी दुसऱ्या दिवशी प्रवास करण्याचा बेत करून मी झोपी गेलो, पण योग्य वेळी काफिल्यात दाखल झालो. सोसाट्याचा वारा सुटला होता आणि त्यामुळे काफिल्यातील लोकांची दृष्टी मंदावली. वाटेत एका घरात एक मुलगी आपल्या बापावरची धूळ चादरीने झाडत होती. वडील म्हणाले, "बाळ, प्रेमामुळे माझे अंतःकरण भारावून गेले आहे. माझ्या डोक्यावर चादरीने झाडण्याएवढी धूळ पडलेली नाही. तुझे सुंदर शरीर बेलगाम घोड्याप्रमाणे वार्धक्याकडे दौड करीत आहे. मृत्यू कोणत्याही क्षणी पायातील रिकीब तोडून टाकील. त्या वेळी खाली वाकल्यानेही लगाम हाती लागणार नाही."

तुम्हांला तुमच्या देहाच्या पिंजऱ्याचीच काय ती जाणीव असते. तुमचे प्राण हे पाखरू असून त्याचे नाव आहे "चैतन्य".

पिंजरा उघडून पक्षी उडून जाईल तेव्हा तुम्ही बरीच धडपड करूनही पक्षी परत पिंजऱ्यात येणार नाही.

ही दुनिया नश्वर असली तरी काही दिवस येथे जगता येते याचे समाधान माना ! शहाणी माणसे देवभजनात थोडा वेळ घालविण्यास मिळाला तर पृथ्वीचे स्वामित्व लाभल्याचे सुख अनुभवतात. दिग्विजयी शिकंदर साऱ्या जगाचा स्वामी होता; पण त्यालाही हे जग सोडावे लागले. जगाच्या स्वामित्वाच्या मोबदल्यात मरण काही काळ पुढे ढकलण्याचीही त्याला सवलत मिळाली नाही. या पृथ्वीवर आलेला प्रत्येकजण परत गेला आणि त्याने पेरले होते तेवढ्याचीच त्याने कापणी केली. शिल्लक राहिला तो त्याचा चांगला किंवा वाईट लौकिक. आमचे मित्र सगळे निघून गेले आणि आम्ही सुद्धा मार्गस्थच आहोत. तेव्हा या जगात आमचे मन का गुंतून पडावे ? आम्ही मेल्यावर देखील बागा फुलतीलच आणि आमची मित्रमंडळी गुजगोष्टी करतीलच. दुनियानामक दयिता बेभरवशाची आहे. तिच्या मोहात पडू नकोस ! जो मरून थडग्यात चिरनिद्रा उपभोगतो त्याच्या तोंडावरील धूळ कयामतीच्या दिवशी झाडली जाईल. आज गाफीलपणाच्या पांघरुणातून डोके वर काढा म्हणजे कयामतीच्या दिवशी खंत वाटून डोके खाली घालावे लागणार नाही.

जो वाटसरू प्रवास आटोपून मायदेशी म्हणजे शिराजला परततो तो प्रथम अंघोळ करतो. अपराधी प्राण्या ! थोड्याच दिवसांत तू एका नव्या जगात प्रवास करणार आहेस.

दोन्ही डोळयांनी अश्रुविमोचन कर आणि जो काही कश्मल राहिले असेल ते धुऊन काढ.

## बालपणातील एक हकीकत

मला माझ्या वडिलांचा काळ आठवतो. देव सदा त्यांच्यावर कृपाळू राहो. त्यांनी मला लहानपणी पाटी आणि पुस्तके घेऊन दिली होती. सोन्याची एक छान अंगठी पण बनविली होती.

एके दिवशी आकस्मिकपणे मला एका गिऱ्हाइकाने गाठले आणि खजुराचे आमिष देऊन माझी अंगठी काढून घेतली. लहान मुलाला अंगठीची किंमत कशी कळणार ? म्हणून काहीतरी गोड गोड देऊन ती त्याच्याकडून काढून घेणे सोपे असते. तुला देखील आयुष्याची किंमत कळलेली नाही. कारण ऐषआरामाच्या मोबदल्यात तू ते खर्चून टाकले आहेस.

कयामतीच्या दिवशी सज्जन मोठ्या पदावर चढतात ! जमिनीवरून ते आकाशाला पोहोचतात. पण आपली कोणती कुलंगडी बाहेर पडणार आहेत या कल्पनेने लाज वाटून तुझे मस्तक खाली झालेले असेल ! बांधवा ! वाईट कामे करण्याची तुला खंत वाटू दे. नाहीतर सज्जनांना पाहून तुला लाजेने मान खाली घालावी लागेल.

कयामतीच्या न्यायदानाच्या दिवशी जेव्हा मनुष्याच्या युक्ती आणि कृती यांची चौकशी सुरू होते तेव्हा मोठ्या बहाद्दरांचेही धैर्य खचते. ज्या गोष्टींबद्दल पैगंबर सुद्धा भयभीत झालेले असतात तेथे तुला तुझ्या अपराधांची मखलाशी कशी करता येईल ? भक्तिभावाने देवाची आराधना करणाऱ्या स्त्रिया धर्माचार-विहीन पुरुषांपेक्षा श्रेष्ठ ठरतात. स्त्रियादेखील तुझ्यापेक्षा मोठ्या पदवीवर पोहोचतात हे पाहून तुला आपल्या पौरुषाची चीड यावयाला हवी.

बायकांना त्यांच्या विशिष्ट अडचणी ध्यानात घेऊन देवपूजेची सूट दिली जाते. तुला कसलीच अडचण नसताना तू विटाळशीबाईसारखा कोपऱ्यात का बसतोस ? बायकांपेक्षा कमी दर्जाच्या माणसा ! जा ! पौरुषाच्या वल्गना बंद कर.

मला पामराला वाणीचे वरदान कोठ आहे ? तरी कविकुलगुरू अनवरीने[१२०] जे म्हटले आहे ते ऐक —

"भ्रांत मानवा, मी काय बोलतो त्याच्याकडे लक्ष देऊ नकोस. पुढे येणारी पिढी काय म्हणेल ते ध्यानात घे. तू सत्याचा आग्रह सोडलास तर सन्मार्गापासून दूर राहशील. तुझी योग्यता बायकांपेक्षा कमी झाल्यावर तुझ्या पौरुषाची काय वाट लागेल ? "

ऐषआरामाने देह पोसला गेला तर थोडया वेळात ते सुखच तुझा शत्रू बनते. एकाने एक लांडग्याचे पिलू पाळले होते. ते वाढून मोठे झाल्यावर त्याने आपल्या मालकाच्याच चिंधडया उडविल्या. त्याचा प्राण जाण्यापूर्वी एक अनुभवी मनुष्य त्याच्याजवळ येऊन म्हणाला, "तू आपल्या शत्रूला सुखात ठेवण्यासाठी एवढे कोडकौतुक का चालविले होतेस ? एखादे दिवशी तो तुझ्यावरच हल्ला करील, असे तुला कसे वाटले नाही ?"

सैतानानेच आमच्याबद्दल असे हीन उद्‌गार काढले होते की आम्हा लोकांकडून दुष्कर्माशिवाय काहीच घडणार नाही.

आमच्यातील दोषांबद्दल आम्ही स्वत:वरच फिर्याद केली पाहिजे. नाहीतर सैतानाचे म्हणणेच खरे ठरेल. त्यापायी सैतानाला आम्हा लोकांवर सत्ता मिळविल्याचा आनंद होईल हे पाहूनच देवाने त्याला स्वर्गातून हाकलून दिले. सैतानाशी मैत्री आणि खुदाशी शत्रुत्व असे झाल्यावर आम्ही लाजेने आपले तोंड कोठे लपवावे ? तू शत्रूशी हितगूज करतोस तेव्हा मित्र तुझ्याकडे कसा पाहील ? तुला फायदेशीर मैत्री हवी असेल तर तू दुष्मनांचा हुकूम कदापि मानू नकोस.

तुझे मन पैगंबर युसुफापासून म्हणजे श्रेयापासून विमुख झाले आहे. तेव्हा तू तुझ्या खोटया नाण्यांनी काय विकत घेऊ शकशील ?

तू आपल्या मित्राशी परकेपणाने वागतोस आणि शत्रूला घरात आणून बसवतोस पण तुझ्या घरी शत्रूचे वास्तव्य आहे असे कळून आल्यावर तुझा मित्र तुझ्या घरी पाऊल कसा बरे ठेवील ?

* * *

एक मनुष्य बादशहाशी भांडला होता म्हणून बादशहाने मारेकऱ्यास त्याचा वध करण्यास सांगितले. मारेकऱ्याच्या तावडीत सापडल्यावर तो मनुष्य ओरडू लागला, "मी जर परममित्र (बादशहास) चिडविले नसते, तर ह्या मारेकऱ्याचा अत्याचार मला का सोसावा लागला असता ? "

तू शहाणा असशील तर मित्राशी भांडू नकोस. म्हणजे तुझ्या शत्रूला तुला हैराण करता येणार नाही. जो आपल्या मित्राला छळतो त्याचे त्याचा शत्रू सालडे काढतो. तू मित्राशी वाचामनसा एकरूप हो म्हणजे तेवढयानेच शत्रूचे धाबे दणाणून जाईल. पण केवळ शत्रूलाच बरे वाटावे म्हणून मित्राला त्रास देणे ही माझ्या मते लाजिरवाणी गोष्ट होय."

* * *

एका मनुष्याने दगलबाजी करून दुसऱ्याच्या मालावर तावा मिळविला आणि जेव्हा लोक त्याच्यावर टीका करू लागले तेव्हा तो म्हणाला, "मी काय करू ? सैतानाने माझी बुद्धी बिघडविली ! "

तो पुढे चालू लागला तेव्हा सैतान त्याला गाठून म्हणाला, "मी तुझ्यासारखा मूर्ख मनुष्य अद्याप पाहिला नाही. माझ्याशी मैत्री राखण्यातच तुझे कल्याण आहे. तेव्हा उगाच का लोकांशी भांडत बसतोस ? "

तू अक्कल लढवून आणि निडरपणा दाखवून जे काही करतोस त्याची वाईट नोंद मात्र देवदूत लिहून ठेवतील. आता तो मार्ग सोड. सामतंत्राचा अंगीकार कर आणि कोणा मोठ्या माणसाला मध्ये घालून आपली लाचारी कबूल कर. कारण आयुष्याची मुदत संपल्यावर कोणासही एका क्षणाचीदेखील संधी मिळत नाही. तुझ्यापाशी काम करण्याची ताकद नसेल तर परावलंबी माणसाप्रमाणे आपली रडकथा दुसऱ्यांना ऐकवत जा. तुझे दुष्कर्म प्रमाणाबाहेर गेले आणि तू दिलगिरी व्यक्त करून आपली चूक कबूल केलीस तर त्याला लोक सत्कृत्यच समजतील.

तडजोडीचा मार्ग मोकळा असेल तर त्याचा एकदम अवलंब कर. कारण तो कोणत्याही क्षणी बंद होणारा असतो. अरे बेट्या ! पापांचे ओझे वाहून हिंडू नकोस कारण ओझे वाहून चालणाऱ्या मजुरावर नाना प्रकारची संकटे येतात.

तू सज्जनांचे अनुकरण कर. ज्याला हे भाग्य लाभते तो विजयी होतो. पण तू विकारांच्या आहारी जात आहेस. तेव्हा तुला सज्जनांशी संगत कशी करता येईल ? पैगंबरांनी दाखविलेल्या मार्गाचा अवलंब करणाऱ्याचीच देवदूत संभावना करतो. आपले ध्येय गाठण्यासाठी तू सरळ मार्गांनी चाल. तुझी वाट चुकली आहे, तेव्हा तू मागेच फिरणार. तेल्याने डोळे बांधलेल्या घाण्याच्या बैलाप्रमाणे सकाळपासून संध्याकाळपर्यंत चालून देखील तू होतास तिथेच आहेस.

* * *

चिखलाने माखलेला एक मनुष्य मशिदीत शिरला. त्याला आपल्या दुर्दैवाची फार हळहळ वाटत होती. एकजण त्याला झिडकारून बोलला, "तुझे दोन्ही हात तुटून जावोत ! असल्या पवित्र स्थळी घाणीने बरबटून तू येऊ नकोस ! "

मला हे दृश्य पाहून फार वाईट वाटले. मशीद म्हणजे पृथ्वीवरील स्वर्ग अणि ती शुद्ध असते. येथे येऊ इच्छिणारेही पाक असतात. अपराध्यांच्या कश्मलाने कलंकित झालेल्या माणसाला तेथे जाण्याचे काय कारण ?

स्वर्ग हा उपासकाला लाभतो. ज्याला रोकड माल हवा असेल त्याने आपल्याबरोबर भांडवल न्यावे. म्हणून सांगतो की आपल्या अंगावरील अपराध-कश्मल धुऊन टाक. कारण कदाचित पश्चात्ताप-शुद्धीचाही दरवाजा बंद होईल. भाग्याचे पाखरू हातातून उडून गेले या म्हणण्यात काही अर्थ नाही. कारण अजून बरेच आयुष्य जगण्याचे आहे. उशीर झाला असला तरी झट्दिशी आणि हुशारीने ईशोपासना कर. कोणतीही चांगली गोष्ट घडून येण्यास उशीर लागला, तरी ते तितके वाईट नाही. अजून मृत्यूने तुझ्या संकल्पावर बंदी घातलेली नाही म्हणून अल्लाहच्या

दरबारात तौबा करण्यासाठी हात वर कर ! गुन्हेगारा, आता गाफील राहू नकोस ! आपल्या अपराधामुळे तुला झालेला पश्चाताप व्यक्त करण्यासाठी तुझ्या डोळ्यांतून अश्रू वाहू देत. आपली अब्रू जाणार असे कळल्यावर तू खुदाच्या दरबारातच अब्रू उधळून आपला पश्चात्ताप व्यक्त कर. आता जर तुझ्या डोळ्यांत टिपूसदेखील येत नसेल तर आपल्यापेक्षा अधिक अब्रूदार आणि प्रतिष्ठित अशा माणसाचा आधार घे.

जर देव माझ्यावर रागवून आपल्या दारातून मला घालवून देईल, तर मी मोठ्या साधुसंतांचा वशिला आणीन.

## एक आठवण

मला माझ्या बालपणातील एक गोष्ट आठवते. मी ईदीच्या दिवशी माझ्या वडिलांबरोबर बाहेर गेलो होतो. वाटेत लोकांचे खेळणे बागडणे पाहण्यात मी गर्क झालो होतो आणि त्यामुळे माझी आणि माझ्या वडिलांची चुकामूक झाली. मी त्या भयंकर प्रसंगी घाबरून गेलो आणि ओरडू लागलो. अचानकपणे वडिलांनी येऊन माझे कान धरले, " अरे कारट्या ! तुला कितीदा तरी बजावले होते की तू माझं बोट सोडू नकोस ! " लहान पोर आपलेआपण मुक्कामास पोचत नसते. ते पूर्वी कधी गेलेले नसते म्हणून त्याला रस्ता सापडत नाही.

तू देखील वाटेने जाणारे बाळ आहेस. म्हणून सांगतो, भल्या माणसा, जा, आणि कोणा गुरूचा आश्रय मिळव. हलक्या लोकांशी संगत ठेवू नकोस. जर त्यांच्या मेळाव्यात रमलास तर तुझ्या इभ्रतीचे खोबरे होईल. शुद्ध आचरणाच्या लोकांचा तुझ्यावर पगडा बसावा. शहाणा माणूस अशा प्रकारच्या लाचारीची खंत मानीत नाही. भाविक लोक भोळसटपणात लहान मुलांच्याही पलीकडचे असतात आणि साधुसंत —मशायख— हे भिंतीसारखे मजबूत असतात. कसे चालावे हे भिंतीचा आधार घेऊन चालणाऱ्या बच्चापासून शीक. शुचिर्भूत आणि सत्शील मंडळींच्या सहवासात असणारा दुष्कर्मी कचाट्यातून मुक्त असतो. हवा असेल तर दरवेशांचा सहवास पत्कर, कारण त्यांची संगत बादशहांना देखील हवी असते. जा आता ! सादीप्रमाणे तूही वरदान माग आणि ईश्वरी प्रसादाची दौलत पदरात पाडून घे.

## आपले धान्यकोठार जाळणारा वेडा

एकाने भाद्रपद महिन्यातच खूप धान्य साठवून ठेवले आणि माघ महिन्यात टंचाई वाटू नये अशी व्यवस्था केली. एकदा रात्रीच्या वेळी तो धुंदीत आला आणि त्या मूर्खाने आपले धान्याचे कोठारच पेटवून दिले.

दुसऱ्या दिवशी आपल्या संग्रही एक दाणाही नाही हे पाहून तो पुन्हा धान्यासाठी भटकू लागला. लोकांनी त्या फकिराची दैना पाहिली. त्या वेळी एक मनुष्य आपल्या मलाला म्हणाला, " ह्या माणसाला अवदसा आठवली तशी तुझी गत होऊ नये

यासाठी तू मस्तीने आपले साठे जाळू नकोस. तुझे आयुष्य दुष्कर्मात घालविलेस तर ते काम कोठार जाळण्यासारखे होय."

आपले कोठार जाळून नंतर इकडून तिकडून भीक मागून धान्य गोळा करणे ही मोठी लाजिरवाणी गोष्ट ! माझ्या लाडक्या! धर्माचे बीज नष्ट करू नकोस! आपल्या इभ्रतीच्या कोठाराला आग नको लावू ! कोणा हतभाग्याला अवदसा आठवली तर बुद्धिमान मनुष्य त्यापासून योग्य बोध घेतो. तुझ्यावर दैवी कोप कोसळण्याअगोदर पश्चात्ताप प्रकट कर. तुला शिक्षा ठोठवल्यावर तुझ्या रडण्याचा काही उपयोग होणार नाही. गाफिलपणाच्या पांघरुणातून डोके वर काढ म्हणजे तुला कयामतीच्या न्यायदानाच्या दिवशी मान खाली घालावी लागणार नाही.

* * *

एकजण एक वाईट कृत्य करीत असताना एक साधू त्याच्याजवळून जात होता. त्याला पाहून त्याने लाजेने मान खाली घातली. त्याला दरदरून घाम फुटला व तो म्हणाला, "मोहल्यातील मोठ्या माणसाला पाहून मला लज्जा वाटते."

त्याचे बोलणे ऐकून त्या सज्जनाला राग आला आणि तो ओरडला, "तरुणा ! ईश्वर असताना त्याला सोडून माझ्यासमोर ओशाळवाणा होतोस याची तुला लाज वाटावी ! तुझे कोणीही सांत्वन करू शकत नाही. तेव्हा ईश्वराप्रत आपले जे कर्तव्य आहे ते पार पाडलेस म्हणजे झाले !"

स्वकीय आणि परकीय माणसांना पाहिल्यावर जशी खंत वाटते तशी ईश्वराविषयीही लाज वाटली पाहिजे.

* * *

जुलेखा[११] प्रेमसुरेने उन्मत्त होऊन युसूफला चिकटली. कामवासनेच्या सैतानाने तिला इतकी धीट बनविली की ती लांडग्याप्रमाणे युसूफवर तुटून पडली. इजिप्तच्या राणीपाशी एक संगमरवरी मूर्ती होती व ती सदा तिच्यापाशी असे; पण या वेळी त्या मूर्तीला आपले कृत्य आवडणार नाही या समजुतीने तिने तिचे तोंड आणि मस्तक झाकून टाकले.

बिचारे पैगंबर युसूफ वैतागून थंड बसून राहिले. आपल्याला केविलवाणे बनविणाऱ्या कामवासनेपायी त्यांनी आपल्या कपाळावर हात मारला. जुलेखाने त्याच्या दोन्ही हातापायांचे चुंबन घेतले; आणि ती म्हणाली, "तुम्ही कसे हो असे आळशी ! तुम्हास काही सुचतच नाही मुळी. या इकडे ! हृदय कठोर करून आपले तोंड फिरवू नका आणि कसला तरी विचार करत हा मोका हातचा घालवू नका !" युसूफांच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. ते म्हणाले, "जा बाई ! मी हरामी काम करीन, अशी तू आशा बाळगू नकोस. तू तर स्वतः दगडाच्या मूर्तीपुढे लाजतेस, मग मला ईश्वराची लाज नको का वाटावयाला ?"

आयुष्याचे सारे भांडवल संपल्यावर लाज वाटून देखील काय फायदा ? परिणामी तुझीच बेअब्रू होईल.

पश्चात्ताप आणि खंत आजच प्रकट कर. कारण उद्या तुला बोलण्याला देखील संधी मिळणार नाही.

* * *

मांजराने जर एखाद्या चांगल्या जागी मलविसर्जन केले तर ती वाईट गोष्ट झाली असे समजून ते मातीनें झाकून टाकते. तू वाटेल त्या वाईट गोष्टी करीत असतोस. पण लोकनिंदेची बूज राखत नाहीस. आपल्या धन्याला झिडकारणाऱ्या दासाचा विचार कर ! तो पळून जाऊन पश्चात्तापाने परत आला तर त्याला पुन्हा बांधून ठेवत नाहीत. ज्याचा मुकाबला करण्याची तुझ्याजवळ ताकद असेल त्याच्याशीच भांडण काढ, नाहीतर त्या वाटेलाच जाऊ नकोस. आपल्या बऱ्यावाईट कृत्यांचा हिशेब वेळीच केलेला बरा. एकदा चित्रगुप्ताची यादी प्रसिद्ध झाल्यावर काहीही करता येत नाही.

कयामतीचा दिवस उगवण्याअगोदर जो पश्चात्ताप करतो त्याने वाईट काम केले असेल तरी ते न केल्यासारखेच. आरशावर सुस्कारा सोडल्याने तो मलिन होतो, पण पश्चात्तापाच्या नि:श्वासाने हृदय मात्र स्वच्छ होते. आत्ताच, या क्षणी आपल्या दुष्कर्मांची खंत मानलीस तर कयामतीच्या दिवशी तुला कोणाची तमा बाळगण्याचे कारण राहात नाही.

एकदा मी मुशाफरीत एका आनंद-मेळयात शिरलो. मनाची चिंता दूर झाली होती आणि सुखद अनुभव येत होते. पुढे वाटेत एका ठिकाणी उंच चबुतरा पाहिला. तेथे काही गरीब माणसांना बांधून ठेवले होते. मी लगेच पुढे निघून जाण्याचा विचार केला आणि पक्षी पिंजऱ्यातून निसटावा तसा झपाझप पावले टाकीत रानात शिरलो. एकाने मला सांगितले की ते लोक चोर आणि लुटारू होते. आणि त्यांना उपदेश केल्याचा काही उपयोग झाला नव्हता. त्यांना सत्याची चाड नव्हती.

जर तुझ्या हातून कोणाचा छळ झाला नसेल तर, गुन्हेगारांना पकडणाऱ्या काळाच्या कोतवालाची तुला का भीती वाटावी ?

अब्रूदार माणसाला कोणी पकडून ठेवीत नाही. तू भगवंताचेच तेवढे भय बाळग आणि शेठजीला मुळीच भिऊ नकोस. जोपर्यंत कोणा अधिकाऱ्याची कुलंगडी बाहेर पडत नाहीत, तोपर्यंत तो कचेरीच्या जाब विचारण्याला काहीच भीक घालीत नाही. जर त्याने पैशाची अफरातफर केली, तर हिशेब सांगताना त्याची घाबरगुंडी उडते. जर मी माझी नोकरी उत्तम प्रकारे करीन, तर माझे शत्रू माझे काय वाईट करू शकतील ? जर कोणा दासाने मनोभावे सेवा केली तर त्याचा मालक त्याच्यावर

खूष होतो. ईशोपासनेच्या बाबतीत ज्याचे विचार कच्चे असतील त्याने माणसांची सेवा करण्यापेक्षा गाढवे राखणेच योग्य ठरेल. तू उत्तम कार्य करून देवदूतांपेक्षा श्रेष्ठ हो. तू काहीही सेवा केली नाहीस तर जनावरांपेक्षा हिणकस ठरू शकशील.

* * *

वामगानच्या बादशहाने एका मनुष्याला काठीने चोप दिला. त्याने ढोलकी-सारखा मोठा आवाज काढून फिर्याद केली. दुःखातिशयाने त्याला रात्री झोप लागली नाही. तेव्हा एक साधू मनुष्य त्याच्याजवळ येऊन म्हणाला, " रात्रीच जाऊन कोतवालाकडे क्षमा मागितली असतीस तर तू दिवसा केलेल्या गुन्ह्याची शिक्षा तुला भोगावी लागली नसती. जो मनुष्य रात्रीच्या वेळी प्रार्थना करून अपराधांची क्षमा मागतो त्याला कयामतीच्या न्यायदानाच्या दिवशी ओशाळवाणे व्हावे लागत नाही. तू जर शहाणा असशील तर तू दिवसा केलेल्या पापांबद्दल रात्रीच्या वेळी प्रार्थना करून क्षमायाचना कर. अजून देखील काही तडजोड व्हावी असे तुला वाटत असेल तर डरो मत ! क्षमाशील परमेश्वर क्षमायाचकाला आपला दरवाजा कधीच बंद करीत नाही. तुला जन्मास घालणारा परमेश्वर तू अधोगतीस जात असताना तुला मदतीचा हात न देईल तर ते नवलच म्हटले पाहिजे. तू खरा दास असशील तर हात पसरून क्षमा माग आणि तुला लाज वाटत असेल तर अश्रू गाळून शोक करीत बैस."

अल्लाहच्या दरबारात जाऊन अश्रू गाळून क्षमायाचना केल्यावर आपले पापमोचन न होता कोणी परत आला असे कधी झालेले नाही. जो आपल्या पापाबद्दल मनःपूर्वक शोक प्रकट करतो त्याची देव बेअब्रू कधीच करीत नाही.

## श्रद्धेचा प्रकाश निर्माण करा

सिनआ या गावी माझा मुलगा मेला. मला झालेले अनिवार दुःख वर्णनापली-कडचे आहे.

परमेश्वराच्या हुकमाने युसूफसारखा सुंदर मुलगा जन्मतो काय आणि लगेच कब्रस्तानचा मासा यूनूसला[१२] गिळल्याप्रमाणे गिळतो काय; सारे नवलच ! या उद्यानात एकही सरूचे झाड असे नाही की ज्याला काळाने धुळीस मिळविले नाही.

काय म्हणतोस ? मातीतून फूल उगवले ? अरे त्यात काय नवल ! त्या मातीत फुलासारखे कित्येक चेहरे मिळाले आहेत की ! मी स्वतःला म्हटले, " तू मानवजातीचा कलंक आहेस ! मुलगा शुद्ध स्थितीत मरतो आणि बुड्ढा पापात जगतो !" त्या पुत्रावरील प्रेमाच्या वेडाने जेव्हा मला भारून सोडले तेव्हा मी त्याच्या थडग्याचा एक दगड बाजूला सारला. भीतीमुळे त्या काळोख्या भयाण जागेत मी फार कष्टी झालो होतो आणि माझी शुद्ध हरपली. शुद्धीवर येऊन माझे डोके

ताळयावर येताच माझ्या कानात माझ्या लाडक्याचे हे शब्द घुमले: " जर तुम्हांला काळोख्या रात्रीची भीती वाटत असेल तर श्रद्धेच्या प्रकाशाचा उपयोग करावा लागेल. तुम्हांला कब्रस्तानात काळोखाऐवजी प्रकाश हवा असेल, तर तुम्ही पूर्वा-युष्यात सत्कर्मे करून प्रकाश निर्माण करावा. जो बी पेरण्यास उद्युक्त होतो, तो झाड वाढून फळे हाती येतील की नाही या शंकेने संत्रस्त असतो. काही लोक मात्र असे ऐदी आणि लोभी असतात की त्यांना गहू न पेरताच सुगीची चंगळ हवी असते.

सादीने मात्र जी झाडे लावली त्यांची फळे चाखली.

शेवटी हेच खरे की पेरील त्याच्याच हाती फळ पडेल.

□ □ □

## अध्याय १०

# स्तवनमाहात्म्य

ये दोस्ता, मी आणि तू मिळून प्रार्थनेसाठी हात वर करूया. कारण उद्या मेल्यानंतर आम्हांला मातीतून हात वर करता येणार नाहीत. शिशिर ऋतूत अतिथंडीमुळे झाडे पत्रहीन होतात. तू लाचारीमुळे रिकामे हात वर करतोस. पण ईशकृपेने तेच हात खाली आल्यावर रिकामे राहात नाहीत. देवाचा दरवाजा कधीच बंद होत नाही. जो प्रार्थनेसाठी हात वर उचलतो त्याला निराश व्हावे लागेल अशी शंका तुला येण्याचे कारण नाही. सारे भक्त आणि दीनजन ईशाराधना करतात, म्हणून तूही दीनवत्सलाच्या दरबारापर्यंत तरी ये. सुकलेल्या झाडाप्रमाणे आम्ही ऊर्ध्वबाहू आहोत आणि यापेक्षा अधिक अकिंचनता आम्हांला सोसवत नाही. लोकद्वयाच्या नाथा ! तुझे दास अपराध करतात तेव्हा त्यांना क्षमा कर. देव क्षमा करील असा भरवसा असल्याने या गुलामाकडूनही गुन्हा घडला आहे. देवा तू दिलेल्या अन्नावरच आमचा पिंड पोसला गेला आहे. तुझ्या दयेची, औदार्याची आणि क्षमाशीलतेची आम्हांस सवयच जडली आहे. भक्ताने एकदा तुझ्या कृपेचा आणि वात्सल्याचा अनुभव घेतला तर त्यानंतर तो तुझी कधी पाठ सोडत नाही. तू आम्हांस या जगात मान आणि धन यांचे मालक बनविले आहेस. मरणोत्तर स्थितीत देखील असेच करशील अशी आम्ही आशा बाळगून आहोत. मानापमानांचा कर्ताकरविता तूच. तुझ्याकडून ज्याला मान लाभला त्याचा कोणी अपमान करू शकत नाही. हे मानाच्या स्वामी ! मला अपमानित करू नकोस ! माझ्या अपराधांची मला खंत वाटते.

माझ्यासारख्याच दुसऱ्या एका गुन्हेगाराला माझ्यावर लादू नकोस. त्यापेक्षा तूच मला प्रायश्चित्त दिलेस तरी चालेल. या जगात आपल्याच पातळीच्या माणसांकडून छळ सोसावा लागणे यासारखे दुसरे दुर्दैव नाही. मी तुझ्यासमोर ओशाळलो आहे एवढे पुरे. तुझ्याशिवाय मला दुसऱ्या कोणापुढे मान खाली घालावी लागू नये. माझ्यावर तुझी सावली राहिली तर, आकाशदेखील मला ठेंगणे वाटू लागेल. तू मला किरीट दिलास तर माझी मान उंचावेल. तू स्वत: होऊन माझा उद्धार कर म्हणजे मला कोणी उचलून फेकणार नाही.

मी पवित्र काअब्याचा ध्यास घेतला असल्यामुळे ईशस्तवन करताना माझी काया थरथर कापते. मी देवाला आळवून म्हणतो की मला पतित करू नकोस. कारण माझा दुसरा कोणी त्राता नाही. वाटले तर कृपावंत होत्साता मला बोलावून घे किंवा तुझ्या दारातून घालवून दे. काही केलेस तरी सारखेच कारण माझ्या मस्तकाला तुझ्याशिवाय दुजा आधार नाही. आम्ही दीनदरिद्री आणि वासनालोलुप आहोत हे

तुला माहीत आहे. प्रार्थना करणारी मंडळी प्रार्थना न करणाऱ्यांना देखील पाठीशी घालतील अशी आम्हांला आशा आहे.

शुद्धाचरण असलेल्यांच्या पुण्याईने मला दुराचारापासून दूर ठेव आणि जर कोणता अपराध घडलाच, तर मला क्षमा कर. पुण्यकर्मापासून माझी दृष्टी विमुख न होवो. प्राणोत्क्रमणाच्या वेळी माझी वाचा बंद न होवो. माझा भक्तिश्रद्धेचा दिवा तेवत राहो. दुष्कर्माबाबत माझा हात तोकडा होवो. न पाहण्याजोग्या गोष्टींच्या बाबतीत माझी नजर क्षीण होवो. अकरणीय कर्माबाबत माझ्या अंगी त्राण न राहो.

तुझ्या प्रेमापायी आत्मार्पण करणारा मी एक रजःकण आहे. तुझ्या दयादिनमणीचा एक किरण मला पुरे. तुझ्या कृपारश्मीशिवाय मला दुसरे काही दिसत नाही. पतिताला हात दे. तो पुनीत होईल. बादशहाची मेहेरनजर सुद्धा फकिराला पुरेशी असते.

मला जर कोणी चौकशी आणि दंडविधानासाठी पकडेल तर मी ओरडून सांगेन की तू मला क्षमेचे आश्वासन दिले होतेस, प्रायश्चित्ताचे नव्हे.

हे परमेश्वरा, मला तुच्छतेने लोटून देऊ नकोस. कारण तुझ्याशिवाय मला दुसरे द्वार मोकळे नाही. अज्ञानामुळे मी तुझ्या दारापासून दूर गेलो होतो, तरी मी आता पुन्हा तुझ्या दारी आलो आहे. दरवाजा लावून घेऊ नकोस.

माझ्या अपराधांबद्दल मी सबबी किती सांगू ? मी फक्त लाचारी व्यक्त करतो. मालक ! मी फकीर आहे. मला न्यायपंचायतीला उभे करू नका. फकिरावर दया करणे हा धन्याचा बाणा. मला माझ्या अल्पशक्तीची खंत वाटत नाही. कारण माझा आधार महाशक्तिमान आहे. देवा, अज्ञानामुळे आम्ही व्रतभंग केला, पण नियतीपुढे प्रयत्नांचे कसे चालेल ? आमची कमकुवत अक्कल काय साधू शकेल ? हा एक मुद्दा सबब म्हणून आम्हांस पुरेसा आहे.मी जे जे म्हणून केले ते तू सर्व फिरवून टाकलेस. देवापुढे कोणाचे काय चालते ? मी कधी तुझ्या आज्ञेची अवहेलना करीत नाही. पण तुझा हुकूमच आगळा असतो.

* * *

एका काळ्या इसमाला एकाने शिवी दिली. त्याला त्याने जे उत्तर दिले ते ऐकून शिवी देणारा चकित झाला.

" माझे तोंड मी स्वतः बनविलेले नाही. पण ते पाहूनच तू माझे न्यून काढतोस आणि माझी निंदा करतोस. माझ्या तोंडाशी तुला काय करावयाचे आहे ? माझे तोंड चांगले किंवा वाईट असेल पण ते मी बनविलेले नाही. "देवा, तू जे काही लिहिले आहेस तेच घडत आहे ! दीनानाथा ! त्यात मी बारीकसारीक फरकदेखील घडवून आणू शकलो नाही. मी असमर्थ आहे हे तुला माहीत आहे. सर्वसमर्थ तू आहेस.

मी कोणत्या झाडाचा पाला ? तू मला मार्ग दाखवशील तर माझे सर्व सुरळीत चालेल आणि जर आडमार्गी नेशील तर मात्र मला चालताही यावयाचे नाही. जगताच्या जनकाने जर साहाय्य केले नाही तर बिचारा मानव संयम तरी कसा राखू शकेल?

* * *

एका दरवेशाने रात्रीच्या वेळी पश्चात्ताप व्यक्त केला; पण सकाळ होताच व्रतभंग केला. पण जे बोलला ते मात्र मजेदार आहे.

"आम्ही व्यक्त केलेला पश्चात्ताप त्याने मानला तर ठीकच आहे. कारण आम्हा लोकांची प्रतिज्ञा त्या वेळेपुरती आणि दुर्बळ असते. माझ्या असहाय्यतेमुळे आणि हीन स्वभावामुळे माझे तोंड काळे झाले आणि माझ्या अपराधांची धूळ आस्मानाला पोहोचली." कृपाघना ! तू फक्त एकदाच वर्षाव कर. पाऊस पडला म्हणजे धूळ खाली बसते. माझ्या गुन्ह्यामुळे माझी या देशात नाचक्की झाली आहे. पण देशांतर करावयालादेखील वाव नाही. ज्यांना वाचा नसते त्यांचीही दुःखे तुला माहीत असतात. जखमी दिलांची मलमपट्टी करणारा तूच आहेस !

* * *

एक मूर्तिपूजक जगाकडे पाठ फिरवून उपासनेत गुंतला होता. त्याने तनमन-धनाने मूर्तीची पूजा केली. पुढे काही दिवसांनंतर त्या हीन धर्माला वाईट दिवस आले. तो बिचारा त्या मूर्तीच्या मंदिरात मूर्तीच्या पायावर मस्तक ठेवून चांगले दिवस येण्यासाठी मूर्तीची आळवणी करीत राहिला.

"हे प्रतिमे ! मी अशक्त झालो आहे. मला आधार दे. माझे प्राण कंठाशी आले आहेत, माझ्या कायेवर दया कर."

तो पुन्हा पुन्हा त्या मूर्तीला विनवीत होता. पण त्याला कार्यसिद्धी लाभली नाही.

अहो ! मूर्तीपासून कोणाला साहाय्य मिळणार ! तिला आपले भाग्य देखील बदलता येत नाही. (म्हणजे कोणी ती फोडावयास आला, तर ती त्याला अडवू शकत नाही !)

पुढे त्या भक्तालाच मूर्तीचा राग आला आणि तो म्हणाला, "मी व्यर्थ ह्या फंदात पडलो. माझे बरेच आयुष्य या चुकीच्या पंथात वाया गेले आणि मी तुझी पूजा करीत बसलो. आता तरी माझ्यापुढील पेच नाहीसा कर. नाहीतर मी देवापाशी तक्रार करीन."

त्या मूर्तीमुळे त्याच्या तोडाला कलंक लागला होता. पण पवित्र परमात्म्याने त्याचे मनोरथ पूर्ण केले.

एका ज्ञानी माणसाला हा प्रकार पाहून वाईट वाटले. त्याच्या तीक्ष्ण बुद्धीला-देखील या प्रकाराचे आकलन होईना !

हा मूढ मूर्तिपूजक कष्टी आणि दैन्यावस्थेत असूनही मूर्तीच्या भक्तीत रममाण झाला आहे. ह्याने आपल्या हृदयातील अधर्म घालविला नाही, की हाताचे पापकर्म थांबविले नाही ! तरीपण देवाने याची इच्छा पूर्ण केली.

तो विद्वान या विवंचनेत गुंग झाला असतानाच त्याच्या मानसकर्णात आवाज घुमला--

या बेअकली बुढ्ढयाने प्रतिमेसमोर दया भाकली पण त्याची इच्छा पूर्ण झाली नाही; पण समजा, त्या मूर्खाने मूर्तीला कंटाळून अल्लाहला आळवले आणि त्याचाही काही परिणाम झाला नाही तर त्या बिचाऱ्याला मूर्ती आणि अल्लाह यांच्यातला फरक कसा कळेल ! मित्रा, मन अल्लाहमध्ये गुंतविले पाहिजे, कारण त्याच्याशिवाय अन्य जे काही आहे ते मूर्तीपेक्षाही क्षुद्र आहे.

अल्लाहच्या द्वारी तू शिर टेकलेस तर रिकाम्या हाताने परतावे लागणे अशक्य आहे. इलाही ! आमच्या कामात पुष्कळ दोष असतात. आम्ही अपराधी आहोत, पण मोठ्या भरवशाने तुझ्याठायी आलो आहोत.

## दारुड्या आणि मशिदीचा सेवक

एक दारुड्या मशिदीकडे धावला. त्याने मशिदीच्या उंबरठ्यावर डोके ठेवून विनविले की देवा मला स्वर्गात प्रवेश दे. ' लोकांना प्रार्थनेसाठी आवाहन करणारा मुइजिन-मशिदीचा नोकर--चेकाळून आला आणि त्याच्या मानगुटीत हात घालून ओरडला, " कुत्र्या ! मशिदीत तुला काय काम आहे ? तुझे डोके ठिकाणावर नाही. तू कोणते महान कार्य केले आहेस म्हणून तुला स्वर्ग मिळावा ? तुझ्या ओंगळ तोंडाला हा नखरा शोभत नाही ! "

वृद्ध मुइजिनाचे बोलणे ऐकून तरुण दारुड्या रडू लागला. " ख्वाजा ! मी दारुड्या आहे, पण मला झिडकारू नकोस ! एका गुन्हेगाराला दयाघनाचा प्रसाद लाभावा यात तुला नवल का वाटावे ? मला क्षमा कर म्हणून मी तुला विनवीत नाही तौबा करणाऱ्याला अल्लाहचा दरवाजा सदासर्वकाळ उघडा असतो. अल्ला स्वत: साहाय्य करणारा आहे. देवाची क्षमा करण्याची शक्ती एवढी अपार आहे की माझ्या अपराधांची गंभीरता त्याला सांगण्यास मी लाजतो. कोणी वार्धक्यामुळे खाली पडला तर त्याला हात दिल्याशिवाय उठता येत नाही. त्या अर्थाने मीदेखील पाय घसरून पडलेला वृद्धच आहे. म्हणून देवा तू कृपावंत होऊन माझा उद्धार कर. मी तुझ्यापुढे ऐश्वर्य आणि मानमरातब मागत नाही. मी माझ्या दोषांबद्दल तुझी क्षमा मागतो आहे. माझ्या मित्राला माझा अपराध कळला तर अज्ञानामुळे तो त्याचा बोभाटा करील. परमेश्वरा, तू सर्वसाक्षी आहेस आणि आपण उभयता एकमेकांस जपत असतो. कारण तू पांघरूण घालणारा आहेस आणि आम्ही पांघरुण फेकून देणारे आहोत. बाहेरचे लोक मोठा गवगवा करत आहेत पण तू माझ्या बाजूस आहेस आणि माझ्या

दोषांवर पांघरूण घालतोस. दास अज्ञानामुळे हुकुमाचा भंग करतात, पण धनी त्यांना क्षमा करतो. तू आपल्या शिरस्त्याप्रमाणे क्षमा करशील तर कोणाचेही हाल होणार नाहीत आणि सगळे सहीसलामत सुटतील. बरे ! आता माझ्या गुन्ह्याच्या मानाने तू रागावत असशील तर मला नरकात धाड. माझ्या पापांचे मोजमाप तरी कशाला करावयाला हवे ? तू मला हात देशील तर मी इष्ट ठिकाणी पोहोचेन. पण मला तू पाडलेस तर माझे तारण करणारा आणखी कोणीही नाही. तुझा मला आधार असल्यावर माझ्यावर हात उगारण्याची कोणाची छाती आहे ? तू मला मुक्त केलेस तर मला कोण बांधून ठेवू शकेल ? महशर-कयामतीच्या न्यायदानाच्या दिवशी दोन रांगांतून लोक उभे असतील. एक उजवी आणि एक डावी. माझी वर्णी कोणत्या रांगेत लागेल ते कळत नाही. जर उजवीकडच्या रांगेत मला जागा मिळाली तर नवलच वाटेल कारण आतापर्यंत माझ्या हातून दुष्कृत्याशिवाय दुसरे काहीच घडले नाही. माझी मनोदेवता मला सतत सांगते आहे की देवाला वयोवृद्ध लोकांबद्दल मोठा कळवळा वाटतो. पण देव माझी कीव करील तर ते नवलच. कारण अजून मला स्वत:बद्दलही काही खंत वाटत नाही. पैगंबर युसूफांनीदेखील अनेक हालअपेष्टा अनुभविल्या; पण शेवटी त्यांची चांगली भरभराट होऊन ते इजिप्तचे वजीर झाले. तेव्हा त्यांनी आपल्याला कपटाने विहिरीत फेकणाऱ्या आपल्या भावंडांना माफ केले. त्याचे कारण काय ? युसूफ सुंदर होते आणि जो सुंदर असतो तो सद्गुणीही असतो. त्याने त्यांच्या भावांनी केलेल्या अत्याचारांचा सूड उगवला नाही. दुष्काळाला कंटाळून त्यांचे बांधव त्यांच्याकडे धान्याची मदत मागावयाला आले होते. आपण आपल्याबरोबर थोडे द्रव्य आणले आहे असे त्यांनी सांगितल्यावर युसुफांनी ते त्यांच्याकडून हिसकावून घेतले नाही. देवा ! आमची पण माया तोकडी आहे पण आम्हांस तुझ्या क्षमाशीलतेबद्दल दांडगा विश्वास आहे. आम्हां गरिबांना माफ कर.

माझ्यापेक्षा जास्त काळेकुट्ट आत्मवृत्त आणखी कोणी पाहिले नसेल कारण लोकांस पसंत पडणारे असे एकही कृत्य मी केले नाही. मी एकच चांगली गोष्ट केली आहे ती म्हणजे मी तुझ्यावर भार टाकला आहे आणि तू क्षमा करणारा आहेस अशी मला खात्री आहे. या आशेशिवाय माझ्यापाशी दुसरे भांडवल नाही. देवा ! क्षमेबाबत माझी निराशा करू नकोस.

## टीपा

(१) **सीमुर्ग**—कुराणात उल्लेखिलेल्या लांब मानेचा पक्षी. त्याचे पंख इंद्रधनुष्या प्रमाणे सप्तरंगी असून त्याचे आयुष्य अमर्याद आहे. त्याने अनेक प्रलय पाहिलेले आहेत. या पक्ष्यांचा फक्त एकच जोडा आहे.

(२) **काक**—भूमंडळास वेष्टणारा २५०० मैल उंचीचा पर्वत असे त्याचे कुराणात वर्णन आढळते. सीमुर्ग पक्षी याच पर्वतावर राहतो.

(३) **खलील**—खलीलुल्ला म्हणजे देवमित्र, पैगंबर इब्राहीम. नमरुद नावाच्या इजिप्तच्या राजाने सैतानाच्या चिथावणीने त्यास नास्तिक ठरवून जाळण्यासाठी मोठी चिता बनवली व त्यास तीत फेकून दिले. पण दैवी चमत्काराने आगीत शोभिवंत उद्यान निर्माण झाले; व तेथे इब्राहिम आरामात कुराण वाचीत व ध्यानमग्न होऊन बसलेला आढळला अशी कुराणात कथा आहे.

(४) **नील**—इजिप्तमधील महानदी व जगातील अतिप्राचीन संस्कृतीचे उगमस्थान.

(५) **फौज**—इजिप्तचा राजा फिरओन याने पैगंबर मूसाचा छळ आरंभिला होता. मूसाला फिरओननेच पाळले होते. पण ज्योतिष्यांनी सांगितल्याप्रमाणे त्याच्याच हातून आपला मृत्यू संभवेल या भीतीने त्याने मूसाचा पाठलाग केला. मूसासाठी नील नदीचे पात्र दुभंगले व तो सहज पसार झाला. पण त्याचा पाठलाग करणारी फौज नील नदीत शिरताच पात्र पूर्ववत झाले व तेथून ज्वाला निघाल्या. परिणामी फौज जळून खाक झाली.

(६) **फिरिश्ते**—अग्निसंभूत आणि अग्निभक्षक असे स्वर्गाचे रहिवासी. ईशस्तवन हेच त्यांचे कर्तव्य.

(७) **अजाजिल**—अल्लाने आदिमनु आदमची उत्पत्ती करून त्यास मानण्याचे फर्मान सर्व फिरिश्त्यांस काढले. अजाजिल या फिरिश्त्याने ते अहंकारामुळे धुडकावले म्हणून त्यास कल्पांतापर्यंतच्या कारावासाची शिक्षा भोगावी लागली. हाच अजाजिल सैतान म्हणून ओळखला जातो.

(८) **कयामत**—(हश्र किंवा महशर) सृष्टीचा अंत झाल्यावर प्राणिमात्रांच्या कर्माचे मोजमाप करून साधूंना स्वर्गवास व दुष्टांना नरकवास घडविण्यासाठी ठरविलेला दिवस. त्या दिवशी इसराफील फिरिश्ता तुतारी वाजवील. त्यामुळे सर्व मृतात्मे कबरीतून जागे होऊन येतील. त्या दिवशी सूर्य पृथ्वीपासून दीड भाल्याएवढ्या उंचीवर येत असल्यामुळे मोठमोठ्या पैगंबरांची देखील फजिती होईल. पण हजरत मुहम्मद पैगंबर हे मात्र आपल्या भक्तांची वकीली करण्यासाठी अल्लाच्या तक्तापाशी शांतपणे उभे असतील.

(९) पूर्वी जग, आकाश, सूर्य, चंद्र, नक्षत्र आदी स्थूल तत्त्वे नव्हती. सर्व 'असत्' किंवा शून्यमय होते. परमेश्वर म्हणाला "उत्पत्ती होवो' (कुन); लगेच उत्पत्ती झाली. (फयकुन): असे कुराणात म्हटले आहे. तुलनेसाठी खालील उपनिषद्वाक्य पाहा : असदेव सोम्य अग्र आसीत्। तस्मात् सदजायत ।

(१०) **सेहबा**—पैगंबर महंमदांचे चार मित्र (खलीफा) (१) त्यांचे सासरे अबुबकर (सिद्दीक), (२) उमर (फारुक), (३) उस्मान (गनी) त्यांचे जामात, (४) हजरत अली (हैदर) त्यांचे पुतणे आणि जामात.

(११) **कारुन**—"कौराणिक" कुबेर. हा अत्यंत श्रीमंत आणि तितकाच कृपण होता. हा मोझेस ( Moses ) चा चुलत भाऊ होता. त्याला कृपणतेचे प्रायश्चित्त देवाने असे दिले की त्याची सर्व संपत्ती जमिनीत रुतली.

(१२) ईश्वराने मनुष्यास उत्पन्न करून त्यास म्हटले ' अलस्त बिरंबेकुम ' (तुझा मी पालनकर्ता आहे.) पण अज्ञानी मानवानेही तेच वाक्य म्हटले ! ते पाहून ईश्वराने त्याला ज्ञान दिले. तेव्हा मात्र त्याने " होय तू पालनकर्ता आहेस " असे म्हटले.

(१३) म्हणूनच त्याला न्यायदानाच्या दिवशी परमेश्वराशेजारी उभे राहता येते.

(१४) जिब्राईल, मिकाईल, इस्राफील व इज्राईल हे चार प्रमुख फिरिश्ते जिब्राईलचे काम पृथ्वीवरील पैगंबरांना परमेश्वराचा निरोप पोहोचविणे. मिकाईल पर्जन्यवृष्टी करतो. इस्राफील कयामतीच्या दिवशी ढोल–तुतारी वाजवून मृतात्म्यांना आवाहन करतो व इज्राईल (यमराज) प्राणिमात्रांचे प्राणहरण करतो. यांचे चार स्वतंत्र आकाशपटलात वास्तव्य असते.

(१५) **तूर**—अरबस्तानातील डोंगर. येथेच पैगंबर मूसाचे परमेश्वराबरोबर भाषण झाले. त्यांच्या कोपाग्नीमुळे तूर भस्मसात होऊन सुरम्याची रास बनला. मक्केचे यात्रेकरू तो सुरमा भाविकपणे आणतात.

(१६) महम्मद पैगंबराने सर्वांसमक्ष चंद्राकडे बोट करताच त्याचे दोन तुकडे झाले असे म्हणतात.

(१७) अल्लाशिवाय दुसरा देव नाही.

(१८) महम्मद पैगंबरांच्या नावाबरोबर "सल्लल्लाह् अलेह्" व 'सल्लम' (देव त्यांच्यावर शांतीचा वर्षाव करो) असा नामोच्चार केला जातो.

(१९) **फातिमा**—पैगंबरांची मुलगी व हजरत अलीची पत्नी.

(२०) "लोलाक लमा खलकतुल अफलाक" म्हणजे अल्लाने पैगंबरांना म्हटले तुम्ही जर जन्मास आला नसता तर मी आकाशाची निर्मिती केली नसती.

(२१) " शांती देवो " अशी देवाजवळ हाक (दरूद).

(२२) **शीराज**—इराणातील प्रसिद्ध शहर–सादीची मायभूमी.

(२३) सिरिया व तुर्कस्तान.

(२४) अताबक्र बिनसादजंगी ईराणचा बादशहा. मुहम्मद अताबक बिन सादजंगी हा हिजरी सन ५९९ (ई. स.सु. १२५०) मध्ये अताबुक्र तुगरल यास मारून गादीवर आला. त्याचा मुलगा साद अबुबक्र बिन सादजंगी याच्याच दरबारात शेख सादी होता.

(२५) मक्केतील पवित्र पाषाण.

(२६) **फरेदून**—इराणचा प्रख्यात राजा (ख्रि. पू. ८०० वर्षे). जुहाक नावाच्या वाममार्गी दैत्यास गाव या लोहाराच्या साहाय्याने मारून आपल्या पूर्वजांच्या गादीवर आला.

(२७) **रुस्तुम**—प्राचीन इराणचा भीम. सीस्तानचा राजा, याचा मुलगा सोहराब याच्याशी द्वंद्वयुद्ध करताना मरण पावला.

(२८) **शिकंदर**—अलेक्झांडर याने याजूज माजूज या दैत्यापासून संरक्षण व्हावे म्हणून दगड आणि शिशाची भिंत बांधविली होती.

(२९) सादबिन जंगी या सादीच्या आश्रयदात्या बादशहाने मोंगल लुटारू चंगेजखान याला द्रव्य देऊन आपले राज्य सुरक्षित ठेवले होते.

(३०)**सुरय्या**—' परविन ' किंवा कृत्तिका नक्षत्र सातव्या आसमानात असल्यामुळे उच्चतेचे उपमान समजली जाते.

(३१)जहीर फारयाबी या अत्यंत लाघवी व भाडोत्री कवीने सल्जूकी सुलतान कजल असँलाँ याची अशी स्तुती केली आहे की **सतस्वर्ग**, परमेश्वराचे सिंहासन व ते टेवण्याची जागा अशी नऊ आसने एकावर एक ठेवावीत तेव्हा ती त्या बादशहाच्या रकाबीपर्यंत पोहोचतील.

(३२)नऊ आसमानाची खुर्ची (अर्ष) परमोच्चपद दर्शविणारी असून मोठ्या भगवद्भक्तांच्या स्तुतीमध्ये त्यांना तिच्यावर आरूढ केले जाते. या श्लोकात जहीर फारयाबी या भाट कवीने कजल अर्सलान या तुर्की आक्रमकाची स्तुती करण्यासाठी त्यालाही हे परमोच्चपद बहाल केले म्हणून हा टोमणा.

(३३)**तरीकत**—भजन, गायन, कवाली यायोगे भगवंताला शरण जाण्याचा सूफीपंथ. पोथीनिष्ठ म्हणजे ' शरइयत ' वाले कट्टर मुसलमान सूफीमार्ग हीन समजतात.

(३४)**खुसरू**—खुसरू परवेज. हुर्मजचा मुलगा व नोशीरवानाचा नातू.

(३५)**शेरूदा**—खुसरू परवेजचा पुत्र.

(३६)**खराबात**—दारूचा अड्डा. तेथे कोणी जात नसल्याने त्याला अवकळा आली होती.

(३७) **युसूफ**—सुंदर व शूर पैगंबर. याला त्याच्या मत्सरी भावांनी विहिरीत लोटले व त्यास लांडग्यांनी खाल्ल्याचे जाहीर केले. पण युसूफला काही वन्य जमातींनी वाचवून इजिप्त देशात नेले. तेथे त्याचा भाग्योदय झाला व इजिप्तच्या बादशहाची बायको जुलेखाचे त्यावर प्रेम जडले. "लैला मजनू" प्रमाणे "युसूफ जुलेखा" ही प्रसिद्ध प्रेमकथा आहे.
रा. ब. किर्तने यांचे ' जयपाळ ' नाटक हे या प्रेमाख्यानाचे मराठी रूपांतर आहे. (पाहा–लेले सुमनविकास पृ. ३० तळटीप.)

(३८)**हुमा**—स्वर्गातील अतिसुंदर पक्षी. कुराणात याचा उल्लेख आहे. त्याचे पंख ज्याच्यावर पसरलेले असतात त्याचे भाग्य उजळते असा समज आहे.

(३९)**दारयुष**—दारा ( Darius )

(४०)इराणचे अनेक राजे तुर्की होते व जुलमी होते त्यामुळे तुर्क (मुसलमान) असूनही इराणात तुच्छ समजले जात.

(४१)एक अत्यंत परोपकारी पैगंबर.

(४२) इदंतु नातपस्काय नाभक्ताय कदाचन।
नचाशुश्रूषवे प्रोच्यं यथा त्वं प्रोक्तवानसि। ( भगवद्‌गीता–१८ )

(४३) **इस्फंदियार**—प्राचीन इराणच्या सर्वात पहिल्या राजवंशातील गिस्तास्प या राजाचा मुलगा.

(४४) खुजंद हे मावरा उन्नहर ( Trans Jordania ) या मध्यपूर्वेतील प्रसिद्ध प्राचीन शहरी व मध्ययुगीन बुद्धिजीवी वर्गाचे माहेरघर.

(४५) **इब्राहीम**—प्राचीन इजिप्तमध्ये नमरूद राजाच्या वेळेस होऊन गेला. त्याचा नास्तिक म्हणून छळ करण्यात आला व त्यास जिवंत जाळण्याचा हुकूम दिला गेला. त्याला एका प्रचंड चितेवर सैतानाच्या चिथावणीने फेकण्यात आले. पण परमेश्वरकृपेने चितेच्या ठिकाणी सुंदर बाग तयार झाली व तीमध्ये इब्राहीम पवित्र ग्रंथाचे वाचन व ईशचिंतन करीत बसलेला आढळला. ( टीप ३ पाहा )

(४६) " बिस्मिल्ला हिर्रहिमानुर्रहीम " कोणतेही काम करण्यापूर्वी मुसलमान वरील वाक्य म्हणतात. याचा शब्दार्थ " कृपावंत व क्षमाशील भगवंताच्या नावे " असा आहे.

(४७) **आजुर**— इब्राहीमचा बाप. हा मूर्तिपूजक होता व त्यामुळे बाप-लेकाचे पटत नव्हते कारण इब्राहीम मूर्तिभंजक होता.

(४८) शहादतीचा कलमा म्हणजे इस्लाम धर्म स्वीकारताना घेण्याची प्रतिज्ञा.

**अश्शहदो अन लाइलाहा**
**इल्लल्लाही व अश्शहदो**
**अना मुहम्मदुन् अब्दुहू व रसूलहू**

**अर्थ**—" अल्लाहशिवाय कोणतेच दैवत पूज्यनीय नाही. मी शपथेने म्हणतो की मुहम्मद हे अल्लाहचे गुलाम आहेत व त्यानेच पाठविलेले दूत आहेत."

(४९) अबूजैद इराणचा पटाईत बुद्धिबळपटू व व्यवहारदक्ष मनुष्य.

(५०) सफेद देव हा माजिदरान मधील प्रख्यात मल्ल. तो दांडगट होता म्हणून त्याला " देव" (दैत्य) असे म्हणत. रुस्तुम या वीराशी तो लढला तेव्हा रुस्तुमने त्याचे डोळ फोडून त्याला ठार केले.

(५१) **रकात**—नमाजासाठी करण्याची आसने.

(५२) सैतानाच्या ( Satanic ) च्या चिथावणीमुळेच मनुष्य वाईट वागतो असे मुसलमान समजतात.

(५३) फिर्दूसी तूसी याने ' शाहनामा ' हे प्राचीन इराणचे ' महाभारत ' लिहिले आहे.

(५४) गजल काव्यातील शमा-परवाना, ज्योत व शलभ यांच्या प्रसिद्ध उपमेची ही न्यारी मखलाशी आहे. वास्तविक शलभाने ज्योतीत सापडून मरणे त्याचा

धर्मच आहे व ज्योतीचा तो अधिकार समजला जातो. पण फिरदूसीने मात्र ज्योतीला शलभाचे प्राण हरण करण्याचे प्रायश्चित्त दाखविले आहे !

(५५) अरबस्थानातील एक प्रांत.

(५६) पाहा :

**तीर्थोदकंच वह्निश्च**

**नान्यत्र शुद्धिमर्हतः**

**—भवभूति, उत्तररामचरित्र.**

(५७) शिराजचा सुलतान अबूबकर सअद. (मृत्यू इ. स. १२५९) सादीचा आश्रयदाता त्याचा गौरव करण्यासाठीच सादीने "सअदी" हे उपनाम (तखल्लुस) घेतले.

(५८) पॅलेस्टाईनमधील सुलेमानाने बांधविलेली गाजलेली मशीद. कुराणात या मशिदीस अलअक्सा म्हटलेले आहे. ह्या मशिदीस 'किब्ला-ए-ऊला' असे म्हणतात. ह्या मशिदीकडे (पश्चिमेकडे) तोंड करूनच नमाज पढतात. कारण 'काबा' शुद्ध करण्याच्या अगोदर अल अक्साकडे तोंड करून नमाज पढण्याचा रिवाज होता.

(५९) इश्कमजाजी म्हणजे वासनायुक्त प्रेम. इश्कहकीकी म्हणजे भक्तीचा परमोच्च बिंदू. सूफी तत्त्वज्ञान हा प्रेममार्ग किंवा भक्तिपंथ असून ईश्वरच प्रेमपात्र असतो. वासनायुक्त प्रेम हीन खरे पण ईशप्रेमाच्या साधनेचा तो सुरुवातीचा टप्पा समजला जातो. मताब अज इश्करू गरचीमजाजीस्त के आँ बहरे हकीकत कारसाजीस्त । —जामी.

(प्रेम वासनायुक्त असले तरी त्याज्य नव्हे कारण त्यापासून खऱ्याखुऱ्या भक्तीच्या साधनेला मदत होते.)

(६०) **साकी**—मैफलीत मदिरा पाजणारा. उर्दू काव्यात स्फूर्ती देणारा या अर्थाने परिचित संकेत.

(६१) कुराणाची आयत अशी आहे. अल्लाने सत्यलोकात आत्म्यांना विचारले "अलस्त रब्बीकुम" (मी तुमचा देव नव्हे का ?). तेव्हा त्या सर्वांनी जयघोष केला आणि म्हटले "होय" (कालू अबला)

(६२) **मा अरफनाकु**—हक्कमलरिफकु कुराण सूरा.

(६३) "चोगान व गोय" पोलोसारखा घोड्यावर बसून भाल्याने चेंडू ढकलण्याचा खेळ. स्पर्धा व विजय दर्शविण्यासाठी फारसी-उर्दू-साहित्यांत—या जोडीचा सर्रास उपयोग केला जातो. पाहा 'बाजी ले जाना'

(६४) एक काल्पनिक प्राणी ( Salamandes ) हा आगीत सापडला तर मरत नाही.

(६५) **सूर**—कल्पांत सुरू झाल्याची शिटी.

(६६) **लैला मजनू**—अरबी-फारसी-उर्दू साहित्यातील अद्वितीय प्रेम प्रकरणातील युगल.

'है' या तांड्यातील सामान्य स्त्रीवर अत्यंतिक प्रेम करणारा कैस नावचा तरुण. शाळेत शिकताना दोघांचे एकमेकांवर प्रेम बसले व कैस तिच्यापायी वेडा (मजनूँ) झाला. दोन्ही कुटुंबांना हे रुचले नाही म्हणून मीलनात विघ्न आले. पुढे बादशहाला ही हकीकत कळताच त्याने बराच आहेर लैलाच्या वडिलांना पाठविला व तिच्याशी निका करविली. कैस पिसाटला व लैला कष्टी झाली. योगायोगाने वाळवंटात वादळ आले व काफला बेपत्ता झाला. लैला मजनूँचे मीलन झाले, पण हाय! त्या मीलनात दोघांचे प्राण निमाले!

(६७) सुलतान महमूद गजनी. सोमनाथ मंदिर फोडणारा सुलतान. फारशी-उर्दू साहित्यात मूर्तिभंजक–बुत्शिकन–म्हणून प्रसिद्ध आहे व अयाज नावाच्या सामान्य गुलामावर आषक होता म्हणून साहित्यात अयाज-मेहमूद हे प्रेमी युगल प्रसिद्ध आहे.

(६८) खुरासान प्रांतातील एक शहर.

(६९) एकमेवाद्वितीयं ब्रह्म.

(७०) वीर्य पतन झाले.

(७१) सूफी उपासनापद्धती : पोथीनिष्ठ मुसलमान प्रेमभक्तीपंथीय सूफी साधूंची उपासना अयोग्य समजतात. इस्लामला संगीताचे वावडे आहे. म्हणून अभिश्रवण (सिमअ) त्याज्य समजतात. सादीचा कल सूफी पंथाकडे होता. म्हणून त्याने भक्तिमार्गीय कव्वाली ऐकण्याची महती गायिली आहे.

(७२) **हुदी**—जात्यावरील ओवीप्रमाणे कारवानाचे समूहगान. या गाण्याने उंटांनाही नाचण्याची हुक्की येते.

(७३) **शीरीन** : (१) गोडी (२) चिनी सुंदरी.

लैला मजनूसारखे शीरीन-फरहाद हेही एक प्रेमी युगल. यांचे प्रेमप्रकरण फारसी साहित्यात गाजले आहे. फरहाद नावाच्या पाथरवटाचे शीरीन (शब्दार्थ : मधुमती) या चिनी राजकन्येवर प्रेम जडले होते. राजाने त्याला अशी अट घातली की चीनपासून इराणपर्यंत बोगदा तयार केल्यासच ती मिळेल. त्याने ते काम बहुतेक पूर्ण केले होते. पण एका खोडसाळ माणसाने खोटेच त्याला शीरीन मेली असे सांगितले. फरहाद निराशेच्या उद्वेगाने हातोड्याने आपले डोळे फोडून घेऊन मेला. यावर गालिबचे सुंदर भाष्य असे की प्रेमविरह कितीही असह्य असला तरी त्यामुळेच कोणी मरत नाही; कारण फरहादला मरण्यासाठी हातोडा वापरावा लागला!

(७४) **फरकदान** : ध्रुवताऱ्याशेजारी असलेली तेजःपुंज ताऱ्यांची जोडी.

(७५) **अवश्यं यातार** : चिरतरमुषित्वाच विषया:।
वियोगे को दोष: त्यजति न जनो यत्स्वयममून् ।।
व्रजंत: स्वातंत्र्यादतुल परितापाय मनस: ।
स्वयंत्यक्ता ह्येते शमसुखमनंतम् विदधति ।।

(७६) **नरगिस**—फारसी साहित्यात सुंदर डोळयांचे उपमान. नरगिस ( Narcisus ) फूल.

(७७) विरहाची रागिणी.

(७८) **दस्तरख्वान**—चादर. मुसलमान जेवणासाठी एक चादर अंथरतात व जमिनीवर एकत्र भोवती बसून जेवतात.

(७९) **असा-ए-मूसा**—मूसां ( Moses ) ची काठी. त्याने काठीने समुद्र चिरला आणि ते वाट काढून निघून गेले. तसेच सापांचा सुळसुळाट थांबवायला त्यांनी ती काठी फेकताच तिने ते सर्व साप गट्ट केले.

(८०) **बलाल**—मुसलमान बलाल या हबशी भक्ताचा गौरव करतात.

(८१) **सुलह**—(१) शहर (२) शांती.

(८२) **कोषयार**—अबुलहसन कोषयार हा प्रसिद्ध खगोलशास्त्री अवीसेना ( Avi Sena ) याचा गुरू होता.

(८३) **अयूक**—अत्युच्च पद सुचविणारी या ताऱ्याची उपमा दिली जाते.

(८४) **हातमे असम**—बहिरा हातिम (हि. स. २३८–इ. स. सु. ८४०) खुरासानच्या अहमद सुलतानाचा गुरु आणि अनासक्तीचा उपदेश करणारा.

(८५) **तबरेज**—इराणमधील प्रसिद्ध शहर आणि विद्वानांचे माहेरघर.

(८६) 'ब्रह्मसत्यं जगन्मिथ्या'

(८७) **लुकमान**—याला बरेचजण इतिहासकार पैगंबर समजतात. हा एक मोठा वैद्य होता आणि कुराणातही त्याचा उल्लेख आढळतो.

(८८) सुप्रसिद्ध दरवेश. बगदादचे रहिवासी जुनैद (मृ. हि. २९८ इ. स. सु. ९००)

(८९) **नहिं कस्तूरिकामोद: शपथेन निवार्यते** ।

(९०) उमर-फारुक २ रे खलिफा यांच्या कारकीर्दीत अरब मुसलमान दिग्विजयास निघाले.

(९१) शहनामा या इराणी महाभारताचा कर्ता फिरदौसी आणि निजामी गंजवी हे दोघे वीररसात हातखंडा असलेले कवी आणि त्यांची सर 'सादी'ला येणार नाही असा त्याला टोमणा मारला.

(९२) **स्रगियं यदि जीवितापहा**
**हृदयेस्मिन्निहिता न हन्ति माम्**
**विषमप्यमृतं क्वचिद्भवेत्**
**अमृतं वा विषमीश्वरेच्छया**
**—रघुवंश**

(९३) **सोहराब-रुस्तुम**–ह्या इराणी-भारत शहानाम्यातील अर्जुन-अभिमन्यूसारखी जोडी. रुस्तुम पराक्रमी होता, पण शेवटी त्याला आपल्या भ्याड भावाच्या हातूनच मरण आले.

(९४)प्राचीन इराणात त्रित किंवा फरीदून या नावाचा महारथी होऊन गेला. याचा काल ख्रि. पू. ८५० असावा.

(९५) **तार्तर**—मध्य एशियातील तुर्की-मोंगल टोळया. यांच्या स्वाऱ्यांमुळे प्राचीन काळी भारत (कनिष्क) मध्ययुगात चंगीज, हलाकू, तैमूर यांनी चीनपासून पोलंडपर्यंतच्या मुलुखावर आपली सत्ता प्रस्थापित केली.

(९६) **बहराम गोर**—प्राचीन इराणातील (गोर) नील गाईची शिकार करणारा चक्रवर्ती.

(९७)**कुर्द**—धिप्पाड आर्यजातीचे ठोळीवाले.

(९८)**बाबा कोही**—शेख अबूअब्दुल्ला अलीबिन मुहम्मद बिन अब्दुल्ला नावाचा 'बाबा' संत! शिराजजवळ एका गुहेत राहात असे आणि तेथेच त्याची समाधी आहे. कलंदर जोगी या कापालिकांचा तो गुरू समजला जातो.

(९९) **अमर जैद**—(सोम्यागोम्या) ही अरबी व्याकरणातील जोडी संस्कृत व्याकरण आणि साहित्यातील देवदत्त-यज्ञदत्त या काल्पनिक जोडीसारखी आहे.

(१००)इतिहास प्रसिद्ध 'अलअक्सा' बैतुल मुकद्दस (पॅलेस्टाइन) या मशिदीकडे (किब्ला) तोंड करून मुसलमान नमाज पढतात.

(१०१) मागील अध्यायातील टीप पाहा.

(१०२) **जिब्राईल**—जेब्राईल. सर्वसाक्षी देवदूत. हा देवाची आज्ञा कुराण पैगंबरांना कळवितो.

(१०३) **कुतो विद्या सुखार्थीनां**

**कुतो विद्यार्थिनः सुखम्।**

(१०४) **सिदरतुल मुंतहा**—अगदी टोकाला (अवघड) असलेले दुःसाध्य बोर. तू जर आपल्या आयुष्यात मिताहाराचे व्रत अनुसरलेस तर देवदूतासारखे चारित्र्य प्राप्त होते. उनाडटप्पू मनुष्याला देवदूत बनता येत नाही.

(१०५) **दमे ईसा**—येशू ख्रिस्तांच्या अंगी फुंकर घालून सजीव करण्याची शक्ती होती. ते गाढवावर स्वार होऊन येरुसलेमला गेले होते. म्हणून आत्मा हा येशू आणि देह म्हणजे गाढव अशी कल्पना येथे अभिप्रेत आहे.

(१०६) **कुर्दिस्तान**—इराणात आर्यवंशाच्या कुर्द लोकांची वस्ती असलेला डोंगराळ टापू. सह्याद्रीसारखा! लोकदेखील मराठ्यांसारखे शूर आणि स्वतंत्र वृत्तीचे.

(१०७) **कारून**—कुराणातील कुबेर. पैगंबर मूसा ( Moses ) च्या काळातील अतिशय समृद्ध महंत. त्याच्या तिजोरीच्या किल्ल्यांसाठीच चाळीस उंट

लागत असे म्हणतात. त्याने शास्त्रोक्त दान न केल्यामुळे ईश्वरी कोप होऊन तो आपल्या ऐश्वर्यासह जमिनीत गाढला गेला.

(१०८) **यदे मूसा**—पैगंबर मूसाचा हात शुभ्र होता अशी समजूत आहे.

(१०९) रुस्तुम आणि साम—इराणी पुराणात " साम " चा उल्लेख येतो. त्याचाच नातू " रुस्तुम ". दोघेही परमवीर आणि पैलवान.

(११०) **तिकश**—तिकश बिन ईल अर्सलान ख्वारझमचा तुर्की सुलतान. (मृ. हि. ५९६, इ. स. सु. १२००).

(१११) **लाहोल**—लाहोल ला कुव्वता इल्ला बिल्ला हिल अली इल अजीम. शांतं पापं सारखा एक मंत्र. अर्थ : पातकापासून आम्ही स्वशक्तीने परावृत्त होऊ शकत नाही आणि ईश साहाय्याशिवाय ईश्वरोपासना करण्याची शक्तीही आमच्यापाशी नाही.

(११२) **मद्रसा निजामिया**—अलीगड येथील मुस्लिम युनिव्हर्सिटीप्रमाणे बगदाद येथे मद्रसा निजामिया हे इस्लामी धर्मशास्त्र शिकविण्याचे विश्वविद्यालय होते. सादी तिकडचाच स्नातक. त्याच्या काळातील सर्व थोर विद्वान याच विश्वविद्यालयात शिकले होते. त्याचा संस्थापक निजामुल्मुल्क तूसी. प्रसिद्ध साहित्यिक इमाम गजाली येथे प्राध्यापक होता.

(११३) **हजाजबिन युसूफ**—हज्जाज (मक्का मदीने)चा राज्यपाल. हा मोठा क्रूर होता. त्याने अनेक विद्वानांना ठार मारले आणि देशोधडीला लावले. हजारो मुसलमानांचा कत्ले आम केला.

(११४) भार्या रूपवती शत्रु:

—सुभाषित

(११५) इराणातील एक डोंगरमाथ्यावरील गाव. ह्या शब्दाचा दुसरा अर्थ तुर्की गुलामांचे शिखर (ढुंगण).

(११६) **पारसी**—फारशी भाषेत या शब्दाचा अनेक अर्थांनी उपयोग केला जातो अग्निपूजक पारसी मुसलमान नसून काफर आहेत. कामाग्नीचे पूजन करणाराही फारशी काफरच.

(२) पारसी अग्नी म्हणजे फारसी कवितेचे तेज. सादीची फारशी कविता वाचून शत्रूला ताप चढला असा अर्थ आहे.

(११७) **तुग्रिल**—तुर्की सलजूकी घराण्याचा पहिला बादशहा. याने खुरासान प्रांत जिंकला होता.

(११८) **सुहेल**—यमन देशात दिसणारा तेजस्वी तारा. त्याच्या प्रभावामुळे कातडे सुगंधी होते आणि त्यातील किडे मरतात असे समजले जाते.

(११९) मुसलमानांनी नवे मुलूख जिंकल्यावर तेथे ते धर्मप्रसार करीत आणि काळी वस्त्रे धारण करणारे उपदेशक–खतीब एका हातात समशेर धरीत.

(१२०) **अनसरी** (मृत्यु ५७५ इराणी सन् ई. स. सु १०४०)—महमूद गजनवी च्या काळातील प्रसिद्ध फारशी कवी.

(१२१) **युसूफ जुलेखा**— हे कुराण प्रसिद्ध प्रेमी युगल. पै. युसूफ हा पै. याकूबचा सर्वात लहान आणि अतिशय सुंदर मुलगा. जुलेखा ही इजिप्तच्या अजीजची (बादशाहाची) बायको. अजीज़ने पै. युसूफला गुलाम म्हणून विकत घेतले होते. जुलेखा त्याच्या रूपावर मोहित झाली. पुढे असे कळले की ती युसूफसाठीच जपमाळ ओढत होती व चुकून तिचे अजीजशी लग्न झाले होते. शेवटी तिचे युसूफशी लग्न झाले. वर्षभराने यूसुफच बादशहा (अर्जाज) झाला.

(१२२) पैगंबर युनूस ( Jonah ) ला माशाने गिळले होते. तरी ते जीवंतच होते. पण मोहरमच्या दहाव्या तारखेला त्यांनी 'ला इलाहा इल्ला अंता सुबहानका इन्निकुतां मिन द्दालमीन' या कुराणातील आयतीचा जप केल्यावर माशाने त्यांस तोंडातून काढून बाहेर फेकले.

□ □ □

# विषय-नाम-सूची

## बोस्ताँमधील काही निवडक श्लोक व त्यांचा अर्थ

| मूळ फारसी | मराठी |
|---|---|
| बरी जातश अज तोहमते ज़िदओ जिन्स | भगवंताला कोणी स्वकीय नाही आणि कोणी परकीय नाही. |
| **कबा**–गर हरीरस्त व गर परनिया<br>बिनाचार हश्शूश बुवद दरमियान | दुलई तुम्ही रेशमाची बनवा किंवा तरटाची. तिच्या आत टाकाऊ चिंध्याच भरून ती शिवावी लागते. |
| गुल आवुर्द सादी सूए बोसताँ<br>बशोखी चू फिलफिल ब हिंदूस्तान | सादीने उद्यानात (बोस्तानांत) फूल आणून ठेवले आहे. म्हणजे भारतात मिरी (मिरची) घेऊन जाण्यासारखा अनाठायी प्रकार केला आहे. |
| मुराआत दहकान कुन अज<br>बहर खीश के मजदूरे खुशदिल<br>कुनद कार बेश | तुम्ही स्वार्थासाठीच मजुराला भक्कम मजुरी द्या. मजूर खूष झाला म्हणजे तो काम चांगलेच करील. |
| दिलस्त अय खिरदमंद जिंदाने राज<br>चू गुफ्ती नयायद बजंजीर बाज | ज्ञानी मनुष्या! मन हे गुपितांचे कारागृह आहे. तू एक गुपित तोंडावाटे जाऊ दिलेस तर ते पुन्हा पकडून आणणे अशक्य. |
| दो कसरा के बाहम बुवद जानो होश<br>हिकायत कुनानंद लबहा खमोश | जेव्हा दोघांचा प्रीतिसंगम होतो, तेव्हा त्यांचे अबोल ओठ खूपच बोलत असतात. |
| कसे रा नजर सूए शाहिद रवास्त<br>के दानद बदीं शाहिदी उज्र ख्वास्त ! | ज्याला समर्पक रीतीने सबब सांगता येते त्यानेच माशुकाशी दृष्टादृष्ट करावी. |
| रईयत दरख्तस्त अगर परवरी<br>बकामे दिले दोस्ताँ बर खुरी | प्रजा हा वृक्ष आहे. त्याची जोपासना केलीस तर तुला मनपसंत फळे मिळतील. |
| चू शायद गिरिफ्तन ब नरमी दयार<br>ब पैकार खूँ अज मसामे मयार | जर मार्दवाने मुलुखगिरी करता येत असेल तर विनाकारण रक्तपात कशाला हवा ? |

| मूळ फारसी | मराठी |
| --- | --- |
| बमर्दी के मुल्के सरासर जमीं<br>न अरजद के खूने चकद बर जमीं | साध्या माणसाच्या अंगातून पृथ्वीवर गळून पडणाऱ्या रक्ताच्या थेंबाच्या मोलाची बरोबरी अवघी पृथ्वीसुद्धा करू शकणार नाही. |
| बसहरा दर अज दुश्मनाँ दार बाक<br>के दर खाना बाशद<br>गुल अज खार पाक | तू जंगलात असशील तर दुष्मनांचे भय बाळगावयाला काही हरकत नाही. पण घरात फुलांना काट्याचा बाऊ का वाटावा ? |
| न तदबीरे महमूद व राये<br>नकूस्त<br>के दुष्मन नदानद शहनशाह ओ<br>दोस्त ॥ | बादशहाला आपल्या परिवारात शत्रू कोण आणि मित्र कोण हे ओळखता आले नाही, तर त्याला चाणाक्ष कसे म्हणावयाचे ? |
| चुनानस्त दर महतरी शर्ते जीस्त<br>के हर कुहतरे रा<br>बदानी के कीस्त ? | समर्थ सरदाराचे लक्षण हे की आपल्या हाताखालच्या सर्वांत किरकोळ माणसाची सुद्धा त्याला माहिती असावी. |
| दराँ दारे मुल्क अज<br>खलल गर्म बुवद<br>के तदबीरे शाह अज<br>शबाँ कम बुवद | ज्या राज्याच्या बादशहाचा वकूब गुराख्यापेक्षाही खालच्या दर्जाचा असतो तेथे अराजकापेक्षा दुसरे काही घडू शकत नाही. |
| के नालद ज जालिम के<br>दर दौरे तोस्त<br>के हर जोरे कू मीकुनद<br>जोरे तोस्त ! | तुझ्या कारकीर्दीत जर कोणा जुलमी माणसांबद्दल कोणी फिर्याद केली तर ती तुझ्याच जुलमाची तक्रार होय. |
| यके रा के सइए कदम पेशतर<br>बदरगाहे हक मनजिलत बेशतर | जो आपल्या प्रयत्नांवर भर देतो त्याला देवाच्या दरबारात मानाचा दर्जा मिळतो. |
| बुजुर्गाँ निहादंद सर बर दरश<br>के दर मी नयामद बदरहा सरश | ज्याचे डोके कोणाच्या उंबरठ्याला लागलेले नाही, त्याच्या उंबरठ्यावर मोठमोठ्यांची मस्तके लागतात. |

| मूळ फारसी | मराठी |
| --- | --- |
| के मर्द अरचे बर साहिलस्त अय रफीक<br>नयासायदो दोसतानश गरीक | आपण स्वत: जरी काठावर सुखरूप असलो, तरी आपल्याला आपला मित्र बुडत असलेला कसे पाहवेल ? |
| मुनक्कस बुवद ऐशे आँ तंदुरुस्त<br>के बाशद ब पहलूए बीमारे सुस्त | जरी स्वत:ची तब्येत ठीक असली, तरी शेजारी कोणी कण्हत असेल तर चैन कसे पडेल ? |
| यके रा बजिंदाँ बरी दोसताँ<br>कुजा मानदश ऐश दर बोसताँ ? | आपले सगळे मित्र तुरुंगात अडकून पडले असतील, तर आपल्याला बागेत कशी मौज वाटेल ? |
| गमो शादमानी बसरमी रवद<br>ब मुर्ग ई दो अज सर बदर मी रवद | सुख आणि दु:ख ही येतात जातात. मेल्यानंतर दोहोंचाही मागमूस राहात नाही. |
| के शाहर्चे बर अर्सा नाम आवरस्त ।<br>चू जुउफ आमद अज बीजके कमतरस्त | बुद्धिबळाच्या पटावर राजालाच महत्त्व असते. पण शह दिल्यावर साधे प्यादे ही त्याच्यावर मातब्बर होते. |
| न लायक बुवद ऐश बा दिलबरे<br>के हर बामदादश बुवद शौहरे | जी स्त्री रोज सकाळी नव्या दादल्याबरोबर हिंडते, तिच्या पासून सुख कसे मिळेल ? |
| गर इन्साफ पुरसी बद अख्तर कस अस्त ।<br>के दर राहतश रंजे दीगर कस अस्त ।। | ज्याला दुसऱ्यांचे दु:ख पाहून मौज वाटते तो खरोखर करंटा दुर्जन होय! |
| ज दुश्मन शिनौ सीरते खुद के दोस्त<br>हराँचे ज तो आयद ब चशमश नकोस्त | तुला स्वत:च्या स्वभावाबद्दल खरी कल्पना हवी असेल, तर आपल्या शत्रूचे मत समजून घे. कारण मित्राला तुझा कोणताच दोष दिसत नाही. |
| अगर बर किनारी ब रफ्तन बिकोश<br>वगर दरमियानी लिबसे दुश्मन बिपोश | तू काठावरच असशील, तर पळ काढ. शत्रूच्या घोळक्यात असशील तर शत्रू करतो तसलाच पोशाख कर. |

| मूळ फारसी | मराठी |
| --- | --- |
| जिरह पोश खुसपंद मर्दफगनाँ<br>के बिस्तर बुवद<br>ख्वाब गाहे जनाँ | मर्दाला चिलखतासकट झोपावे लागते. कारण गादी ही बायकांच्या झोपण्यासाठी असते. |
| वगर खुफिया दस दिल<br>बदस्त आवरी<br>अजाँ बहके सद राह<br>शबेखूं बरी | गनिमी काव्याने शंभरदा चोरटा हल्ला करण्यापेक्षा गुपचूपपणे दहा अंतःकरणे जिंकणे केव्हाही चांगले. |
| कसे जाँ ज आशेबे दुश्मन बिबुर्द<br>के मर दोस्ताँरा ब दुश्मन शुमुर्द | जो मनुष्य आपल्या मित्राला देखील शत्रू समजून जपून वागतो तोच सुरक्षित असतो. |
| सिकंदर के बाशकियाँ हर्ब दाश्त<br>दरे खीमा गोयंद दर गर्ब दाश्त | सिकंदराने पूर्वेकडील मोहिमेत देखील आपल्या तंबूचे दार पश्चिमेकडे ठेवले होते. |
| तो बाखुद बिबर तोशए खीशतन<br>के शफकत नयायद ज फरजंदो जन | अंत्यकाळी आपली शिदोरी स्वतः घेऊन जा. कारण तुझ्या बायकापोरांना तुझी कसलीच चिंता नसते. |
| बगम ख्वारगी जुज<br>सर अंगुश्ते मन<br>न खारद कसे दर<br>जहाँ पुश्ते मन | माझ्या हातांच्या नखांशिवाय या जगात माझी पाठ बिनचूकपणे कोणी खाजवू शकत नाही. |
| जियाँ मी कुनद मर्द तफसीरदाँ<br>के इल्मो अदब मी फरोशद ब नान | पोट जाळण्यासाठी आपली विद्वत्ता विकणारा पंडित करंटाच होय. |
| बदो नेकरा बुज्लकुन सीमो जर<br>के ईं कस्बे खैरस्त व आँ दफए शर | दान हे चांगले आणि वाईट या दोघांनाही द्यावे. चांगल्यांपासून पुण्य मिळते, वाइटांपासून धोका टळतो. |
| ज दस्ते तुही बर नयायद उमीद<br>बजर बर कुनी चष्मे देवे सपीद | रिकाम्या हाताने कोणतेच उद्दिष्ट साधत नाही.<br>पैसा असला तर मात्र दैत्याचे डोळे-देखील काढता येतात. |

| मूळ फारसी | मराठी |
| --- | --- |
| तुही दस्त दर खूबरूयाँ न पेच<br>के बे हीच मर्दुम नयरजद बहीच | कनवटीला छदाम नसेल तर सुंदरी-मागे घुटमळू नकोस. दरिद्र्याला कोणीच जवळ करीत नाही. |
| खुदा अर ब हिकमत बंदद दरे<br>कुशायद बफज्लो करम दीगरे | देवाने कधी एखादे दार मुद्दाम बंद केले तरी त्याच्या मेहेरनजरीमुळे दुसरे एखादे दार उघडे असतेच. |
| न बखशीद बर हाले<br>परवाना शमा<br>निगहकुन के चूं सोख्त<br>दर पेशे जमा | मैफलीतील ज्योतीने पतंगाची गय केली नाही. त्याचे प्रायश्चित्त म्हणून ती सभोवताली चाहते असतानाच जळून खाक होते. |
| बदाँरा नवाजिश कुन<br>अय नेक मर्द | दुर्जनांना दया दाखविलीस, तरी ती वाया जात नाही. |
| के सग पास दारद चू<br>नाने तो खुर्द | तुझा तुकडा खाणारा कुत्रा तुला कधीच विसरत नाही. |
| बराँ मर्द कुंदस्त दंदाने यूज<br>के मालद जबाँ बर पनीरिश दो रोज | चित्ता ज्या माणसाचे लोणी दोन दिवस चाटतो त्या माणसाच्या बाबतीत त्याचे दात बोथट होतात. |
| दरवेशरा तोशा अज बोसा बह | दरिद्र्याला बोशा (चुंबना) पेक्षा तोशा (शिध्या) चीच जास्त गरज असते. |
| बखिदमत मनिह दस्त बर कफश मन<br>मरा नान दिह व कफश<br>बर सर बिजन | तू अदबीने माझ्या जोड्याला हात लावू नकोस. त्यापेक्षा मला भाकर दे आणि आपला जोडा माझ्या डोक्यावर हाण ! |
| कसे रा के बा दोसती सर खुशस्त<br>न बीनी के चूं बार दुश्मनकश अस्त | प्रियतमांच्या विचारातच ज्याचे मन मस्त असते, त्याला दुश्मनांचा जाच कधी असह्य होत नाही. |
| जर अंदर कफे मर्द दुनिया परस्त<br>हनूज अय बिरादार ब संग अंदरस्त | लोभी माणसाच्या हातातील सोने म्हणजे अजून दगडातच दडून बसलेल्या सोन्यासारखेच असते. |

| मूळ फारसी | मराठी |
| --- | --- |
| जफा पेशगॉरा बदिह् सर बबाद | जुलमी माणसाचे मुंडके वाऱ्यावर सोड. |
| सितम बर सितम पेशा<br>अदल अस्त व दाद | शठांना धडा शिकविणे हाच खरा न्याय होय. |
| यकेराके मअशूक बाशद यके<br>नयाजारद अज बे बहर अंदके | जो एकाच माशुकाचा एकनिष्ठ चाहता असतो त्याला बारीकसारीक अडचणींचा बाऊ वाटत नाही. |
| मरा खुद कुशद तीरे<br>आँ चश्मे मस्त | मला तुझ्या मस्त नजरेने खतम केले आहे. |
| चे हाजत के आरी ब शमशेर दस्त | तेव्हा तलवार कशासाठी उपसतोस. |
| न दादंद साहब दिलाँ दिल ब पोस्त<br>व गर इबलहे दाद बे मग्ज ऊस्त | जाणते लोक चेहरा पाहून मोहित होत नाहीत. जे होतात त्यांना मेंदू नसतो. |
| अगर यारी अज खीशतन<br>दम मजन | तुझे प्रेम खरे असेल तर मी, तू असे द्वैत माजवू नकोस. |
| के शर्क अस्त बा यार व बा<br>खीशतन | कारण त्यामुळे मला व तुला अधर्मा (कुफ्र)चा कलंक लागेल. |
| चू गुर्बा नवाजी कबूतर बरद | मांजराला पोसलेस, तर ते तुझे कबूतर पळवील. |
| चू फरबाकुनी<br>गुर्ग युसुफ दरद | लांडग्याला लठ्ठ केलेस, तर तो पैगंबर युसुफासारख्यांना देखील फाडून खाईल. |
| असीरश न ख्वाहद रिहाई ज बंद<br>शिकारश न जोयद खुलास<br>ज कमंद | सज्जनांचा इतका मोह पडतो की त्यांच्या बंदिवानांना सुटावेसे वाटत नाही आणि त्याच्या सावजांना गळफास तुटावा असे कधी वाटत नाही. |
| चू दर चश्मे शाहिद<br>न यायद जरत<br>जरो खाक यकसाँ नुमायद बरत | जर तुझी दौलत तुझ्या माशुकाला रुचली नाही, तर तुझ्या दृष्टीने तुझी दौलत आणि माती हे दोन्ही सारखेच. |

| मूळ फारसी | मराठी |
|---|---|
| न मर्दुम हमीं उस्तुखानंद पोस्त<br>नहर सूरते जाँ मअनी दरूस्त. | माणूस म्हणजे चामड्यांत बांधलेले हाडांचे मोटोळे नव्हे. दुसरे असे की, चेहऱ्यावरून कोणी जिवंत वाटला, तरी खरोखर तो तसा असतो असे म्हणता येत नाही. |
| मदिह ता तवानी दरीं जंग पुश्त<br>के जिन्दा अस्त सादी<br>चू इष्कश बिकुश्त | तू शक्य तो प्रेमयुद्धात आपली पाठ दाखवू नकोस.<br>सादी जिवंत आहे याचे रहस्य म्हणजे तो प्रेमयुद्धात कामी आला आहे. |
| यके तिश्नह मी रफ्त व जाँ मी सिपुर्द<br>खनक नेक बख्ते के दर आब मुर्द | एक तृषार्त माणूस मरावयाला टेकला होता. तेव्हा तो म्हणत होता. "वा: पाण्यात बुडून मरणारा किती धन्य !" |
| बले गर बखूबी नदारद नजीर<br>ब अंदक दिलाजार तरकश मगीर | ( नवरा ) असामान्यपणे रूपवान असेल, तर त्याने त्रास दिला म्हणून काडीमोड घेऊ नये. |
| चू बर अक्ले दाना शवद इष्क चीर<br>हमाँ पंजा आहनीं स्त व शेर | शहाण्याच्या अकलेवर प्रेमाचा घाला आला, तर ते दृश्य लोखंडी पंजावर वाघाने झेप घातल्याप्रमाणे दिसेल. |
| चू इश्क आमद अज<br>अक्ल दीगर मगोय<br>के दर दस्त चौगाँ असीरस्त गोय | एकदा प्रेमाचा पगडा बसला की अकलेला रजा द्यावी लागते. कारण विटी ही दांडूची बटीक असते. |
| तरा हरचे मशगूल दारद ज दोस्त<br>गर इनसाफ पुरसी<br>दिलारामत अस्त | जर प्रियतमाच्या काही गोष्टी तुला गुंगवून टाकीत असतील, तर समजावे की तुला त्यांच्याशिवाय चैन पडणार नाही. |
| न दूरी दलीले सबूरी बुवद<br>के बिसियार दूरी जरूरी बुवद | दूर राहिल्याने प्रेमात अंतर पडते असे नाही. उलट कित्येकदा दूर असणेच हितावह असते. |

| मूळ फारसी | मराठी |
| --- | --- |
| खिलाफे तरीकत बुवद कवलिया<br>तमन्ना कुनद अज खुदा जुज खुदा | सूफी संताने देवाच्या प्रेमाशिवाय अन्य वर मागणे सूफी (तरीकत) संहितेला सोडून होईल. |
| गरज दोस्त चश्मत बर अहसाने ऊस्त<br>तू दर बंदे ख्वीशी न दर बन्दे दोस्त | तुझी नजर जर प्रियतमाच्या (देवाच्या) उपकारावर असेल तर तू देवाचा भक्त कसला? स्वार्थाचाच बन्दी ! |
| हकीकत सरायेस्त आरास्ता<br>हवा व हवस गिर्दे बर खास्ता | सत्य हे शृंगारलेले मंदिर असून लोभ, मोह त्याच्याभोवती उठलेल्या धुळीच्या वादळाप्रमाणे होत. |
| चूकूदक बदस्ते शिनावर बरस्त<br>न तरसद वगर दजला पहनावरस्त | नदीत पोहताना जर बालकाने मोठ्याचा हात पकडलेला असला तर युफ्रेटिस नदीचे पाणी किती खोल आहे याबद्दल त्याला काळजी करावी लागत नाही. |
| शुतुर रा चू शोरो तरब दर सरस्त<br>अगर आदमीरा न बाशद खरस्त | जर काफिल्यातील भक्तिगीत ऐकून उंटही नाचावयास लागतो, तर माणसाचे मन भजनात गुंतले नाही तर तो गाढव (खर) होय. |
| चि नग्ज आमद ईं नुक्ता दर सिंदबाद | सिंदबाद या दर्यावर्दी वीराने आपल्या पुस्तकात म्हटले ते खरेच आहे: |
| के इश्क आतिशस्त अय पिसर पिंद बाद | "बाळा ! प्रेम ही आग असून उपदेश वारा आहे." (वाऱ्याने (उपदेश केल्याने) प्रेमाचा जोर अधिक वाढतो.) |
| चू बेशक नबिश्तस्त बर सर हलाक<br>बदस्ते दिलाराम खुशतर हलाक | मरण जर अटळ आहे, तर ते प्रेम-पात्राच्या हातून आल्यास सुसह्य होईल. |
| न रोजे ब बेचारगी जाँ दिही<br>पस आँबहके दरपाये जानाँ दिही | कधी तरी तुला आपला प्राण द्यावाच लागणार आहे तेव्हा तू तो प्रियतमाच्या चरणी का ठेवत नाहीस ? |

